पुणें अ. वि. गृह-१७ वें प्रकाशन

# जगांतील समाजक्रांति
## व
# हिंदुस्थान

अमेरिका, रशिया व यूरोपमधील
समाज व विचारप्रवाह

लेखक
डॉ. गजानन श्रीपत खैर,
एम्. ए. पीएच्. डी.



शके १८५७ ] किंमत १ रुपया [ सन १९३५




# प्रयोजन

'जगांतील समाजक्रांति,' असें नांव देण्यांत अतिव्याप्तीचा दोष झाल्यासारखें वाचकांना प्रथम वाटेल. मुख्यत: पाश्चात्य देशांचा विचार या ग्रंथांत केलेला असला तरी त्यांच्या विचारांचा परिणाम आज सर्व जगावर होत आहे या अर्थानें वरील शब्दयोजना केली आहे. 'क्रांति' या शब्दयोजनेंत राजकीय क्रांति येवढाच अर्थ अभिप्रेत नाहीं; आज जागतिक समाजांत चाललेल्या सार्वांगिक परिवर्तनाच्या वेगाची कल्पना वाचकांना द्यावी असा उद्देश आहे.

पाश्चात्य समाजाचें निरीक्षण करितांना प्रत्येक क्षणीं "माझ्या देशाच्या व समाजाचे दृष्टीनें याचा अर्थ काय?" असा प्रश्न लेखकाचे मनांत उभा होता. जगाचा विचार करितांना हिंदुस्थानचा प्रश्न दृष्टिआड झालेला नाहीं.

उपलब्ध वेळामध्यें प्रत्यक्ष निरीक्षण, भेटी, संभाषण इ. मार्गांनीं मिळविलेली अस्सल माहिती या लेखनांत देण्याचा प्रयत्न केला आहे. वाचकांना इतरत्र ग्रंथसाधनानें मिळणारी किंवा केवळ प्रवासवर्णनविषयक माहिती देण्याचें यांत टाळलें आहे. समाज, त्याच्या मुळांशीं असलेली विचारमालिका, व या सर्वांच्या पुढें आपल्या देशावर होणारा संभवनीय परिणाम हा या ग्रंथाचा मुख्य विषय आहे.

अशा प्रकारचे हिंदुस्थानविषयक ग्रंथ पाश्चात्य भाषांमध्यें अनेक आहेत. परंतु देशी भाषांमध्यें अद्याप अशा स्वरूपाचे ग्रंथ फारसे उपलब्ध नाहींत. जगाची ओळख होण्याचे दृष्टीनें यांची संख्या वाढणें इष्ट आहे.

'पाश्चात्य देशांकडे पाहून काय मिळणार आहे, आपली परिस्थिति अगदीं निराळी आहे,' असें उपहासपूर्वक म्हणणारा एक समाजवर्ग आहे. जगांत काय घडामोडी चालल्या आहेत त्या न पाहतां आंधळेपणानें आपल्याच जुन्या मार्गानें चालल्यामुळें आज ही अवनति आलेली आहे. ती नाहींशी करावयाची असेल तर डोळसपणें जगाकडे पाहून, त्यांतील प्रभावशाली विचार व चळवळी यांपासून इष्ट तो बोध घेऊन, त्याचा आपल्या

तत्त्वज्ञानांत, ध्येयमालिकेंत व कार्यक्रमांत समावेश केला पाहिजे. नाहींपेक्षां जगांतील व आपल्यांतील अंतर कधींच कमी होणार नाहीं.

पुणें अ. वि. गृहांत बारा वर्षें शैक्षणिक कार्य केल्यानंतर पाश्चात्यांची शिक्षणविषयक प्रगति समक्ष पाहावी असा विचार मनांत आला त्याप्रमाणें अमेरिकेंत दोन वर्षें शिक्षण व निरीक्षण केल्यानंतर इंग्लंड, रशिया, जर्मनी, इटली इ. देशांत थोडाथोडा मुक्काम करून तेथील समाजांची व शिक्षणपद्धतींची पाहणी केली. खर्चापैकीं निम्मा भाग स्वावलंबनानें भागला व निम्मा पुणें अ. वि. गृहानें दिला.

प्रत्येक देशाचा समाज, त्याच्या संस्था, व त्याची राजकीय मनोवृत्ति या गोष्टींचें परीक्षण केल्याखेरीज त्याच्या शिक्षणपद्धतीचें मर्म कळत नाहीं. पाश्चात्य समाजाची भूमिका या ग्रंथांत दिली आहे. त्यांच्या शिक्षणपद्धतींचा विचार दुसऱ्या ग्रंथांत केला जाईल. "पाश्चात्य देशांतील शिक्षणपद्धति" हा ग्रंथ लौकरच प्रकाशित करावा अशी योजना आहे.

सामान्य, सुशिक्षित, जिज्ञासू आणि विचारी वाचकाला हें लेखन उपयुक्त, मनोरंजक व विचारसूचक होईल अशी अपेक्षा आहे. आजच्या घडामोडींच्या जगांत डोळसपणानें राहणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला यांतील माहितीचा व विचारांचा चांगला उपयोग होईल.

प्रत्येक देशांतील घडामोडींच्या मुळाशीं त्या समाजाचीं सामाजिक आणि राजकीय ध्येयें व तत्त्वें असतात. त्यांची माहिती झाल्यास रोज वृत्तपत्रांत येणाऱ्या घडामोडींचा अर्थ चांगला कळतो. या ग्रंथाचे वाचनानें वाचकाला जगांत चाललेल्या आंदोलनांचे मुळांशीं काय सूत्रें आहेत त्यांचा बोध होईल.

यांतील कांहीं लेख निरनिराळ्या ठिकाणीं पूर्वीं आलेले असले तरी त्यामुळें या ग्रंथाची एकसूत्रता ढळलेली नाहीं. स्थलमर्यादेस्तव महत्त्वाच्या गोष्टींचा व विचारांचाच प्रपंच यांत केलेला आहे. त्यामुळें माहिती व चर्चेचे दृष्टीनें पूर्णतेची व साकल्याची महत्त्वाकांक्षा लेखकानें ठेविलेली नाहीं.

कार्तिक शु. १, १८५७ }
विद्याभवन, पुणें. }

**ग. श्री. खैर**
२८।१०।३५

इदं न मम।

पुणें अनाथ विद्यार्थी गृहाचे कुलगुरु

श्री. विष्णु गंगाधर ऊर्फ

# दादासाहेब केतकर



यांना प्रेमपूर्वक समर्पण

गजानन श्रीपत खैर

## डॉ. ना. भि. परुळेकर, एम्. ए. पीएच्. डी.

## संपादक 'सकाळ' यांची

# प्रस्तावना

काऊंट कायसरलिंक या प्रसिद्ध जर्मन तत्त्ववेत्त्यानें 'ट्रॅव्हल डायरी ऑफ ए फिलॉसफर्' (Travel Diary Of A Philosopher) या नांवाचा एक ग्रंथ लिहिला आहे. रवींद्रनाथ टागोर यांच्या शांतिनिकेतनच्या धर्तीवर जर्मनींत 'डार्मस्टाट्' (Darmstadt) येथें 'स्कूल ऑफ वुईज्डम' (School of Wisdom) नांवाची संस्था कायसरलिंकनें चालविली आहे. डॉ. खैर यांचें 'जगांतील समाजक्रांति व हिंदुस्थान' हें पुस्तक कायसर-लिंकच्या 'ट्रॅव्हल डायरी ऑफ ए फिलॉसफर' या पुस्तकाच्या धर्तीवर आहे. कायसरलिंक जर्मन असला तरी जर्मनीची उन्नति कशी व्हावी हा मोठासा प्रश्न त्याच्यापुढें नव्हता. त्यामुळें त्याचा ग्रंथ अधिक तात्त्विक झाला आहे. उलटपक्षीं अमेरिकेपासून रशियापर्यंत डॉ. खैर यांनीं कांहीं वर्षें राहून प्रवास केला, त्यांत हिंदुस्थान हा देश त्यांनीं आपल्या बरोबर ठेविला होता. प्रत्येक गोष्ट पाहातांना तिचा उपयोग आपल्या देशांत कसा होईल हा विचार त्यांच्यापुढें नेहमीं असे. त्यामुळें डॉ. खैर यांचा ग्रंथ अधिक व्यावहारिक, विचारप्रवर्तक व मार्गदर्शक झाला आहे.

हें पुस्तक वाचतांना यूरोपांतील प्रत्येक नवीन सामाजिक, राजकीय व तात्त्विक चळवळीची कल्पना येते. त्याचबरोबर प्रवासांतील निरीक्षण असल्यानें शाळेंतील विद्यार्थ्यांपासून तों प्रौढ विचारवंतांपर्यंत सगळ्यांनाच हें पुस्तक अथपासून इतिपर्यंत वाचावेंसें वाटेल आणि वाचल्यानंतर आपल्या देशांत डोकावूं पाहणाऱ्या नवीन नवीन गोष्टींची सांगता कशी करावयाची याचा प्रश्न डोळ्यापुढें उभा राहील.

पदवी मिळविण्याकरितां परदेशाला जावयाचें व परत आल्यानंतर पदवी आणि वशिला यांच्या जोरावर नोकरी मिळवून सुखानें कालक्रमणा

करावयाची अशा वैयक्तिक महत्त्वाकांक्षेसाठीं परदेशीं जाणाऱ्यांचा मोठा वर्ग आहे. ते निरीक्षण करूं शकत नाहींत व केलें तरी त्याला विचाराच्या दृष्टीनें महत्त्व नाहीं. त्याचप्रमाणें यूरोप अमेरिकेंत प्रवास करून तेथील शहरें, इमारती व कारखाने यांच्या मोठेपणाच्या हकीकती देणारीं प्रवास-वर्णनेंही आमच्याकडे आहेत. परंतु जगांतील निरनिराळ्या देशांतील समाज-क्रांतींचें निरीक्षण करून हिंदुस्थाननें त्यापासून काय शिकलें पाहिजे अशा दृष्टीचा विचारप्रवर्तक ग्रंथ मराठींत नाही. तो डॉ. खैर यांनीं लिहिला आहे.

यूरोप, अमेरिकेंतून हिंदुस्थानांत आपण यंत्रें आणतों, त्याचप्रमाणें तिकडील अनुभव आणला पाहिजे. हा अनुभव स्वतःच्या गरजा व विचार यांच्या मुशींत ओतून नंतर हिंदी संस्कृतीची पुर्नघटना केली पाहिजे, हा डॉ. खैर यांच्या ग्रंथांतील मुख्य विचार आहे. आम्हांला भाषांतरित संस्कृति नको किंवा व्यावहारिक दृष्ट्या कुचकामाची ठरलेली केवळ पूर्वापार म्हणून प्रिय वाटणारी दुरभिमानाची देशी संस्कृति नको. ही गोष्ट जितकी स्पष्ट मनांत बिंबेल तितका आमचा आचार सुधारेल व या देशाचें पाऊल पुढें पडेल. यापुढें परदेशांतच काय पण स्वदेशांत सुद्धां प्रवास करूं इच्छि-णाऱ्यांनी डॉ. खैर यांच्या पुस्तकांतील निरीक्षणाची पद्धत उचलावी. अश तऱ्हेनें आपण जगाकडे पाहूं लागल्यास नवीन मार्ग दिसूं लागतील व आंधळ्यासारखे जित आणि पतित म्हणून जगांत कशी तरी कालक्रमणा करीत राहण्याचें कारण उरणार नाहीं.

धनत्रयोदशी, शके १८५७
'सकाळ' कचेरी.
पुणें २

ना. भि. परुळेकर
२५ ऑक्टोबर १९३५

———

# अनुक्रमणिका

## विभाग पहिला

### अमेरिकाः तीन शतकांतील नवी संस्कृति



## विभाग दुसरा

### रशियाः पंधरा वर्षांतील क्रांति

## विभाग तिसरा

### जर्मनी, इंग्लंड व इटली : पुराण संस्कृतींचें संरक्षण



## विभाग चौथा

### जग व हिंदुस्थान : आजचे विचारप्रवाह

अमेरिकन जीवनांत सौख्य व ऐश्वर्य आणणारे दोन संशोधक



एडिसन व स्टाईनमेट्झ

शिकागोमधील Century of Progress या प्रदर्शनांतील
विज्ञान--मंदिर



नवीन संस्कृतीला अनुरूप अशी अभिनव शिल्पकला

# जगांतील समाजक्रांति व हिंदुस्थान

विभाग पहिला

## अमेरिका : तीन शतकांतील नवी संस्कृति

प्रकरण पहिलें

### अमेरिकन संस्कृतीचें स्वरूप

**हिंदी पंडिताला संशोधनाची संधि**

महाभारतांत अशी कथा आहे कीं, अर्जुन पाताळ लोकांत गेला आणि तेथें त्यानें उलूपी नांवाच्या राजकन्येशीं लग्न केलें. एका हिंदी ग्रंथकारानें असा तर्क बांधला आहे कीं, इतिहासदृष्ट्या अर्जुन अमेरिकेंत आला आणि तेथील ताम्र लोकांच्या एका राजघराण्याशीं त्यानें शरीरसंबंध जोडला. भारतांतील मयासुर शिल्पकलेविषयीं प्रसिद्ध आहेत. पांडवांनीं मयाच्या साहाय्यानें एक सुंदर राजवाडा बांधून त्यांत चमत्कृतिपूर्ण देखावे योजिले होते. अमेरिकेंतील रेड इंडियन लोकांत " मय " नांवाचे लोक असून त्यांच्या शिल्पकलेच्या नमुन्यावर नवीन इमारतींची योजना होत आहे. शिकागो प्रदर्शनांत असेंच एक मयमंदिर उभारण्यांत आलें होतें. कांहीं अमेरिकन शहरें, सरोवरें आणि नद्या यांना रेड इंडियन नांवें दिलीं आहेत, त्यांची आर्य भाषांशीं फार साम्यता दिसते; उदाहरणार्थ केयुग सरोवर, अष्टबुला शहर, अशोक धरण इ.इ. हिंदी भाषांशीं चांगला परिचय असलेल्या एकाद्या

पंडितानें तेथें जाऊन व तेथील ताम्र लोकांच्या संस्कृतीचें अध्ययन करून वरील प्रश्नाचा अखेर निर्णय लावणें अवश्य आहे.

रेड इंडियन लोकांपासून युरोपियन वसाहतवाल्यांनीं अमेरिका खंडाचें स्वामित्व घेतलें आणि त्यावर गेल्या तीन शतकांत एक अभूतपूर्व अशी संस्कृति निर्माण केली. त्यांनीं अरण्याचें नंदनवनांत रूपांतर केलें. श्वापदें राहात होतीं तेथें प्रचंड शहरें निर्माण केलीं, नैसर्गिक शक्तीपासून मुबलक वीज तयार केली आणि तिला नोकराप्रमाणें हरएक कामांत राबावयास लावलें. जेथें धड पाऊलवाटा नव्हत्या तेथें राजमार्ग निर्माण केले आणि मानवाचा कधीं शिरकाव झाला नाहीं तेथें लोहमार्गाचे साहाय्यानें लोकवस्ती नेऊन संस्कृतिवर्धनाचें कार्य चालू ठेवलें. प्राचीन काळीं आर्य लोकांनीं हिंदुस्थानांत प्रवेश करून हळुहळू दक्षिणेंतून सिंहलद्वीपापर्यंत वसाहती केल्या, त्याच इतिहासाची आवृत्ति अमेरिकेच्या इतिहासांत पुष्कळ अंशानें झालेली आहे. नवीन प्रदेशाक्रमणाचें हें कार्य गेल्या शतकांत पूर्ण झालें असून सध्या निसर्गसंपत्तीचें मानवी सुखांत रूपांतर करण्याचें कार्य चालू आहे. अरण्यें, शेती आणि खाणी यांतून निघणाऱ्या द्रव्याचें मानवी बुद्धीच्या आणि यंत्राच्या साहाय्यानें भौतिक संपत्तींत रूपांतर केलें आहे. ही सर्व क्रिया इतक्या वेगानें आणि उत्साहानें झाली कीं त्या योगानें आज अमेरिका सर्व जगांत संपत्तिमान देश बनला असून, सर्व युरोपियन सत्ताधारी राष्ट्रांना त्याचा हेवा वाटू लागला आहे.

अरण्याचे जागीं नंदनवन

युरोपियन राष्ट्रांचे पाठीशीं गेल्या दोन हजार वर्षांची बरीवाईट संस्कृति आणि परंपरा आहे. त्या संस्कृतीच्या जोरावर अमेरिकेला तुच्छ लेखून तिला संस्कृतिहीन आणि परंपराहीन म्हणून दोषदृष्टीनें पाहण्याची युरोपियन वृत्ति आहे. विशेषतः सध्यां अमेरिका धनको

व युरोपियन राष्ट्रें ऋणको असल्यानें या वृत्तीला स्वार्थाची ज़ोड मिळाली आहे. हिंदुस्थानच्या मागें सहा हजार वर्षांची संस्कृति आहे आणि आपण हिंदी लोक रूढी आणि परंपरा यांचे गुलाम आहोंत असें आपण म्हणतों; परंतु अमेरिकेचे मानानें पाहिलें म्हणजे युरोपियन राष्ट्रेंहि हिंदुस्थानप्रमाणेंच आपापल्या रूढिपरंपरेचे गुलाम आहेत, आणखी दोन हजार वर्षांनीं अमेरिकेचीहि तीच स्थिति होईल. परंतु तुलनात्मक दृष्टीनें पाहतां आज अमेरिकन लोक रूढिमुक्त आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यामुळें हरएक क्षेत्रांत नवीन नवीन प्रयोग करण्याची त्यांची तयारी असते. ही प्रयोगप्रवृत्ति अमेरिकेच्या प्रकर्षाचें बीज आहे ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. समाजरचना, आर्थिक घटना, शिल्पकला, मानवी जीवनपद्धति, आणि समाजव्यवहार या सर्व क्षेत्रांत नवीन दृष्टीनें संस्कृतिवर्धनाचें कार्य चालू आहे. नवीन समाज निर्माण करण्याची प्रक्रिया जेथें चालू आहे अशा अमेरिका–रशिया सारख्या राष्ट्रांच्या मार्मिक गुणदोष–परीक्षणापासून हिंदुस्थानाला पुष्कळ बोध मिळण्यासारखा आहे.

अमेरिकन संस्कृतीचें परिशीलन करितांना अमेरिकन समाजाचें एक वैशिष्टय जमेस धरलें पाहिजे. साधारणपणें बहुतेक राष्ट्रांची

**अमेरिकन समाजाचें स्वरूप**

अशी स्थिति आहे कीं, त्यांतील समाज हा वर्ण, भाषा, परंपरा आणि संस्कृति यांचे दृष्टीनें समान स्वरूपाचा असतो; परंतु अमेरिकेची तशी स्थिति नाहीं. धार्मिक, राजकीय अथवा आर्थिक कारणामुळें युरोपांतील अनेक देशांतील रहिवाशी अमेरिकेच्या किनाऱ्यावर आश्रयाकरितां आले आणि नंतर हळूहळू देशांत चोहोंकडे पसरले. वसाहतीकरितां येणाऱ्या समाजाच्या अनेक लाटांच्या मिश्रणानें अमेरिकन समाज-

पुरुष बनलेला आहे. त्यांत इंग्लिश, फ्रेंच, जर्मन, रशियन, ग्रीक, इटालियन, चिनी आणि जपानी अशा सर्व लोकांचा भरणा आहे. कांहीं लोकांची पहिलीच पिढी अमेरिकेंत आहे तर कांहींच्या दोनतीन पिढ्या येथें गेलेल्या आहेत. मूळ देशांतून आणलेली भाषा, परंपरा, संस्कृति, राहणी, विचारसरणी आणि कला पहिल्या एक दोन पिढ्या कायम राहतात आणि नंतर हळुहळू अमेरिकन विराट् संस्कृतींत विलीन होतात. येथील लोकवस्तीपैकीं शेंकडा तीस चाळीस लोक नुकतेच परदेशांतून येऊन येथें स्थाईक झालेले आहेत, आणि अद्याप पूर्ण अमेरिकन व्हावयाचे आहेत विविध वृत्तीच्या आणि संस्कृतीच्या या लोकांना एका संस्कृतीचें शिक्षण देऊन त्यांचें एक राष्ट्र बनविणें हा अमेरिकेपुढें सतत प्रश्न आहे. अमेरिकेच्या गुणदोषांचें निरीक्षण करितांना तिच्या समाजरचनेंत असलेल्या या अडचणी अवश्य लक्षांत घेतल्या पाहिजेत. एक भाषा, एक संस्कृति, एक वर्ण यांचा फायदा युरोपियन राष्ट्रांना आहे तसा अमेरिकेला नाहीं.

हिंदी दृष्टीनें महत्त्व

हिंदुस्थानच्या दृष्टीनें हा प्रश्न महत्त्वाचा आहे. हिंदी राष्ट्र स्वराज्याला नालायक आहे असें म्हणणारे लोक आपल्या समर्थनार्थ हिंदुस्थानांतील भाषा, वर्ण व धर्म यांची विविधता दाखवीत असतात. अशा लोकांच्या तर्कपद्धतीस अनुसरून अमेरिकाहि स्वातंत्र्यास नालायक ठरली पाहिजे. परंतु उलट इतक्या अडचणींना तोंड देऊन तिनें भौतिक सामर्थ्याचे क्षेत्रांत युरोपियन राष्ट्रांवर मात केली आहे. त्याचें कारण समाजांत असलेल्या विविधतेवर जोर न देतां समाजाला शिक्षण देऊन त्याला एकध्येयानें निगडित करण्याचा अमेरिकेनें प्रयत्न केला आहे. लोकशिक्षणावर अमेरिका जितका खजिना खर्च करते तितका रशियाव्यतिरिक्त कोणत्याच देशांत खर्च केला जात नाहीं. हिन्दी

समाजांतहि विविधता आहे; परंतु ही विविधता अद्याप एकध्येयानें निगडित व एकजीव झालेली नाहीं. समाजापुढें सर्वाकर्षक आणि उच्च असें समाजध्येय ठेवून आणि शिक्षण देऊन त्याला निगडित करण्याचा प्रयत्न प्रस्थापित सत्तेकडून झालेला नाहीं. हिंदी राष्ट्राच्या पुनर्घटनेंत ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची असून अमेरिकेनें योजिलेल्या साधनांचा आपणाला पुष्कळ उपयोग होण्याजोगा आहे.

---

प्रकरण दुसरें

# सुखसोयींची समृद्धि कशी झाली ?

अमेरिकेंत प्रवास करणाऱ्या व्यक्तीला एक गोष्ट चटकन् दिसते ती म्हणजे निसर्गाची विविधता आणि मानवी संस्कृतीची एकतानता.

निसर्गांतील विविधता

अमेरिका खंडांतील युनायटेड् स्टेट्स्‌चा आकार हिंदुस्थानच्या दुप्पट आहे. स्वाभाविकपणेंच हिंदुस्थानांत दक्षिणेंतून उत्तरेकडे जातांना जी निसर्गविविधता दिसते ती येथेंहि आढळते. महाराष्ट्राप्रमाणें डोंगराळ मुलूख कांहीं संस्थानांत आहेत तर उत्तर हिंदुस्थानप्रमाणें विस्तीर्ण मैदानेंहि कांहीं संस्थानांत आहेत. कांहीं क्षेत्रें अत्यंत सुपीक आहेत तर कांहीं ठिकाणीं रेताड प्रांत आहेत. उत्तरेंतील कांहीं संस्थानें अत्यंत थंड आहेत तर दक्षिण भागांतील कांहीं प्रांत हिंवाळ्यांतहि हिंदुस्थानप्रमाणें उष्ण अथवा समशीतोष्ण आहेत. सारांश, प्रत्येक संस्थानांत आणि प्रांतांत निसर्गरचनेंत स्वाभाविक विविधता आहे.

परंतु निसर्गावरून नजर फिरवून मानवी सृष्टीकडे पाहिलें

म्हणजे याचें अगदीं उलट प्रकार दिसतो. अतिशयोक्तीनें म्हणावयाचें झाल्यास हिंदुस्थानांत कोसाकोसावर भाषा, पेहेराव, शिल्पकला, राहणी आणि समाजाचें बाह्य स्वरूप यांत फेरबदल दिसतो. मद्रासेतील पोषाख निराळा, देवळाचा घाट निराळा आणि घरांची रचना निराळी; त्याचप्रमाणें मुम्बई, कलकत्ता, लाहोर या प्रत्येक प्रांतांना आपापल्यापरी वैशिष्टय आहे, आणि प्रवाशाला आपण कोठें आहोंत तें चटकन् लक्षांत येतें. उलट अमेरिकेंत एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत—न्यूयॉर्कपासून सानफ्रान्सिस्कोपर्यंत—प्रवास केला तरी शहरें आणि राहणी यांत किंचित्‌हि फरक दिसत नाहीं. अमेरिकेंत कोणत्याहि मोठ्या शहरांत प्रवासी फिरला तरी त्याला आपण न्यूयॉर्कमध्यें आहोंत असें बाह्य स्वरूपावरून वाटल्यावांचून राहात नाहीं. मोठीं शहरें सारखीं, त्याचप्रमाणें लहान खेडींहि एकमेकांसारखींच आहेत. प्रत्येक गांवांत ठराविक गोष्टी सांपडावयाच्या म्हणजे नाक्यावर गॅसोलीन स्टेशन, 'कोईबी चीज ५–१० सेंट' स्वरूपाचे स्टोअर्स, एकाच स्वरूपाचीं सिनेमागृहें, खाणावळी, उपाहारगृहें, नापितगृहें आणि मोटारलॉरीजचे स्टँड या होत. त्याचप्रमाणें प्रत्येक गांवांत हटकून सांपडणाऱ्या संस्था म्हणजे शाळा, ग्रंथसंग्रह, प्रदर्शनालय, वाय्. एम्. सी. ए. सारख्या संस्था आणि दवाखाने. लहानमोठ्या प्रत्येक गांवांत विजेची सोय रस्त्यांतून आणि घरांतून आहे. लहान गांवांनाहि ट्रामगाडीच्या सोयी आहेत. भिंतीवरच्या प्रचंड जाहिराती पाहिल्या तरी जागोजाग मालाच्या आणि कारखान्याच्या त्याच त्याच जाहिराती दिसतात. मिठाईच्या दुकानांत जावें तर न्यूयॉर्कमध्यें जी कँडी मिळते तीच हजार मैल दूर असलेल्या एखाद्या खेडयांतहि मिळेल. मासिकांच्या दुकानांत जावें तरी तीच स्थिति.

मानवी सृष्टींतील एकतानता

अमेरिकेंत दिसणारी ही एकतानता प्रवाशाचे दृष्टीनें गैर-सोयीची आणि कंटाळवाणी असली तरी ती नागरिकांचे दृष्टीनें सोयीची आणि भाग्याची आहे. हिंदुस्थानांत लहान गांवांत राहणारा नागरिक पुण्या–मुंबईंत राहणाऱ्या नागरिकांच्या सुखसोयींचा हेवा करीत असतो आणि जन्मांत एकदां तरी या शहरांत जाण्याची महत्त्वाकांक्षा बाळगतो. 'तात्या मला पुन्याला जायचं' किंवा 'मला मुंबइला जायचं' या सामान्यजनगानांचे मुळाशीं बहुजनसमाजाची हीच भावना दृष्टोत्पत्तीस येते. अमेरिकेंत मोठ्या शहरांत ज्या सुखसोयी नागरिकाला मिळतात, त्याच देशभर लहान नगरांतील रहिवाश्यांनाही मिळतात. अर्थात् लोकवस्तीच्या आकाराप्रमाणें कांहीं अपवाद सोडून दिले पाहिजेत. रोजच्या जीवनांत लागणाऱ्या वस्तू, करमणुकीचीं साधनें, आणि शिक्षणाच्या सोयी या देशभर पसरल्या आहेत, त्यामुळें देशाच्या कोणत्याहि भागांत राहणाऱ्या व्यक्तीला त्या सर्वांचा फायदा मिळतो. मी एक आठवडाभर एका खेडेगांवांत राहण्यास गेलों होतों. गांव अडीच तीन हजार वस्तीचें, परंतु मोठ्या शहराच्या बहुतेक सोयी तेथें होत्या. रस्ते सुन्दर आणि स्वच्छ, गांवांत विजेची सोय, आठवड्यांतून दोनदां सिनेमा अथवा बोलपट, मेसन्स लॉज, बहुतेक लोकांजवळ मोटारगाडया, छापखाना आणि स्थानिक वृत्तपत्र, शाळा इत्यादि सोयी या लहान गांवांत होत्या. मध्यम स्थितीच्या कुटुंबांत प्रत्येक घरीं रेडिओ, पियानो, सुन्दर गालीचे, खुर्च्या, पलंग, स्नानगृहें, नवीन पद्धतीच्या लोखंडी चुली, ग्रंथसंग्रह, मासिकें, इ. गोष्टी सांपडतात शहरापासून शेंकडों मैल लांब असलेल्या खेडयांतील मनुष्यही रात्रीं घरीं आला म्हणजे रेडिओच्या साह्यानें न्यूयॉर्क अथवा शिकागोमधील उत्कृष्ट संगीत, प्रसिद्ध मुत्सद्याचें भाषण,

सामान्य नागरिकांचें भाग्य

अथवा रविवारीं नाणावलेल्या उपाध्यायाचें प्रवचन ऐकूं शकतो. अमेरिकेचा प्रेसिडेंट बोलूं लागला म्हणजे देशाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत, शहरांतील आणि खेडयांतील सर्व लोक एकाच वेळीं त्याचें भाषण ऐकूं शकतात. लोकशिक्षणाचीं आणि संस्कृतिवर्धनाचीं हीं अफाट साधनें आज अमेरिकेनें निर्माण करून त्यांचा कानाकोपऱ्यांतून प्रसार केला आहे. महात्मा गांधी राऊन्ड टेबल परिषदेकरितां इंग्लंडमध्यें गेले असतां त्यांचें रेडिओवर एक भाषण झालें, तें अमेरिकेंत ऐकल्याचें मला एका खेडेगांवांत राहणाऱ्या गृहस्थानें सांगितलें !

अमेरिकेनें या सुखसोयी कशा निर्माण केल्या तें पाहण्यासारखें आहे. आर्थिक क्षेत्रांत अमेरिकेचा मुख्य भर मोठया प्रमाणावर

**समृद्धीची महत्त्वाकांक्षा**

वस्तू निर्माण करण्यावर (Mass Production) आहे. या तत्त्वाचा मुख्य पुरस्कर्ता हेन्री फोर्ड हा आहे. अमेरिकेंतील प्रत्येक शेतकऱ्याचे घरीं एक एक मोटार गाडी असली पाहिजे आणि ती त्याला परवडेल इतक्या थोडया किंमतींत मिळाली पाहिजे ही फोर्डची महत्त्वाकांक्षा गेल्या पंचवीस तीस वर्षांत फलद्रूप झाली असून आज अमेरिकेंत प्रत्येक चार माणसांगणिक एक मोटार गाडी आहे; म्हणजे सरासरी प्रत्येक कुटुंबाला एक गाडी आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. फोर्डचें हें एक उदाहरण झालें. हेंच तत्त्व उद्योगधंद्याच्या प्रत्येक क्षेत्रांत अमेरिकन लोकांनीं लागू केलें. असंख्य वस्तू थोडया वेळांत आणि थोडया खर्चांत निर्माण करण्याकरितां यंत्रसुधारणा झाली पाहिजे. त्याकरितां प्रत्येक कारखान्यांतून (Research Departments) संशोधनखातीं स्थापन करण्यांत आलीं. त्यांत बुद्धिमान् शास्त्रज्ञांनीं परिश्रम करून अचाट शोध लाविले आणि अजब यंत्रें शोधून काढलीं. यांत्रिक

करामतीच्या कामांत अथवा Technology मध्यें या लोकांनीं कळस बांधला. वस्तू स्वस्त करण्याकरितां मजुरी वांचली पाहिजे आणि मजुरी वांचण्याकरितां मजुरांवांचून चालणारीं स्वयंचल Automatic यंत्रें शोधून काढलीं पाहिजेत. अशीं यंत्रें लहान मोठ्या प्रमाणावर सर्व ठिकाणीं पसरलीं आहेत. जें काम करण्याला पूर्वीं दोनअडीचशें माणसें लागत, तेंच काम एक मनुष्य एका प्रचंड स्वयंचल यंत्राचे साहाय्यानें करूं शकतो. विशेषत: महायुद्धाचे काळीं कारखान्यांत माणसांची कमतरता असल्यानें अशा प्रकारच्या यंत्रसंशोधनास पुष्कळ उत्तेजन मिळालें. सारांश, ( Mass Production ) वस्तुसमृद्धीचें अमेरिकेचें ध्येय होतें तें आज सिद्ध झालेलें आहे. त्यामुळें देशांत जीवनोपयोगी अशा असंख्य वस्तू निर्माण होत आहेत. स्वाभाविक-पणेंच त्या शहरांची मर्यादा ओलांडून खेड्यापाड्यांतून प्रत्येक शेत-कऱ्याच्या आणि मजुराच्या उंबरठ्यापर्यंत जाऊन पोंचल्या आहेत. या यांत्रिक प्रगतीला समृद्धीची एक उज्वल बाजू आहे तशीच बेकारी आणि आर्थिक विषमतेची दुसरी सदोष बाजू आहे, परंतु तो आर्थिक तत्त्वज्ञानाचा स्वतंत्र प्रश्न आहे.

**व्यक्ती व वस्तू यांचा अखंड प्रवाह**

वस्तुसमृद्धीच्या जोडीला अमेरिकेनें वाहनांच्या साधनांची जोड दिली ही दुसरी गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. अमेरिकेंत सर्व देशभर कॉंक्रीटचे मजबूत रस्ते झालेले आहेत, त्यामुळें मोटारींतून सुखानें प्रवास करितां येतो. देशाच्या कानाकोपऱ्यांतून रेल्वेचे रस्ते गेलेले आहेत, त्यामुळें कारखान्यांत होणारा माल देशभर पोंचविला जातो. न्यूयॉर्कमध्यें राहणारा मनुष्य भोजनास बसला म्हणजे त्याचे पानावर देशाच्या अष्ट दिशांपासून येणारे आठ जिन्नस वाढले जातात. अशा रीतीनें वस्तू आणि व्यक्ती

यांना एकप्रकारची अखंड गति प्राप्त झालेली आहे. एका प्रांतांत जन्मलेलीं आणि त्याच प्रांतांत पिढयानूपिढया वाढलेलीं अशीं कुटुंबें येथें फार क्वचित् सांपडतील. येथील लोकवस्ती सारखी प्रवाही आहे. त्यामुळें समाजांतील चालीरीती आणि जीवनपद्धति यांना एकप्रकारची एकतानता येण्यास पुष्कळशी मदत झालेली आहे.

सारांश, निसर्गदृष्टीनें अमेरिकेंत हिंदुस्थानप्रमाणेंच पुष्कळ विविधता आढळते. परंतु वस्तुसमृद्धि, वाहनवैपुल्य आणि प्रवाही लोकवस्ती यांचे योगानें देशाचे बाह्य जीवनांत साम्य आणि सारूप्य आलेलें आहे.

---

## प्रकरण तिसरें

# लोकशाहीचें व्यापक स्वरूप

इंग्लंडविरुद्ध स्वातंत्र्ययुद्ध

अमेरिकेचा जन्म स्वातंत्र्ययुद्धामुळें झालेला आहे. राष्ट्राच्या प्रारंभकाळीं जीं तत्त्वें प्रचलित असतात, त्या तत्त्वांची छाया राष्ट्राच्या इतिहासावर दूरवर पसरत असते असा सर्वसामान्य इतिहासाचा सिद्धांत आहे. एका वेळीं अमेरिका इंग्लंडची वसाहत होती. परंतु इंग्लंडच्या नेहेमींच्या स्वार्थी आणि बनिया वृत्तीमुळें अमेरिकेंत असंतोष उत्पन्न झाला. समानता आणि लोकशाही या तत्त्वांच्या आधारावर अमेरिकेनें इंग्लडविरुद्ध स्वातंत्र्ययुद्ध पुकारून विजय मिळविला, आणि तेंव्हांपासून अमेरिकेच्या स्वतंत्र जीवनास प्रारंभ झाला. इंग्लंडच्या जुलमापासून मुक्त झाल्यामुळें आणि अशा प्रकारचा एकतंत्री सत्तेचा जुलूम पुन्हां होऊं नये म्हणून अमेरिकन मुत्सद्दी आजपर्यंत काळजी घेत आलेले आहेत. The less government, the better या तत्त्वा-

प्रमाणें राजसत्ता अल्पसंख्य व्यक्तींच्या हातीं न ठेवतां बहुजन समाजाचे हातीं ठेविलेली बरी अशी आतांपर्यंतची अमेरिकेची राजकारणपरंपरा आहे.

मानवी समता हा अमेरिकन लोकशाहीचा पाया आहे. सर्वांना सारखी संधि दिली असतां प्रत्येक व्यक्तीचा उत्कर्ष होऊं शकतो आणि सामान्य माणसांतूनही अलौकिक पुरुष उत्पन्न होऊं शकतात, असा या लोकांचा सिद्धांत आहे. त्यामुळें अमेरिकेचा अध्यक्ष होण्यास प्रत्येक मनुष्य लायक आहे आणि त्या ईर्षेनें प्रत्येक व्यक्तीनें महत्त्वाकांक्षा बाळगून प्रयत्न करण्यास प्रत्यवाय नाहीं असा लोकसमज अद्यापपर्यंत प्रचलित आहे. सामान्य व्यक्तीच्या प्रसुप्त कर्तृत्वावर असा दृढ विश्वास असल्यामुळें त्या कर्तृत्वाचा विकास होण्याकरितां समान संधीचें तत्त्व अस्तित्वांत आलें. राजकारण, आर्थिक क्षेत्र आणि शिक्षण इ. सर्व क्षेत्रांत समान संधीचें हें तत्त्व खेळविल्यामुळें आजपर्यंत सामान्य जनांतून असामान्य पुरुष उदयास आलेले आहेत. त्यामुळेंच आजपर्यंत या देशाचें Land of Opportunity असें गौरवपूर्ण वर्णन केलें जात असे. युरोपमधील समाजरचनेंत सत्ताधारी वरिष्ठांच्या पायांखालीं तुडविलेल्या सामान्य जनांना अमेरिकेंत गेल्यावर ही संधि मिळत गेल्यामुळें आजपर्यंत युरोपमधून या देशाकडे लोकप्रवाह एकसारखा चालू होता.

सामान्य जनांनाही संधि द्या

मानवी समता आणि संधिस्वातंत्र्य या लोकशाहीच्या मूलभूत तत्त्वांची छाया अमेरिकेच्या सर्व जीवनावर आणि विचारांवर पडलेली आहे. बहुजन समाजाला शिक्षण दिल्याशिवाय आपली लोकशाही यशस्वी होणार नाहीं हें तत्त्व अमेरिकेनें युरोपियन राष्ट्रांचे आधीं ओळखलें,

व्यवहारांतील समतेचा अनुभव

आणि सर्व समाजाला सुशिक्षित करण्याकरतां प्राथमिक आणि दुय्यम शिक्षणपद्धति स्थापन केली. युरोपमध्यें दुय्यम शिक्षण हें फक्त श्रीमंतांच्या मुलांनाच साध्य असे. अमेरिकेनें गोरगरिबांना सर्वांना दुय्यम शिक्षण मोफत करून टाकलें. त्यामुळें गरीब वर्गांतून वरच्या दर्जाला येण्याला सर्वांना संधि मिळाली. अशा रीतीनें शिक्षण-क्षेत्रांत लोकशाहीचें तत्त्व अमलांत आणलें गेलें.

मानवी समतेचें तत्त्व व्यवहारांतही पदोपदीं सांपडतें. इंग्लंड-प्रमाणें अमीर उमराव Lords, Dukes इत्यादि वर्ग आपल्या समाजांत उत्पन्न होऊं नयेत अशी या लोकांनीं शक्य ती काळजी घेतली. श्रीमंत आणि गरीब, वरिष्ठ आणि कनिष्ठ, वरचा आणि खालचा, हे भेद जितक्या कमी प्रमाणांत दृग्गोचर होतील तितके चांगले ही येथील साधारण प्रवृत्ति आहे. काम संपल्याबरोबर मालक आपल्या नोकराला बरोबरीच्या नात्यानें वागवितो आणि प्रोफेसर आपल्या विद्यार्थ्यांना समतेच्या नात्यानें आणि आदरानें वागवितात. त्यामुळें सामान्य प्रतीचीं आणि खालच्या प्रकारचीं कामें करणारा मनुष्य असला तरी सर्व जग त्याला सामान्यतः बरोबरीच्या नात्यानें वागवीत असल्यामुळें त्याचे ठिकाणीं एक प्रकारचा स्वाभिमान आणि आत्म-विश्वास उत्पन्न होतो. कनिष्ठतेची भावना, Inferiority Complex, नसल्याकारणानें तो आपल्या वरिष्ठाबरोबर डोळ्यास डोळा भिडवून पाहतो आणि बोलतो. मानवी स्वभावाला धरून प्रत्येक ठिकाणींच हें तत्त्व लागू पडतें असें नाहीं, तर हा सर्वसामान्य सिद्धांत आहे. आगगाडीमधून पहिला, दुसरा, तिसरा असे वर्ग नसून सर्वांचा एकच वर्ग असतो. इंग्लंडांत स्थानिक वाहनांत (टयूबमध्यें) देखील हें वर्गवैशिष्टय आहे तसें अमेरिकेंत नाहीं. सामान्यतः सिनेमा थिएटर्समध्यें दोनच प्रकारचे दर आणि वर्ग

असून गरीब माणसालाही पुढच्या खुर्चीवर श्रीमंताच्या खांद्याशीं खांदा भिडवून बसतां येतें. सारांश संपत्ति आणि दर्जा यामुळें समाजांत एकीकडे वर्गपद्धति उत्पन्न होत असली तरी सामाजिक जीवनांत तिचें शक्य तितकें निर्मूलन करण्याची अमेरिकन समाजाची स्वाभाविक प्रवृत्ति आहे.

बहुजनसमाजाचे हिताची दृष्टि

सामान्य जनाच्या जीवनाचा सार्वांगिक विकास आणि त्याच्या सुखसोयी हा अमेरिकन लोकशाहीचा व्यापक अर्थ आहे. त्यामुळें कोणतीही सार्वजनिक हिताची गोष्ट करीत असतां सामान्य व गरीब वर्गाचें सुख आणि हित पुढाऱ्यांच्या डोळ्यांपुढें असतें. सुख आणि विलास श्रीमंतांनींच भोगावेत आणि गरीबांनीं फक्त काबाडकष्ट करून जेमतेम पोटापुरतें खावें आणि अंगापुरतें घालावें ही मत्सरी वृत्ति येथें नाहीं. किंबहुना श्रीमंतांना ज्या सुखसोयींच्या वस्तू मिळतात त्या किंवा तशाच प्रकारच्या वस्तू आणि सोयी गरिबांना कशा मिळू शकतील या दिशेनें सर्वांची विचारसरणी चालू असते. फोर्डच्या कर्तृत्वामुळें गरीब शेतकऱ्याला आणि मजुरालाही मोटार ठेवतां येते. मजुराला एक वेळीं राहण्याचें घर नसेल पण मोटारगाडी असेल, असा चमत्कार तेथें आहे. सुटीचे दिवशीं विश्रांति आणि क्रीडा करण्यास सामान्य जनांच्या आटोक्यांत असतील अशीं उद्यानें सरकारनें, व्यापाऱ्यांनीं अथवा परोपकारी संस्थांनीं निर्माण केलीं आहेत. तेथील गरिबांतील गरीब मुलगा असला तरी तो आठवड्यांतून एक तरी सिनेमा पाहतोच. १९२९ सालापासून अमेरिकेंत दुष्काळ ( Depression ) असला तरी तेथील गोरगरिबांचा पोषाख आणि त्यांची राहणी पाहिली तर यांना कांहीं कमी असेल अशी परदेशीयांना शंका देखील येणार नाहीं. न्यूयॉर्क शहर जगांत मोठें

म्हणजे साठ लाख वस्तीचें आहे. परंतु एकाद्या फाटक्या माणसा-लाही शहरच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत पांच सेंटच्या भाड्यांत जातां येईल अशी सोय आहे. अमेरिकेंत कांहीं वर्षें राहिलेला प्रवासी युरोपमध्यें आला म्हणजे त्याला चटकन् या दोन समाजांतील विरोध दृष्टोत्पत्तीस आल्यावांचून राहात नाहीं.

लोकशाही आणि एकतंत्रशाही हीं समाजव्यवहाराचीं दोन विरोधी तत्त्वें आहेत. अमेरिकन समाजाचा प्रयत्न लोकशाहीच्या दृष्टीनें अखिल समाजव्यवहार उभारावा असा आहे. कारखान्यामध्यें काम करणारे मजूर असले तरी ते विकासप्रवण मानव आहेत, त्यांना विचार आहेत आणि त्यांचा कारखान्याच्या उत्कर्षाकडे उपयोग करून घेतला पाहिजे, अशी कारखानदारांची वृत्ति असते. त्यामुळें कारखाना सुधाराव्या याविषयीं कामकऱ्यांच्या काय सूचना आहेत इकडेही चालकांचें लक्ष असतें. अमेरिकन कारखान्यांच्या यशाचें रहस्य काय आहे, असा मी एका अधिकाऱ्याला प्रश्न केला असतां त्यानें दोन कारणें सांगितलीं. एक प्रमुख कारण असें होतें: मजुरांच्या हाताप्रमाणें त्यांच्या डोक्याचाही उपयोग करून घेण्यांत येतो. हेंच कारभाराचें तत्त्व हळूहळू सर्व व्यवहारांत शिरत आहे. खात्यावरचा मुख्य अधिकारी केवळ स्वयंप्रसूत फर्मानें सोडून इतरांना यंत्राप्रमाणें कामाला लावीत नाहीं, तर हाताखालच्या माणसांनाहि स्वतःबरोबर विचार करावयास लावून, त्यांच्या व आपल्या विचारांची सांगड घालून, सर्वांच्या बुद्धिमत्तेचा उपयोग करून घेतो. स्वाभाविकपणेंच त्याला सर्वांची सहकारिता व सहानुभूति मिळते. अमेरिकेचे नवीन प्रेसिडेंट रूझव्हेल्ट यांनीं आपल्या सचिवमंडळांत सर्व प्रकारचे लोक घेतले, त्यांत युनिव्हर्सिटीचे प्रोफेसर येतात,

सर्वांच्या कर्तबगारीला वाव

यशस्वी व्यापारी येतात आणि धंदेवाईक राजकारणी मुत्सद्दीहि येतात. सर्वांच्या तात्त्विक आणि व्यावहारिक विचारांचा परिपाक बनवून आणि राष्ट्रांतील असामान्य बुद्धिवानांचा उपयोग करून घेऊन अध्यक्ष आपलें राजकारण चालवितो.

संधिस्वातंत्र्याचा दुरुपयोग

अमेरिकन लोकशाहीचा असा व्यापक अर्थ आहे. या समाजाची अनुकरणीय आणि उज्वल अशी बाजू आहे तशीच एक विरोधी बाजूही आहे. स्वातंत्र्य, समता आणि संधिस्वातंत्र्य यांचा जेथें चांगल्या गोष्टीकरितां आणि जबाबदारीनें उपयोग करून घेतला गेला आहे, तेथें समाज उन्नत झाला असून, सामान्य जनांचें हित झालेलें आहे. परंतु जेथें या समानता-स्वातंत्र्य-संधीचा स्वार्थी लोकांनीं आपमतलबाकडे उपयोग करून घेतला आहे तेथें अमेरिकन समाजाचा अपकर्ष झाला असून, तो लोकशाहीच्या आणि सामान्य जनहिताच्या ध्येयापासून च्युत झालेला आहे. अमेरिकेसारख्या सुपीक आणि संपन्न देशांत कर्तबगारीची संधि मिळाल्यामुळें, कार्नेगी, फोर्ड, रॉकफेलरसारखे लोक उदयास आले आणि त्यांनीं राष्ट्राची आधिभौतिक संपत्ति वाढविली. परंतु त्यांनीं ती स्वतःच्या मालकीची केली, त्यामुळें हळुहळू असें झालें आहे कीं, राष्ट्रांतील शेंकडा नव्वद टक्के संपत्ति मूठभर लोकांचे हातांत एकवटली असून राजसत्तेविरुद्ध असलेल्या या देशांत हे लोक राजे झाले आहेत, व त्यांना Oil King, Iron King अशा संज्ञा प्राप्त झाल्या आहेत. कारखानदारांनीं मजुरांच्या आणि शास्त्रज्ञांच्या बुद्धिमत्तेचा उपयोग करून स्वतःचा उत्कर्ष केला, परन्तु या उत्कर्षांत मजुरांना आणि शास्त्रज्ञांना त्यांचा वाजवी भाग दिला नाहीं. राजकारणांत सामान्य जनाला पुढें

येण्याची संधि मिळाली, परंतु त्यांपैकीं कित्येकांनीं या अधिकाराचा उपयोग लोकहिताकडे करण्यापेक्षां स्वत:चींच तुंबडी भरण्याकडे केला.

स्वातंत्र्याला जबाबदारीचें, समानतेला लोकहिताचें आणि संधिस्वातंत्र्याला नीतीचें बंधन कसें घालतां येईल हा यापुढें अमेरिकन समाजाचे पुढील प्रश्न आहे आणि तो त्यानें सोडविण्यास आरम्भ केला आहे.

---

प्रकरण चौथें

## काळाबरोबर वाढणारी धर्मसंस्था

यूरोपमधून अमेरिकेंत वस्ती करण्यास लोक गेले त्याला अनेक कारणें होतीं. वैयक्तिक मताप्रमाणें धर्माचरण करण्यास स्वातंत्र्य मिळावें या उद्देशानें कित्येक लोक तेथें जाऊन राहिले आणि तेव्हांपासून धर्मस्वातंत्र्याची परंपरा अमेरिकेंत सुरू झाली. अधिकारारूढ राजकीय सत्तेनें आपल्या धर्माचा जुलूम इतरांवर करूं नये म्हणून अमेरिकन राज्यघटनेंत धर्म आणि राजकारण यांची फारकत केली आहे. सरकारी शाळांतून धर्माचें शिक्षण दिलें जात नाहीं, त्याची व्यवस्था पालकांनीं आपल्या इच्छेप्रमाणें स्वतंत्र रीतीनें करावी, ज्या शाळांतून एकाच विवक्षित धर्माचीं मुलें असतील तेथें फक्त बायबल वाचण्याची परवानगी असते. त्यावर वैयक्तिक मताप्रमाणें भाष्य करितां येत नाहीं. कॅथॉलिक लोक फार धर्मनिष्ठ असल्याकारणानें त्यांनीं आपल्या खासगी शाळा आणि कॉलेजें चालविलेलीं आहेत. त्यांना सरकारी तिजोरींतून मदत मिळूं शकत नाहीं. बहुसंख्य लोक

धर्म आणि राजकारण

प्रॉटेस्टंट असून त्यांचे खालोखाल कॅथॉलिक पंथी आणि त्यापेक्षां अल्पसंख्य असे यहुदी अथवा ज्यू लोक आहेत.

वाङ्मय, वैद्यक, इंजिनियरिंगप्रमाणेंच धर्माध्ययन करण्याकरितां कॉलेजें ( Theological Seminaries ) आहेत. यांत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना एम्. ए. पीएच. डी. पर्यन्त पदव्या मिळतात आणि नंतर त्यांना धर्मोपदेशकाचें कार्य करितां येतें. सारांश, धर्मोपदेशक होणाऱ्या व्यक्तीला आधुनिक उच्च शिक्षणाचे सर्व फायदे मिळून शिवाय धर्मशिक्षण मिळतें. या धर्मशिक्षणांत तुलनात्मक धर्माभ्यासाची (Comparative Religions ) एक शाखा असते, तिचाही अभ्यास बहुतेक धर्मोपदेशकांकडून केला जातो. विशिष्ट शिक्षणसंस्था आणि तेथील शिक्षक व्यक्ति यांच्या स्वभाववैचित्र्याप्रमाणें आकुंचित अथवा व्यापक धर्माचें शिक्षण या धर्मपीठांतून देण्यांत येतें. सामान्यतः असें म्हणावयास हरकत नाहीं कीं, या क्षेत्रांतील पुढारलेल्या संस्थांचें आणि व्यक्तींचें वजन पुढील पंचवीस वर्षांत इतर धर्मशिक्षणावर अधिक बसेल. धर्माचें आगर असलेल्या हिंदुस्थानांत सामान्य उपाध्यायाचें शिक्षण कांहीं संहितेपुरतेंच मर्यादित असतें; संहितेच्या अर्थबोधाचा अंतर्भाव त्यांत क्वचितच होतो. अर्थासहित वेदाध्ययन करणारे पंडित थोडे आणि आधुनिक शिक्षणाबरोबर धर्मशिक्षण घेणारे त्याहूनही थोडे. अशा कार्यक्रमानें धर्माचा आणि अध्यात्माचा उत्कर्ष कसा होतो तें स्पष्टच आहे. अध्ययनाचे आणि अभ्यासक्रमाचे दृष्टीनें अमेरिकेंत धर्मोपाध्यायाचें शिक्षण अधिक व्यापक होतें. अध्यात्मोत्कर्ष करणाऱ्या आम्ही, आमच्या धर्मशिक्षणाची व्याख्या व्यापक केली पाहिजे हा बोध महत्त्वाचा आहे. आधुनिक शिक्षण, शास्त्र, संस्कृति, राज-

धर्मोपदेशकाचें शिक्षण

कारण, समाजांतील घडामोडी इत्यादि दृष्टींनीं अमेरिकन धर्मोपाध्याय जांगरूक व सुसंस्कृत असल्यामुळें त्यांचीं प्रवचनें ऐकण्यास विद्वान् व सुशिक्षित माणसेंहि जातात. शिक्षण, सामाजिक नीति, युद्ध कीं शांतता, समाजवाद कीं लोकशाही इ. राजकीय प्रश्नांतही हे धर्मोपाध्याय पुढाकार घेत असल्याकारणानें सामान्य जनतेवर त्यांचा नैतिक पगडा असतो. वैयक्तिक जीवनाकरितां हा धर्मोपाध्याय समाजांतील व्यक्तींवर अवलंबून नसतो. स्थानिक चर्चसंस्था त्याचा योगक्षेम चालविते, त्याकारणानें समाजांत तो स्वाभिमानानें राहूं शकतो. यजमानापुढें खालीं मान घालण्याचा प्रसंग त्याला येत नाहीं.

चर्चचें कार्यक्षेत्र हें प्रार्थनेपुरतेंच मर्यादित राहिलेलें नाहीं. चर्चचा अर्थ दिवसेंदिवस अधिक व्यापक होत आहे. आध्यात्मिक

**अमेरिकन चर्चचें कार्यक्षेत्र**

जीवन हें मानसिक जीवनावर आणि मनही शारीरिक स्वास्थ्यावर अवलंबून आहे, याकरितां शारीरिक आणि मानसिक स्वास्थ्याचाही अंतर्भाव आध्यात्मिक कार्यक्रमांत केला जात आहे. अलीकडे जीं चर्चें बांधलीं जात आहेत त्यांत प्रार्थनेची आणि प्रवचनाची एक जागा असतेच. पण त्यापेक्षां दुप्पट तिप्पट जागा इतर कार्यक्रमांकरितां राखून ठेवलेली असते. त्यांत तरुण पिढीच्या व्यायामाची सोय, पोहण्याचे तलाव, स्नानगृहें, उपाहाराची व्यवस्था, चर्चामंडळाकरितां खोल्या, कलांचें अध्ययन करणारांकरितां लहान स्टुडिओ इ. व्यवस्था असते. प्रार्थनेला न येणाऱ्यांनींही वरील सोयींचा फायदा घ्यावा. मूळभूत कल्पना अशी कीं, वरील कार्यक्रमांत रंगून गेलेल्या मनुष्याला मानसिक स्वास्थ्य प्राप्त झालें आणि त्याला सुख मिळालें तरी तो अध्यात्माचे मार्गाला लागला. या व्यापक कार्यक्रमामुळें केवळ धर्मोपदेश जिला रुक्ष

वाटतो अशी तरुण पिढीही चर्चचे नैतिक क्षेत्रांत येते आणि हळुहळू अध्यात्मशील बनते.

धर्ममताचे दृष्टीनें विचार करितां अमेरिकेंतील वृद्ध पिढी आणि तरुण पिढी यांत विरोध आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. वृद्ध पिढी धर्ममताचे दृष्टीनें अधिक आकुंचित वृत्तीची आहे. ख्रिस्त आणि ख्रिस्ती धर्म यांचे बाहेर मोक्ष नाहीं अशी त्यांची प्रामाणिक भावना.

तरुण पिढीचा धर्म

त्याचाच उपसिद्धांत परदेशच्या मिशनऱ्यांना आर्थिक साहाय्य करून उत्तेजन देणें आणि अख्रिस्तांना शुद्ध करणें हा होय. परंतु तरुण पिढीची वृत्ति अधिक विनयशील व उदार आहे. ख्रिस्ती धर्म हा जगांतील एक पंथ आहे, परंतु त्याव्यतिरिक्तही इतर धर्म जगांत असून ते तितक्याच तोलाचे आणि महत्त्वाचे आहेत. मिशनऱ्यांनीं परदेशीं जाऊन लोकांना बाटविणें म्हणजे आत्मप्रौढीचें आणि अन्यायाचें प्रदर्शन आहे. 'ख्रिस्ती मिशन्स' या विषयावर अनेक चर्चेसमध्यें माझें भाषण झाल्यानंतर कांहीं तरुण मुलां–मुलींनीं काढलेले उद्गार महत्त्वाचे आणि सुचिन्हदर्शक आहेत. एक सुशिक्षित मुलगी म्हणाली, "I appreciate your frank remarks on our missions." (आपण आमच्या मिशनऱ्यांच्या संबंधीं दिलेलें स्पष्ट मत मला आवडलें.) दुसऱ्या एका शहरीं एक कॉलेज तरुण म्हणाला, "We are the most conceited people on earth and believe that we alone know the truth and none else." (आमची अशी समजूत झाली आहे कीं सत्य काय तें आम्हांसच तेवढें ठाऊक व बाकीच्या लोकांना त्याची कांहींच जाणीव नाहीं व अशा कल्पनेमुळें आमच्या ठिकाणीं एक प्रकारची आढ्यता उत्पन्न झाली आहे.) सारांश आकुंचित आणि आत्मप्रौढी धर्मवृत्तीचे लोक आमच्या समाजाप्रमाणें या समाजांतही आहेत; परंतु तरुण पिढींत

नवीन प्रवृत्ति उत्पन्न होत आहे. ख्रिस्ती धर्माचा, हिंदू धर्माचा, यावनी धर्माचा अथवा इतर एकाद्या विशिष्ट धर्माचा जगावर प्रसार झाला पाहिजे असें म्हणण्याचे दिवस आतां गेले असून या सर्व धर्मांनीं सहकारितेनें आणि सहिष्णुतेनें अध्यात्माची ज्योत अखंड पाजळत कशी ठेवावी हा विचार करण्याचे दिवस आले आहेत.

अशाच उदार प्रवृत्तीचे धर्मपुढारी अमेरिकेंत उत्पन्न होत असून त्यांच्या मताची छाप सामान्य जनतेवर हळुहळू पडत आहे. चर्चमध्यें न जाणारा परंतु धर्मप्रवण असलेला असाही मोठा वर्ग या समाजांत आहे. या लोकांचा मुख्य भर धर्मसंस्थेवर नसून वैयक्तिक आध्यात्मिक जीवनावर अधिक आहे.

लोकसंख्येच्या मानानें कॅथॉलिक आणि ज्यू लोक हे अल्पसंख्यांक आहेत. परंतु अमेरिकेचे राज्यघटनेंत धर्मावर अधिष्ठित झालेले भेद मान्य केलेले नाहींत. तात्त्विक दृष्टया आणि सर्वसामान्यपणें नेहेमींच्या व्यवहारांतही धर्मभेदाला फारसें महत्त्व दिलें जात नाहीं. विशिष्ट धर्माचे लोक अल्पसंख्यांक आहेत म्हणून त्यांना कायदे मंडळांत किंवा राज्यकारभारांत विशिष्ट जागा राखून ठेवलेल्या आहेत असें नाहीं. प्रत्येकजण आपल्या लायकीप्रमाणें राजकीय व सामाजिक क्षेत्रांतील दर्जा संपादन करितो. सर्वसामान्यपणें हा नियम असला तरी धर्मभेदाचा पगडा जनतेवरचा अजीबात गेला आहे असें मात्र नाहीं. प्रेसिडेंटचे एका जागेकरितां प्रॉटेस्टंट व कॅथॉलिक उमेदवार असले तर कॅथॉलिक माणसाला निवडून येण्याची शक्यता साधारण कमीच. आल् स्मिथ् नांवाचा उमेदवार याच कारणास्तव राष्ट्राचा अध्यक्ष होऊं शकला नाहीं. पण तोच प्रांताचा अध्यक्ष होऊं शकला. असें जरी आहे तरी आम्हांला

अल्पसंख्यांकांचा प्रश्न

स्वतंत्र मतदारसंघ द्या अशी मागणी अल्पसंख्यांक कधीं करीत नाहींत, कारण तसें करणें हें राजकीय तत्त्वाविरुद्ध समजलें जातें.

सारांश, धर्म ही मरूं घातलेली संस्था नाहीं. ती जिवंत राहावी याकरितां पुढाऱ्यांनीं आधुनिक काळाला योग्य असें परिवर्तन त्यांत चालविलेलें आहे. त्याकारणानें नवीन पिढीला या नवीन धर्मांत आकर्षकपणा वाटत आहे.

---

प्रकरण पांचवें

## स्त्रियांचें जीवन व कुटुंबसंस्था

अमेरिकेमध्यें आपल्या लोकांस मोकळेपणानें वावरतां येतें. अतिशय श्रेष्ठ पदवीच्या लोकांशीं सहवास घडून येण्यास आपलाही दर्जा श्रेष्ठ असावा लागतो. पण एकंदरीनें पाहतां तिकडील चांगल्या प्रकारच्या लोकांशीं परिचय करून घेणें कठीण जात नाहीं. निराळ्या संस्कृतीच्या माणसांबद्दल अमेरिकन स्त्रियांमध्यें विपरीत ग्रह नाहीं. हिंदी विद्यार्थ्यास तेथील स्त्रियांचें सहाय्य होतें. आपला समाज परकीयांनीं नीट पाहावा, उथळपणानें वरवर दिसणाऱ्या चार वाईट गोष्टी पाहून न जातां आपल्या संस्कृतींतील चांगल्या गोष्टीही त्यांस दिसाव्या अशी त्यांची इच्छा असते. या दृष्टीनें हिंदी पाहुण्यास घरीं बोलावून अतिथिसत्कार करून स्वतःचा वेळ, श्रम व पैसा खर्च करण्यांत अमेरिकन स्त्रियांस मोठा अभिमान वाटतो. तसेंच परकीय लोकांची संस्कृति व त्यांचे विचार जाणण्याच्या दृष्टीनें त्यांची ओळख करून घेण्याची त्यांस इच्छा असते. ह्यामुळें अमेरिकन समाजांत मिसळून त्यांच्या स्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करण्याची संधि त्रयस्थाला मिळते.

अतिथिसत्काराची प्रवृत्ति

आपल्याकडे स्त्री व पुरुष यांच्यामध्यें जसा विशेष फरक वाटतो तसा तिकडे वाटत नाहीं; कारण स्त्रिया व पुरुष हरएक प्रसंगीं एकत्र मिसळतात. अमेरिकन स्त्रियांमध्यें मनमोकळेपणा, चपळाई, धीटपणा, नीट-नेटकेपणा, सौंदर्याभिरुचि, पुरुषांबरोबर वाटेल त्या क्षेत्रांत काम करण्याची तयारी, प्रवासाची हौस, कष्ट करण्याची तयारी, आपल्या स्वतःच्या ध्येयासाठीं स्वतःवर जबाबदारी घेण्याची तयारी, निर्भयपणा हे गुण विशेष प्रामुख्यानें दिसले.

प्रमुख गुणदोष

दोषांच्या दृष्टीनें पाहतां तिकडील स्त्रियांमध्यें दोन तीन दोष विशेष दिसून येतात. कदाचित् हे दोष नसून आपण निराळ्या संस्कृतीच्या भूमिकेवरून त्यांजकडे बघतों त्यामुळें ते तसे दिसत असतील. त्यांचें मुद्दाम दिग्दर्शन करण्याचें कारण तिकडच्या या गोष्टींचें अंध अनुकरण इकडे होऊं नये. तिकडील बायकांचा नटवे-पणा कधींकधीं अतिरेकाला जातो. दर अर्ध्या तासागणिक तोंडाला पावडर लावून आरशांत पाहणें हें हिंदी माणसाचे दृष्टीला तितकें बरें दिसत नाहीं. तसेंच कपडे वगैरे गोष्टींवर तिकडील स्त्रियांचा पैसा फार खर्च होतो. दागिन्यांत विविधतेकडे त्यांचें लक्ष असतें, पण दागिन्यांतील त्यांची अभिरुचि आपणांस आवडणार नाहीं. तिकडील स्त्रियांमधील तिसरा दोष म्हणजे त्यांच्यामधील अविवाहित राहण्याची प्रवृत्ति. अर्थात् ही प्रवृत्ति सरसकट नाहीं. कांहीं व्यव-साय असे आहेत कीं त्यांमध्यें पडलें असतां मिळणाऱ्या आर्थिक स्वातंत्र्यामुळें तेथील स्त्रियांस लग्न करण्याची आवश्यकता वाटत नाहीं. मला ज्या ज्या अशा स्त्रिया भेटल्या त्या उच्च दर्जाच्या व शीलवान होत्या. पण सरसकट समाजामध्यें अशी प्रवृत्ति बोकाळली तर समाजावर अनिष्ट परिणाम होण्याचा संभव असतो.

गेल्या पंचवीस तीस वर्षांमध्यें तिकडील स्त्रिया अधिकाराच्या जागांवर येऊं लागल्या आहेत; परंतु हा अधिकार व ही जबाबदारी अद्यापि त्यांच्या नीटशी पचनीं पडलेली दिसत नाहीं. अधिकारप्राप्तिबरोबर आढयता व अहंकार हे दोष त्यांच्या ठायीं उत्पन्न होतात, विनय आणि उपकारवृत्ति दिसून येत नाहीं; याचें कारण स्त्रियांस आतांपर्यंत एक प्रकारची कनिष्ठत्वाची जी नकळत जाणीव होती तीमुळें अधिकाराच्या जागा आपल्या नव्हेत असें त्यांना वाटे. अशा स्थितींत अधिकाराच्या जागा मिळतांच वरिष्ठपणा दाखविण्याच्या ऐटीमुळें ही मानसिक प्रवृत्ति दिसून येत असावी. ती लौकरच नाहींशी होईल. आणखी एक दोष म्हणजे तिकडील पुष्कळ स्त्रिया पुरुषी दिसण्याकरितां पुरुषांच्या बाह्य गोष्टींचें जें अनुकरण करतात, (उदाहरणार्थ सिगारेट ओढणें) तें आपल्या दृष्टीला फारसें आवडत नाहीं. तिकडील प्रौढ व समंजस स्त्रियांमध्यें सुदैवानें ही प्रवृत्ति आढळत नाहीं. त्या विचार, बौद्धिक विकास, ध्येयनिष्ठा, कर्तबगारी, सामाजिक जबाबदारीची जाणीव या गुणांत पुरुषांचें अनुकरण करतात.

तिकडील स्त्रिया विद्या, कला व संस्कृति या बाबतींत पुरुषांच्या बरोबरीनें आहेत असें म्हणतां येईल. विद्येच्या क्षेत्रांत पाहिलें तर स्त्रिया शिक्षक आहेत, प्रोफेसर आहेत, ग्रंथकार आहेत, बातमीदार आहेत, जर्नालिस्ट आहेत, संशोधक आहेत. नवीन नवीन ज्ञान मिळविण्याची त्यांना हौस आहे. मीं तेथें असतांना दोन स्त्रिया संस्कृत शिकण्याकरितां मजकडे येत असत. पैकीं एक म्हातारी बाई नर्स होती व केवळ हौस म्हणून उतार वयांतही संस्कृत शिकण्याचा हव्यास तिनें धरला होता ! ती म्हणे ‘ एरवीं नाटकसिनेमामध्यें थोडा का पैसा जातो ? तोच इकडे खर्च केला तर कांहीं नवीन तरी शिकल्या-

सुसंस्कृत जीवन

सारखें होईल.' दुसरी बाई होती ती मध्यम वयाची असून प्रायव्हेट सेक्रेटरी म्हणून एके ठिकाणीं नोकरीला होती. वेदांताचें थोडें फार ज्ञान व्हावें अशी तिला मोठी हौस व त्यासाठीं संस्कृत शिकावें असें तिला वाटे. या गोष्टींचा मुद्दाम निर्देश करण्याचें कारण आपल्याकडे साधारण अशी समजूत आहे कीं, तिकडील स्त्रिया म्हणजे ख्यालीखुशाली व नाचरंग यांमध्यें दंग असावयाच्या ! वैषयिक जीवन हेंच जीवनसर्वस्व असें अमेरिकन स्त्रिया समजत नाहींत. ज्याप्रमाणें स्त्रिया विद्यांमध्यें पुढें आहेत त्याप्रमाणें गायन, चित्रकला इत्यादि कलांमध्यें सुद्धां त्या पुरुषांच्या बरोबरीनें असतात. आमच्या स्त्रियांपेक्षां त्या या क्षेत्रांमध्यें प्रामुख्यानें भाग घेतात असें म्हणावयास हरकत नाहीं. शिक्षणामुळें त्यांच्या अंगीं एक प्रकारची अभिरुचि आलेली असते, व त्याकरितां पैसा खर्च करण्याची त्यांची तयारी असते.

आपल्याकडील स्त्रियांमध्यें वयस्कपणाचा आव फार लौकर येतो. आपण प्रौढ आहोंत असें दाखविणें त्यांस फार आवडतें.

इकडील स्त्रियांशीं तुलना

याच्या उलट अमेरिकेमध्यें म्हाताऱ्या स्त्रियांसही तारुण्याची उमेद दाखवावी असें वाटतें. तेथील एका विद्यापीठांत संसारशास्त्र शिकणाऱ्या बाईची विश्वविद्यालयांत भेट झाली असतां सहज मी म्हटलें, 'इतक्या म्हातारपणीं तुमचा शिक्षणाचा हव्यास पाहून आम्हां तरुणांस कौतुक वाटतें ! ' तेव्हां तिनें उत्तर दिलें कीं, ' मी कांहीं म्हातारी नाहीं ! ' एखाद्या स्त्रीस तिचें वय विचारणें किंवा तिला म्हातारी म्हणणें हा उपमर्द समजला जातो.

आपल्याकडे कॉलेजांत जाणाऱ्या स्त्रियांमध्यें दिखाऊपणा, नाजूकपणा, पोषाखी वृत्ति हे दोष दिसून येतात. तिकडील स्त्रियांत चापल्य, बोलण्यांत व वागण्यांत तडफ व खेळाडू

वृत्ति हे गुण दिसतात. आपल्या स्त्रियांचा शिक्षणाचा हेतु श्रीमंत स्थळ मिळावें व सुखानें आयुष्य काढतां यावें, एखाद्या वकील–डॉक्टर–प्रोफेसराची–अथवा अधिकाऱ्याची पत्नी होऊन हाताखालीं चार नौकर ठेवून सुखानें राहावयास मिळावें एवढाच असतो. त्यामुळें एकदां विवाह झाला कीं मग स्त्रीच्या शिक्षणाचा कांहीं उपयोग होत नाहीं. याच्या उलट अमेरिकेमध्यें स्त्रियांच्या शिक्षणाचा उपयोग समाजहिताकडे व समाजकार्याकडे होतो. सौख्य व श्रीमंती सर्वांसच हवी. तरी पण श्रीमंत व सुशिक्षित बायका आपल्या श्रीमंतीचा व शिक्षणाचा फायदा समाजास देण्यांत तत्पर असतात. आपल्या स्त्रियांत शालीनता व विनय हे गुण दिसतात तर मनमोकळेपणा व धीटपणा हे गुण तिकडल्या स्त्रियांत आढळतात. या दोन्ही प्रकारच्या गुणांचें मनोहर मिश्रण पाहिजे. आपल्या स्त्रियांचें संसारांत व घरांत लक्ष अधिक, तिकडील स्त्रियांचें समाज व जग यांकडे लक्ष अधिक. त्यामुळें त्या स्त्रियांशीं पुरुष बोलूं लागला तर बोलण्याचे विषय अधिक व्यापक असतात. अर्थात् अशी तुलना करतांना दोन्ही समाजांतील शिक्षण व संस्कृतीचे दृष्टीनें सारख्या दर्जाच्या स्त्रियांची तुलना केली पाहिजे.

आपल्याकडील स्त्रियांच्या शिक्षणाचा उपयोग वैयक्तिक सौख्याकडे होतो, तिकडे श्रीमंतीचा उपयोग जिज्ञासातृप्ति, जगाचा प्रवास, कलेचा परामर्श या गोष्टींकडे होतो. आपल्याकडे स्त्रियांचें लक्ष वैयक्तिक व धार्मिक कृत्यांकडे असतें, त्यांच्या स्त्रियांचें लक्ष धार्मिक संघटना, चर्चसंबंधीं काम, भूतदयेचीं सामाजिक कार्यें इकडे असतें. आर्थिक दृष्टया पाहिलें तर आपल्याकडे सुशिक्षित स्त्री असली तरी ती पुरुषावर अवलंबून राहण्याची इच्छा करते आणि अगदीं जरूर तेथेंच आर्थिक दृष्टया स्वावलंबी असते; तिकडील

स्त्रियांमध्यें सर्वसाधारणपणें आर्थिक स्वातंत्र्याची महत्त्वाकांक्षा असते.

तिकडील स्त्रिया सर्व क्षेत्रांमधून कामें करतात, तरी पण अद्यापि जबाबदारीचीं आणि श्रेष्ठ अधिकाराचीं कामें पुरुषच पाहतात. अलीकडे त्या ठिकाणीं देखील कर्तबगार स्त्रियांस नेमण्याची पद्धत पडूं लागली आहे. प्रेसिडेंट रुझवेल्टच्या कारकीर्दींत मिस् पर्किन्स या बाईस 'लेबर' खात्याचें प्रधानपद देण्यांत आलें. अमेरिकेमध्यें द्रव्यार्जनाच्या दृष्टीनें हिंदी विद्यार्थ्यांनीं काम करण्याविषयीं जी कायद्याची बंदी होती ती सैल करून विद्यार्थ्यांस काम करण्यास याच बाईंनीं कायद्यानें सोय करून दिली. अद्यापिही कायदेमंडळ, राज्यकारभार, राजकारण इत्यादींमध्यें स्त्रियांचा शिरकाव झाला नाहीं. स्त्रियांचीं क्षेत्रें म्हणजे शिक्षण, समाजसेवा, चर्च, शांततेच्या चळवळी, कला व संस्कृतिविषयक संस्था हीं होत. रशियांत मात्र यासारखा निर्बंध नाहीं. तेथें ज्या ज्या क्षेत्रांत पुरुष काम करतात त्या त्या क्षेत्रांत स्त्रिया काम करूं लागल्या आहेत.

स्त्रियांचीं कार्यक्षेत्रें

स्त्रियांचे विशेष धंदे म्हणजे कारखान्यांमधील यांत्रिक कामें व दुकानांतील विक्रीचीं कामें हे होत. टाइपिंग, प्रायव्हेट सेक्रेटरी, प्राथमिक शिक्षक, हीं सर्वस्वी स्त्रियाचींच क्षेत्रें आहेत. दुय्यम शिक्षणांत स्त्रिया व पुरुष समसमान आहेत.

स्त्रिया विशेष हक्कांसाठीं झगडत आहेत असा देखावा अमेरिकेंत दिसत नाहीं, याचें कारण ज्या जागांना त्या पात्र असतात त्या जागा त्यांना मिळतात. स्त्रियांस हक्क द्यावे कीं नाहीं हा तात्त्विक झगडा आज अमेरिकेंत राहिलेला नाहीं. कारण तत्त्व या दृष्टीनें अमेरिकन लोकांना स्त्रीपुरुषांमधील समानता मान्य झालेली आहे.

हक्काकरितां चळवळ

विशेषत: आर्थिक स्वातंत्र्यामुळें स्त्रिया जास्त पुढें आल्या. महायुद्धामध्यें पुरुषांस लढाईवर जावें लागल्यामुळें ते जीं जीं कामें नेहमीं करीत त्या त्या कामांवर स्त्रियांची नेमणूक झाली होती. अशा रीतीनें प्रामुख्यानें आर्थिक क्षेत्रांत स्त्रियांस पाऊल टाकावयास मिळालें. या वेळेपासून स्त्रियांस एक प्रकारचा आत्मविश्वास वाटत आहे. स्त्रियांस अमेरिकेंत स्वातंत्र्य मिळालें तें हक्कांकरितां चळवळी व झगडा करून मिळालेलें नसून आर्थिक व सामाजिक परिस्थितीमुळें स्वाभाविकच मिळत आलेलें आहे.

स्त्रियांचीं सार्वजनिक कामें

अमेरिकेंत स्त्रिया नाहींत अशा संस्था सांपडणें कठीण आहे. बहुतेक भूतदयेच्या व परोपकाराच्या संस्था यांचें पुढारीपण स्त्रियांनीं घेतलें आहे. पुष्कळशा संस्थांच्या संस्थापिकाच स्त्रिया आहेत असें आढळून येईल. स्त्रियांच्या मदतीनें व पुढारीपणानें चालविलेल्या कांहीं संस्थांचें स्वरूप पुढील नांवांवरून समजेल: सेटलमेंट हाउसेस ( गरीब स्थितींतील लोकांना संस्कृतीचीं सर्व साधनें एके ठिकाणीं पुरविणारी संस्था ), चिल्ड्रेन्स गाइडन्स ब्यूरोज ( लहान मुलांना उद्योगधंद्याच्या बाबतींत सल्लामसलत देणाऱ्या संस्था ), चिल्ड्रेन्स होम्स् ( अनाथालयें ), बर्थ कंट्रोल क्लिनिक्स ( संततिनियमन संस्था ), व्हेकेशन स्कूलस ( सुट्टींतील व्यापक शिक्षणाच्या शाळा ). अशा प्रकारच्या अनेक संस्थांमधून स्त्रिया उपयुक्त कामें करीत आहेत. यांपैकीं पुष्कळ स्त्रियांनीं समाजसेवा हा व्यवसाय पत्करला असून या कामाचें उच्च शिक्षण त्यांस विद्यापीठांतून घेतां येतें आणि त्या शिक्षणाचा उपयोग निर्वाहाचें साधन म्हणूनहि करितां येतो.

अमेरिकेच्या पूर्वकिनाऱ्यावर ज्या शिक्षणसंस्था आहेत त्या

जुन्या पद्धतीच्या आहेत. म्हणजे तेथें मुलांसाठीं शिक्षणाची सोय वेगळी व मुलींसाठीं शिक्षणाची सोय वेगळी अशी व्यवस्था आहे. पण पश्चिम व मध्य अमेरिकेंतील वस्ती ही नंतरची असल्यामुळें या ठिकाणीं मिश्र संस्था—शाळा व कॉलेजें—निर्माण झाल्या आहेत. मिश्र शिक्षणपद्धति ही प्रथम आर्थिक परिस्थितीमुळें, म्हणजे मुलां-मुलींकरितां स्वतंत्र शिक्षणसंस्था काढण्याचा खर्च वांचविण्याकरितां काटकसर म्हणून अस्तित्वांत आली. इंग्लंडमध्येंसुद्धां आर्थिक जरूर म्हणून सहशिक्षणाचा स्वीकार करण्यांत आला आहे. प्रारंभींचा इतिहास असा असला तरी आज मात्र अमेरिकेनें तत्त्व म्हणून सह-शिक्षणाचा स्वीकार केला आहे. पोस्ट ग्रॅज्युएट शिक्षणाच्या ज्या कांहीं संस्था पूर्वकिनाऱ्यावर आहेत त्या देखील मिश्रच आहेत.

सहशिक्षणाचा प्रयोग

अमेरिकेंत मिश्र आणि वेगळाल्या अशा शिक्षणसंस्था चालल्या आहेत त्या अर्थीं दोनही प्रकारच्या शिक्षणाची आवड लोकांस आहे हें उघड आहे. जेथें वेगवेगळया संस्था आहेत—म्हणजे जेथें एकाच गांवांत निव्वळ स्त्रियांसाठीं व निव्वळ पुरुषांसाठीं अशा संस्था आहेत—तेथें आठवडयांतून कांहीं वेळ विद्यार्थी—विद्यार्थिनी एकत्र मिसळण्याचे प्रसंग कॉलेजच्या किंवा विद्यापीठाच्या अधिकारी-वर्गामार्फत आणले जातात. त्यामुळें संस्था मिश्र असोत वा स्वतंत्र असोत, त्यांमध्यें या दृष्टीनें फारसा फरक आढळत नाहीं. या बाबतींत हिंदी व अमेरिकन दृष्टी वेगवेगळया आहेत. विवाहापूर्वीं स्त्री-पुरुषांनीं परस्परांचा दृढ परिचय करून घेतला असला पाहिजे व तशी त्यांस संधि मिळाली पाहिजे, विवाह ही व्यक्तीच्या आयुष्यांतील एक अत्यंत महत्त्वाची बाब आहे, अशी अमेरिकन शिक्षकांची, पालकांची व समाजाची वृत्ति आहे. त्यामुळें ज्या

ठिकाणीं शिक्षणसंस्था मिश्र नसल्यामुळें तरुण तरुणींची एकाच वर्गांत व कॉलेजांत आपोआप गांठ पडत नाहीं, त्या ठिकाणीं ती प्रयत्नपूर्वक हेतुपुरस्सर पाडण्यांत येते. परंतु आपल्या समाजाला अशा प्रकारचा अनुभव नसल्यामुळें स्वाभाविकपणेंच या पद्धतीच्या पावित्र्याबद्दल आपणांस शंका येते. याचें एक उदाहरण द्यावयाचें म्हणजे आपले जे विद्यार्थी पाश्चात्य देशांत जातात त्यांना या पद्धतीची माहिती नसल्यामुळें ते फार गैरसमज करून घेतात. आणि कांहीं मुलींशीं त्यांचा निकट परिचय आल्याबरोबर तो परिचय बौद्धिक क्षेत्रापुरताच आहे असें लक्षांत न ठेवतां ते अधिक सलगी करावयास जातात; त्यामुळें हिंदी विद्यार्थ्यांबद्दल तिकडील समाजाचा गैरसमज होतो. हिंदुस्थानांतील अनुकूल परिस्थितींत वाढलेल्या आत्मसंयमनाचा उपयोग ते मोहाच्या परिस्थितींत करीत नाहींत !

'रिव्होल्ट ऑफ मॉडर्न यूथ'

'रिव्होल्ट ऑफ मॉडर्न यूथ' ( आजच्या तरुणांची बंडखोरी ) या नांवाचें जज्ज लिंडसे यांचें जें पुस्तक आहे त्यावरून आपण अमेरिकन समाजाविषयीं जी कल्पना करतों ती चुकीची आहे. या ग्रंथाविषयीं अमेरिकन लोकांस विचारतां ते म्हणतात कीं, त्यांत फार अतिशयोक्ति आहे, तें अमेरिकन समाजाचें खरें चित्र नव्हे. कंपॅनिअनेट मॅरेज (सहवासोत्तर लग्न) ही संस्था फक्त कल्पनेंत व वाङ्मयक्षेत्रांत अस्तित्वांत आहे; प्रत्यक्ष व्यवहारामध्यें ती पद्धत उतरली नाहीं. आपल्याकडे कोठें व्यभिचाराचें उदाहरण दिसून आलें कीं ज्याप्रमाणें सर्व समाज व्यभिचारी ठरत नाहीं, तद्वत् त्यांच्या समाजामध्यें कांहीं तुरळक ठिकाणीं असा प्रकार दिसून आला तरी समाजानें या गोष्टीचा स्वीकार केला आहे असें कोणी समजूं नये. पातिव्रत्य, पावित्र्य इत्यादि कल्पना त्यांच्याही समाजांत आहेत व

नीतिदृष्टया त्यांच्या समाजाची कोणी निंदा केल्यास त्यांस वाईट वाटतें.

मध्यंतरीं अमेरिकन तरुण पिढीविषयीं भडक वर्णनें येत असत त्याचें कारण महायुद्धांतून परत आलेल्या तरुण पिढीकडून दाखविला गेलेला विषयातिरेक. दुसरें कारण कर्मठ धर्माचा समाजावरील बसलेला पगडा सैल होत चालला आहे हें होय. परंतु मागील पिढींत दाखविलेला विषयातिरेक हा सध्यांच्या पिढीमध्यें दिवसानुदिवस कमी होत आहे. फरक इतकाच कीं, पूर्वीं तरुण लोकांवर नीतीचीं धार्मिक व सामाजिक बाह्य बंधनें असत त्याऐवजीं हल्लीं त्यांच्यामध्यें स्वतःच्या मनाचीं बंधनें निर्माण होऊं लागलीं आहेत. त्यामुळें नवीन पिढी ही अधिक आत्मसंयमी व विचारशील अशी बनत आहे. वैवाहिक पावित्र्याबद्दल तरुण पिढीमध्यें अधिक आदर वाटूं लागला आहे.

याचें एक चिन्ह म्हणजे कॉलेजशिक्षण चालू असतांनाच विवाह करण्याची परंपरा सध्यां पडूं लागली आहे हें होय. आणि या गोष्टीला शिक्षणाधिकाऱ्यांकडून संमतीही मिळूं लागली आहे. ह्यावरून नीतिबाह्य वर्तनापेक्षां वैवाहिक बंधनें श्रेयस्कर आहेत अशा तऱ्हेची वृत्ति तरुण पिढीमध्यें होत आहे हें सिद्ध होतें. रशियामध्यें देखील कॉलेज विद्यार्थ्यांना विवाहित होण्याची परवानगी असते; इतकेंच नव्हे तर विवाहित जोडप्यांना कॉलेजांतील स्वतंत्र वसतिगृहामध्यें राहण्याची सोय केलेली असते. यावरूनही रशियाला स्वैर वैषयिक जीवनापेक्षां वैवाहिक जीवन अधिक आवडतें ही गोष्ट सिद्ध होते.

आर्थिक परिस्थितीचा तरुण पिढीच्या नीतिमत्तेवर परिणाम होतो. आर्थिक परिस्थिति चांगली नसली म्हणजे लग्नें उशीरा होऊं लागतात व लग्नाची वयोमर्यादा वाजवीपेक्षां अधिक लांबली

म्हणजे स्वैराचार सुरू होतात. याला दोन उपाय संभवतात. आर्थिक परिस्थितीमुळें लग्न करावें असें वाटत असतांहि तें उशीरापर्यंत लांबवावें लागतें, याला तोड म्हणजे अशा लोकांस आर्थिक दृष्टया कार्यक्षम करणें. रशियांतील सर्व कॉलेजमधील विद्यार्थ्यांस स्कॉलरशिप्स् मिळतात व त्यामुळें ते आर्थिक दृष्टया स्वतंत्र असतात. दुसरा उपाय म्हणजे स्त्रीलाही आर्थिक दृष्टया स्वतंत्र व कार्यक्षम ठेवावें. म्हणजे पुरुषाला लग्न ही आर्थिक जबाबदारी वाटणार नाहीं व तें लांबणीवर टाकलें जाणार नाहीं. आपल्याकडील परिस्थितीमध्यें आपण या अमेरिकन व रशियन उदाहरणांवरून बोध घेतला पाहिजे. केवळ नीतिमत्तेवर जोर देऊन नीति राहणार नाहीं. नीति पुष्कळ वेळां आर्थिक परिस्थितीवर अवलंबून असते. ती आर्थिक परिस्थिति आटोक्यांत आणली व बुद्धिपुरस्सर आर्थिक समाजरचनेची योजना केली तरच पावित्र्य, विवाहसंस्था, पातिव्रत्य, इत्यादि पूर्वसंस्कृतींतल्या उत्तम गोष्टी कायम राहतील.

आर्थिक परिस्थिति आणि नीतिबंधनें

अमेरिकन स्त्रियांविषयीं एकंदरीनें अनुकूल ग्रह होतो. विशेषत: बौद्धिक दृष्टीनें वादविवाद, चर्चा करणें, कष्टाचीं कामें करणें उच्च शिक्षण झालें असलें तरी शारीरिक कष्ट करण्यांत कमीपणा न वाटणें, या दृष्टींनीं अमेरिकन स्त्रियांचा स्वभाव वाखाणण्यासारखा आहे. या गोष्टींत त्या हिंदी पुरुषांसही लाजवितील यांत शंका नाहीं. मी एकदां एका अमेरिकन बाईबरोबर तिच्या मोटारींतून जात असतां तिच्या मोटारीचें एंजिन बिघडलें, त्याबरोबर एम. ए. झालेल्या त्या बाईनें खालीं उतरून एंजिनचें दार उघडलें व स्वत:चे हात काळे करून इंजिनची दुरुस्ती केली. दुसऱ्या एका प्रसंगीं पीएच. डी.

कष्टाची हौस

चा अभ्यास करणारी एक बाई आपल्या मोटारींतून मला घेऊन जांत असतां मोटार पंक्चर झाली. त्याबरोबर दुसरें चाक बसवण्याचें सर्व साहित्य बाहेर काढून ती तें चाक बसवूं लागली. त्याबरोबर मलाच चमत्कारिक वाटून मीं तें काम घेतलें व त्या बाईच्या सांगण्याप्रमाणें तें चाक बसवून दिलें. अशा प्रकारची वृत्ति आपल्या पुरुषांच्या ठिकाणींसुद्धां यावयास पाहिजे. स्त्रियांच्या ठिकाणीं येईल तो सुदिन !

आधुनिक यांत्रिक संस्कृतीमुळें अमेरिकन कुटुंबांत सर्व दृष्टीनें क्रांति झालेली आहे. अर्ध शतकापूर्वीं अमेरिकन कुटुंबें आपल्याकडील मोठया कुटुंबाप्रमाणेंच अष्टपुत्रकन्यायुक्त अशीं होतीं. परंतु गेल्या शतकांतील औद्योगिक क्रांतीबरोबर कुटुंबपद्धतींतही क्रांति झालेली आहे. नमुनेदार अमेरिकन कुटुंबांत एक अथवा दोन मुलें आणि आईबाप एवढीं माणसें असतात. कामधंदा लागल्याशिवाय पुरुष लग्न करीत नाहीं, आणि मुलाबाळांच्या शिक्षणापुरेशी द्रव्यसामग्री जमल्याशिवाय तो अपत्यजननाच्या भानगडींत पडत नाहीं. अमेरिकेंत कायद्यानें संततिनियमनाचे प्रसारास बंदी असली तरी आर्थिक अडचणीमुळें ही पद्धति बहुजनपरिचित आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. बालमृत्यूंची संख्या येथें अगदीं थोडी आहे. जन्मास आलेलें मूल जगतें का मरतें अशी आपल्याकडे भीति असते; परंतु जन्मलेलें मूल जगणारच अशी तेथें सर्वसाधारण भावना असते. हिंदुस्थानांत तीन मुलें जन्मास आलीं तर त्यांतील दोन बाल्यावस्थेंतच मरतात अशी साधारण आंकडेवारी आहे. शहरांत तर हें प्रमाण अधिकच आहे. अमेरिकेंत बालमृत्यूचें प्रमाण कमी आहे.

सुटसुटीत व आरोग्यसंपन्न कुटुंब

यांत्रिक सुधारणेमुळें कुटुंबांतील बहुतेक कामें बाहेरील संस्थांनीं घेतलीं आहेत. त्यामुळें अन्न शिजविणें, कपडे धुणें इत्यादि

कामांपैकीं बराचसा भाग घरकामांतून कमी झाला आहे. दुसरी गोष्ट, घराबाहेरील करमणुकीचीं आणि शिक्षणाचीं साधनें अमर्याद वाढलीं आहेत. सिनेमा-थिएटरें, नाटकें, ऑपेरा, प्रदर्शनें, व्याख्यानें, वादविवादसभा, खाजगी क्लब्ज व मंडळें यांतून इतके कार्यक्रम चालू असतात कीं, घरीं बसून काळ काढण्यापेक्षां बाहेर तो अधिक करमणुकींत आणि शिक्षणांत जातो, त्यामुळें विशेषत: मोठ्या शहरांतून घर ही निवाऱ्याची आणि एकदोन वेळ भोजनाची जागा होऊन बसली आहे. व्यक्तीचा वेळ कुटुंबापेक्षां बाहेर अधिक जातो. सुटीचे दिवशीं शांतपणें घरीं विश्रांतींत दिवस घालविणारीं माणसें थोडीं. वाहनवैपुल्यामुळें स्वत:च्या मोटारींतून अथवा उपलब्ध वाहनांतूनच घराबाहेर पडून सार्वजनिक शिक्षण-करमणुकीच्या ठिकाणीं जाणें अथवा गांवाबाहेर प्रवास करणें अधिक सोयीचें झालें आहे.

गृहसंस्थेमध्यें क्रांति

या कुटुंबक्रांतीचा परिणाम तरुण पिढीचे शिक्षणावर होत आहे. कुटुंबांत मिळणारें काम करण्याचें, परस्पर सहकारितेचें, सहिष्णुतेचें आणि प्रासंगिक नीतीचें शिक्षण मिळण्याची संधि दिवसेंदिवस कमी होत आहे. या शिक्षणाची काळजी शाळांनीं केली नाहीं तर तरुण पिढीचे शीलसंवर्धनांत मोठीच हानि होईल या भीतीनें शिक्षणपुढाऱ्यांचें लक्ष या गोष्टीकडे लागलेलें आहे.

गृहसंस्था नामशेष करण्याचा अमेरिकन लोकांचा विचार नाहीं. उलट ती सुदृढ कशी होऊं शकेल या दृष्टीनें त्यांचे प्रयत्न चाललेले आहेत. पण यापुढें गृह व कुटुंब यांची व्याख्या मात्र निराळी होईल. स्वयंपाक घर व पाळणा यांपुरतीच गृहकल्पना मर्यादित राहणार नाहीं. बौद्धिक, सांस्कृतिक आणि आध्यात्मिक सुखाचें स्थान या दृष्टीनें गृह शब्दाची व्याप्ति वाढेल. बाहेरील

करमणुकी व इतर आकर्षणाच्या गोष्टी ज्या यांत्रिक प्रगतीमुळें वाढल्या

प्रतिक्रियेला प्रारंभ

त्याच यांत्रिक शोधामुळें गृहांतील जीवनही अधिक आकर्षक केलें जात आहे. रेडिओमुळें उत्कृष्ट संगीत घरीं ऐकतां येतें, होम-सिनेमामुळें चित्रपट पाहातां येतात आणि कलाशिक्षणाच्या सोयीमुळें चित्रकला, संगीत इ. कलांचा विकास आपल्या घरीं सवडीच्या वेळांत करितां येतो, त्यामुळें घराबाहेर पडलेलें अमेरिकन कुटुंब पुन्हां घरांत परत येईल अशी अपेक्षा आहे. संस्कृति व बालशिक्षण या दृष्टीनें कुटुंबपद्धति आवश्यक आहे व ती टिकविली पाहिजे अशी समाज-नेत्यांची खात्री आहे व त्या दिशेनें समाजांत विचार चालू आहेत.

अमेरिकेनें आजपर्यंत मिळविलेल्या स्त्रीस्वातंत्र्याबद्दल तिला अभिमान वाटत आहे आणि त्याचीं चांगलीं फळें समाजाला अनुभवा-वयास मिळत आहेत. सार्वजनिक हिताच्या समाजकार्यांत स्त्रिया पुढारीपणानें कामें करीत आहेत आणि अधिकाराच्या जागांवरही त्यांच्या नेमणुका होत आहेत. पूर्वापार चालत आलेल्या कुटुंबपद्धतींत, स्त्रियांचें आर्थिक स्वातंत्र्य आणि औद्योगिक सुधारणा यांचेमुळें सध्यां चलबिचल झालेली असली तरी, कालांतरानें ती स्थिर होऊन नवीन संस्कृतीला अनुरूप अशी कुटुंबपद्धति त्यांतून निर्माण होईल असें वाटतें.

---

## प्रकरण सहावें

# यांत्रिक संस्कृतींतील न्याय, नीति आणि शिक्षा

नवीन युगांत नवीन संस्था निर्माण होतात. मानवी शोधक बुद्धि आणि प्रगतिशीलता यांमुळें समाजांत नवीन विचार व साधनें उत्पन्न होत असतात. या अभूतपूर्व साधनांमुळें व विचारांमुळें समाजाची पूर्व घडी बदलत जाते आणि समाजशासनाचीं जुनीं साधनें अपुरीं पडूं लागतात. समाजाच्या नवीन घडीमुळें नवीन प्रश्न आणि अडचणी उत्पन्न होतात. या प्रश्नांना उत्तर आणि अडचणींवर उपाय म्हणून नवीन संस्था अस्तित्वांत येतात. जुन्या संस्था सुकून जाऊन नवीन संस्था समाजांत उगवण्याची ही क्रिया एकसारखी चालू आहे. ज्या समाजांत शीघ्र गतीनें क्रांति होते त्या समाजांतील संस्थांच्या जनन-मरणाची ही प्रक्रिया आपल्या डोळ्यांना चटकन् दिसते. मंद गतीनें प्रगति करणाऱ्या समाजांतील संस्था सनातन आणि चिरंतन असल्याचा भास होतो. परंतु दीर्घ कालाचा इतिहास दृष्टीपुढें धरला तर त्यांतही हेंच सत्य आढळून येतें.

**संस्थांचें जनन-मरण**

अमेरिका आणि रशिया या दोन देशांतील समाजांत फार वेगानें क्रांति होत आहे. नवीन विचार आणि नवीन शास्त्रीय शोध हीं या क्रांतीचीं कारणें आहेत. मशिनरी अथवा 'यंत्रकला' हें सामान्य तत्त्व दोन्हीही समाजांच्या मुळाशीं आहे. सायन्स आणि मशीन या शक्तीमुळें अमेरिकन समाजांत गेल्या अर्ध शतकांत क्रांति झाली आहे. यूरोपमधील देशांतही ही क्रांति झाली आहे, परंतु त्या लोकांच्या पुराणप्रियतेमळें या क्रांतीची गती अमेरिकेपेक्षां मंद आहे. यांत्रिक आणि औद्योगिक दृष्टीनें अमेरिका देश आज सर्वांच्या पुढें आहे, त्यामुळें

**यंत्रारूढ अमेरिका**

यांत्रिक युगांतील गुण आणि दोष हे अगदीं ठळक स्वरूपांत तेथें दिसून येतात. अमेरिकेंत प्रवास करणाराला हा देश विरोधपूर्ण वाटतो तो याच कारणामुळें होय. या देशांत भरपूर संपत्ति आहे, सामान्य लोकांनाही सुखसोयींचीं साधनें पुष्कळ आहेत व संस्कृति-संवर्धनाचें कार्य विविध दिशांनीं चालू आहे. ही या देशाची उज्वल बाजू झाली. ज्या औद्योगिक प्रगतीच्या जोरावर अमेरिकेंत या अभिनंदनीय आणि अनुकरणीय गोष्टी झाल्या, त्याच औद्योगिक सुधारणेमुळें तेथें पुष्कळ अनिष्ट गोष्टीही उत्पन्न झाल्या आहेत. 'मशीन' ही शक्ति आज ना उद्या हिंदुस्थानांतही मोकळेपणानें वावरूं लागेल. जे प्रश्न आज अमेरिकेपुढें आहेत तेच हिंदुस्थानापुढेंहि उद्यां उभे राहतील. परंतु अमेरिकेपासून बोध घेऊन या प्रश्नांचा आगाऊच आडाखा बांधला तर तें कदाचित् टाळतांहि येईल.

या दृष्टीनें अमेरिकेंतील औद्योगिक क्रांति, तीमुळें समाजांत उत्पन्न झालेले प्रश्न, आणि हे प्रश्न सोडविण्याकरितां समाजानें निर्माण केलेल्या संस्था या गोष्टींचें चिकित्सक दृष्टीनें निरीक्षण करणें जरूर आहे.

औद्योगिक क्रांतीमुळें समाजांतील लोकवस्तीचें स्थायी स्वरूप बदलतें. उद्योगधंद्याकरितां एकदां घर सोडून बाहेर पडलेला मनुष्य बहुतेक अखेरपर्यंत अनेक ठिकाणीं फिरत असतो स्थायिकपणानें एका ठिकाणीं फारसा राहात नाहीं. आपल्या गांवीं आणि घरीं राहणाऱ्या माणसांभोंवतीं एक लहान समाज असतो. या समाजाचें नैतिक बंधन प्रत्येक व्यक्तीवर असतें, त्यामुळें अबोधपूर्वक सदाचाराला वळण मिळत असतें, आणि बाह्य बंधनामुळें सद्‌वर्तनाची जबाबदारी व्यक्तीवर पडते. हीच व्यक्ति आपलें घर आणि समाज सोडून

**प्रवासी समाज आणि नीतिबंधनें**

अपरिचित समाजांत गेली म्हणजे तिच्यावरचें नैतिक बंधन ढिलें होतें. स्वतःच्या मनाचें बंधन व्यक्तीवर नसेल तर ती नीतिदृष्टया बेजबाबदार व शिथिल होते. शहरच्या दाट आणि बदलत्या वस्तींत घराभोंवतालचा समाज नीतिदृष्टया परिणामकारक होऊं शकत नाहीं.

या नैतिक शैथिल्याला दारिद्र्य, कायद्याचें स्वातंत्र्य आणि अज्ञान यांची जोड मिळाली म्हणजे त्याचें गुन्हेगारींत पर्यवसान होतें. अमेरिकेंत गुन्ह्यांचें प्रमाण अधिक आहे याचें कारण समाजाच्या बदललेल्या घडींत नीतिशासनाचीं नवीं साधनें नाहींशीं झालीं आहेत आणि नवीन साधनें निर्माण करण्याला समाजाला अद्याप वेळ मिळालेला नाहीं. गुन्हेगारीला तात्कालिक आळा घालण्याच्या दृष्टीनें अमेरिकन समाजांत नवीन संस्था निर्माण झाल्या आहेत, परंतु हे उपाय टिकाऊ नाहींत हें अमेरिकन पुढारी जाणून आहेत.

गुन्हेगारी शोधण्याच्या आणि तिला प्रतिबंध करण्याच्या अमेरिकेंत विविध संस्था आहेत. नेहमींच्या कोर्टाच्या जोडीला

नवीन कोर्टें, नवे तुरुंग

मुलांचीं न्यायालयें (Childrens Courts), स्त्रियांचीं न्यायालयें (Womens Courts), आणि रात्रींचीं न्यायालयें (Night Courts) अशा संस्था आहेत. मुलांचीं कोर्टें प्रसिद्धच आहेत. लहान मुलांकडून जे गुन्हे होतात त्यांना, घरची परिस्थिति, आईबापांची वागणूक, मुलांची प्रकृति इत्यादि अनेक कारणें असतात. गुन्हे करण्यांत मोठ्या माणसांचे आणि मुलांचे हेतू निरनिराळे असतात. मुलांचीं मनें निर्ढावलेल्या गुन्हेगारांपेक्षां कोंवळीं असतात. या सर्व कारणांकरितां मुलांचे खटले मोठ्या माणसांप्रमाणें चालवले जाऊं नयेत असें न्यायाचें तत्त्व प्रस्थापित झालेलें आहे आणि त्याप्रमाणें मुलांकरितां न्यायाच्या संस्था स्वतंत्र आहेत. या ठिकाणीं मुलांचें मानसशास्त्र जाणणाऱ्या आणि

मुलांकडे सहानुभूतीनें पाहणाऱ्या न्यायाधिशाची नेमणूक होते. खटला चालू असतां इतरेजनांना तेथें हजर राहण्याची परवानगी नसते. मुलाचे आईबाप आणि मुलाला वळण लावण्याची जबाबदारी घेणारी एकादी समाजसेविका ( Social Worker ) अशी सहानुभूतीची मंडळी तेथें हजर असतात. न्यायाधीश अथवा पट्टेवाला कोणीही सरकारी पोषाख घालीत नाहींत. सारांश, ज्याच्या योगानें मुलाच्या मनावर भीतीची आणि कठोरपणाची छाया पडणार नाहीं असें वातावरण तेथें असतें. मुलाचा गुन्हा ऐकून न्यायाधीश त्याला सौम्य भाषेंत सुधारणा करावयास सांगतो आणि मग एकाद्या समाजसेविकेला व एका प्रोबेशन ऑफिसरला त्याच्यावर देखरेख करावयास नेमतो. बाहेर राहून सुधारणा होणार नाहीं असें वाटल्यास न्यायाधीश मुलास सुधारणागृहांत ( Correction House ) मध्यें पाठवितो.

हें ' करेक्शन हौस ' म्हणजे लहान मुलांचा तुरुंग आहे. मिशिगन संस्थानांत लॅन्सिग येथें मीं अशी एक संस्था पाहिली. हा

तुरुंग कीं शाळा ?

तुरुंग आहे असें आधींच माहीत नसतें तर एकंदर देखावा पाहून ही एक धंदेशिक्षणाची चांगली शाळा आहे असेंच कोणालाही वाटलें असतें. हिंदुस्थानांतल्या धंदेशिक्षणाच्या शाळेंत न मिळणारी साधनसामग्री या तुरुंगाच्या शाळेंत होती !

सुधारणागृहाचा उद्देश असा आहे कीं तेथें राहून मुलाची प्रकृति सुधारावी व त्याला एक उपयुक्त धंदा यावा. मुलांना राहण्याकरितां येथें स्वच्छ जागा आणि स्नानगृहें आहेत, मोटी व्यायामशाळा आहे, सुतारकाम, लोहारकाम, छापखाना, मेकॅनिकल, ट्रेनिंग, लॉन्ड्री इ. धंदेशिक्षणाची सोय आहे, आणि प्राथमिक व दुय्यम शिक्षण देण्याची शाळा आहे. शाळेचे वर्ग पाहात मी फिरत असतां

मुलांनीं हिंदुस्थानविषयीं आणि गांधींविषयीं मनोरंजक प्रश्न विचारले. येथील सर्व मुलांचें एक Vocational Enterprise नांवाचें मासिक निघत असतें व मुलें स्वतःच तें आपल्या छापखान्यांत छापतात. सारांश, हा मुलांचा तुरुंग नसून एक शाळा आहे. इतर देशांत शाळांना तुरुंगाचें स्वरूप येतें! अमेरिकन लोकांचा शिक्षणावर अढळ विश्वास आहे, म्हणून गुन्ह्यावर उत्तम उपाय म्हणजे शिक्षा नसून शिक्षण आहे असा त्यांचा ठाम सिद्धांत आहे.

स्त्रियांचें कोर्ट

लहान मुलांप्रमाणें स्त्रियांचेकरितांही स्वतंत्र Women's Courts आहेत. शहरांतील राहणी, दारिद्र्य, अनावर मोह आणि गृहशिक्षणाचा अभाव इत्यादि कारणांमुळें स्त्रियांचे हातून अनेक गुन्हे घडतात. त्यांची सहानुभूतीनें चौकशी होऊन त्यांना सन्मार्गाला लावण्याचा प्रयत्न व्हावा म्हणून या कोर्टाची व स्त्रियांच्या स्वतंत्र तुरुंगाची व्यवस्था केलेली आहे.

झटपट न्याय-अन्याय

न्यायाच्या क्षेत्रांतील तिसरी विशेष संस्था म्हणजे रात्रीचें कोर्ट हीं होय. समाजाच्या अवजड पसाऱ्यामुळें आधुनिक जीवन इतकें गुंतागुंतीचें झालें आहे, आणि त्याच्या सोयीकरितां अथवा गैरसोयीकरितां इतके बारीकसारीक कायदे झाले आहेत कीं त्यांतून कोणी सुटणें शक्य नाहीं. गाडी चुकीच्या बाजूनें हांकणें, दिवे न लावणें, बाचाबाची करणें इत्यादि अनेक गुन्हे दिवसभर होत असतात. या सर्वांची ताबडतोब विल्हेवाट लावणें जरूर असतें, याकरितां हीं रात्रीचीं कोर्टें आहेत. येथील न्यायाचें अथवा अन्यायाचें काम इतक्या वेगानें होत असतें कीं त्याची कल्पना होणार नाहीं. पोलीस गुन्हेगाराला पुढें आणतो, तो आकाशाकडे हात करून शपथ घेतो

आणि नंतर सरकारी वकील आरोप वाचून दाखवितो, मग त्याला विचारतो, 'How do you plead ?' गुन्हा कबूल कीं नाकबूल ? मनुष्य सुज्ञ असला आणि त्याला फार दिवस आणि पैसे खर्च करावयास नको असले तर तो एकदम "गुन्हा कबूल" म्हणतो आणि जो काय दंड असेल तो भरून मोकळा होतो ! मग त्याच्या हातून गुन्हा झालेला असो कीं नसो ! न्यायाकरितां नंतरचें सव्यापसव्य करण्यापेक्षां दंड भरणें सोयीचें पडतें !

अधिक गंभीर स्वरूपाच्या गुन्ह्यांकरितां तुरुंग वगैरे संस्था आहेत. अमेरिकन तुरुंगाची त्यांच्या सौम्यपणाबद्दल फार प्रसिद्धी आहे. किंबहुना या सौम्यपणामुळें लोकांना तुरुंगाची दहशत बसत नाहीं म्हणून अमेरिकन गुन्हेगार निर्ढावतात असें इंग्लिश लोकांचें मत आहे ! यूरोपियन लोकांच्या तुरुंगविषयक कल्पना आपणांस परिचित आहेत, त्याबद्दल अधिक लिहिणें नको. अमेरिकन मनोवृत्ति अशी आहे कीं आज परिस्थितीमुळें एखादा मनुष्य गुन्हेगार असला तरी तीच परिस्थिति बदलली म्हणजे तो मनुष्य सुधारेल अशी अनुकूल परिस्थिति उत्पन्न करणें हें तुरुंगाचें काम आहे.

**तुरुंगांतील पीएच्. डी.**

'सिंगसिंग' नांवाचा अमेरिकेंतील प्रसिद्ध तुरुंग आहे. यांतील कैद्यांना खेळांची सोय असते, संगीताची सोय असते व शिक्षणाच्या दृष्टीनें इतर कांहीं सोयी असतात. मिशिगन संस्थानांतील तुरुंगाच्या शिक्षणाधिकाऱ्याशीं मी एक दिवस चर्चा करीत बसलों होतों. त्यानें मला सांगितलें कीं या तुरुंगांत एका गृहस्थांचा अभ्यास पीएच. डी.-ला बसण्याइतका झालेला आहे ! याच तुरुंगांतील लोक आपलें एक मासिक काढीत असतात, त्याचा एक अंक मला मिळाला. याचा अर्थ असा नव्हे कीं तुरुंगांतील जीवन अगदीं सुखाचें आहे; व्यव-

हार या नात्यानें शिक्षा, कष्ट इ. गोष्टी येथेंही आहेतच. परंतु शिक्षण देऊन गुन्हेगाराला सुधारण्याची संधि द्यावी आणि तो पुनः प्रतिष्ठित नागरिक होऊन प्रामाणिकपणानें राहील असें करावें हा अमेरिकन तुरुंगसंस्थेचा उद्देश आहे.

शिक्षा कीं शिक्षण

सारांश औद्योगिक सुधारणेमुळें अमेरिकेंत एक नवीन समाज उत्पन्न झाला आहे. लहान समाजांत अथवा ज्ञातींत व्यक्तीवर जें नैतिक दडपण असतें तें येथें नाहींसें होऊन व्यक्तीला अधिक स्वातंत्र्य मिळालेलें आहे. या स्वातंत्र्याला जेथें दारिद्र्य, अज्ञान, आपत्ति इत्यादींची जोड मिळाली तेथें त्याचें गुन्हेगारींत पर्यवसान झालें आहे. या गुन्हेगार प्रवृत्तीला शिक्षणात्मक परिस्थितीनें विधायक नागरिकत्वाचें वळण कसें देतां येईल या दृष्टीनें अमेरिकेचा प्रयत्न चालला आहे.

---

प्रकरण सातवें

## गरीबांकरितां सर्व सोयी

लंकेंत मशिनरी आणि दारिद्र्य

अमेरिका देश श्रीमंत आहे तरी तेथेंही गरीबी आहे. लंकेंत सोन्याच्या विटा असल्या तरी तेथेंही दरिद्री लोक असतातच. अर्थात् ही गरीबी सापेक्ष आहे. अमेरिकेंतील गरीब हिंदुस्थानांतील सुखवस्तु ठरेल. पण प्रत्येक समाजांतील व्यक्ति स्वतःची तुलना आपल्याच समाजांतील खालच्या आणि वरच्या व्यक्तीशीं करते. या दृष्टीनें विचार करतां, अमेरिकेंतही पुष्कळ गरीबी आहे. आज देशांतील शेंकडा नव्वद टक्के संपत्ति शेंकडा दहा लोकांच्या हातांत आहे, म्हणून अमेरिका हा भांडवलशाहीचा बालेकिल्ला समजला जातो.

व्यक्तिस्वातंत्र्य, समता आणि लोकशाही या तत्त्वांवर

स्थापन झालेल्या समाजांत ही आर्थिक विषमता शिरली याचें कारण हें 'मशीन' होय. अमेरिकेनें मशिनरीचा स्वीकार केला, परंतु त्याबरोबर मशीनचे भावी परिणाम ओळखून नवें अर्थशास्त्र निर्माण केलें नाहीं. समाज लहान होता आणि संपत्तीच्या उत्पादनाचीं साधनें मर्यादित होतीं तोंपर्यंत आर्थिक व्यक्तिस्वातंत्र्याचें तत्त्व ठीक होतें. परंतु मशिनरीच्या साहाय्यानें अर्थोत्पादनाचें प्रमाण वाढल्याबरोबर वरील तत्त्वांमुळें समाजांत अनास्था माजली. यंत्र अस्तित्वांत आलें तें मानवाचे शरीरकष्ट वांचविण्याकरितां; परंतु ज्या भांडवलवाल्यांच्या आणि कारखानदारांच्या हातांत हीं यंत्रें आलीं त्यांनीं त्यांचा उपयोग कामकऱ्यांचे कष्ट आणि कामाचे तास कमी करण्याकरितां केला नाहीं, तर यंत्रसाहाय्यानें मजुरांकडून अधिक काम काढून स्वतःचे खिसे भरण्याकडे केला. त्याचा स्वाभाविक परिणाम असा झाला कीं, ज्यांचे हातांत ही यंत्ररूपी शक्ति होती त्यांचे हातांत हळुहळू समाजाची सर्व संपत्ति एकवटली आणि बाकीचे लोक नागवले गेले. देश श्रीमंत पण लोक गरीब अशी स्थिति झाली आणि गेल्या पिढींत तिचा कळस झाला. यांत्रिक सुधारणा हें या गरीबीचें कारण नसून यंत्रांच्या मालकांनीं त्यांचा उपयोग जनतेच्या हिताकरितां न करतां स्वतःच्या फायद्याकडे केला हें मुख्य कारण आहे. यंत्राकडे दोष नाहीं, व्यक्तीकडे आहे.

मशिनरीचा दोष नाहीं, लोक स्वार्थी

अमेरिकेंतील सर्व औद्योगिक शहरांतून Gold Coast आणि Slums, श्रीमंतांची वस्ती आणि कामकऱ्यांची वस्ती असे भाग आहेत. कामकऱ्यांच्या वस्तींत बहुधा गरीब लोक राहतात. या लोकांना चांगल्या प्रकारचें कौटुंबिक जीवन अनुभवावयास मिळत नाहीं. कारण शहरच्या राहणींत यांच्या वाट्याला अगदीं लहान

जागा येणार, त्यांत मुलांबाळांसह राहावयाचें म्हणजे अत्यंत अडचण. त्यांतून एकाद्याला कामधंदा नसला कीं राहावयास घरही नसायचें, आणि काम करून मनुष्य म्हातारा झाला कीं त्याला पोसायला कोणी तयार होत नाहीं. अशा या सर्व अनाथ लोकांकरितां निर-निराळ्या धर्मार्थ संस्था निघालेल्या आहेत. त्यांतील कांहीं स्थानिक सरकारनें चालविलेल्या आहेत व कांहीं खाजगी देणग्यांतून चाल-विलेल्या आहेत.

शहरची राहणी, विभक्त कुटुंब, गरीबी अशा स्थितींत आई-बाप दोघेही आजारी पडले, अथवा मुलाला कांहीं दिवस सांभाळ-ण्यास घरांत कोणीच नसलें तर मुलांचे निष्का-रण हाल होतात. अशा अर्भकांकरितां Children's Shelter शिशुसंरक्षण संस्था असतात. या ठिकाणीं एक आठवड्यापासून कांहीं महिनेपर्यंत मुलांना ठेवितां येतें. ऐपतीप्रमाणें पालकानें पैसे द्यावेत. मुलांची सर्व व्यवस्था सुशिक्षित दायांच्याकडून अगदीं घरच्यापेक्षां चांगली होते. येथें असलेल्या अवधींत मुलाला एकादा रोग असला तर त्याला परस्पर उपचार केले जातात. मूल घरीं परत गेलें म्हणजे पूर्वीपेक्षां अधिक सुधारून जातें! या शिशुसंस्थेंत स्वयंसेवा करण्याकरितां श्रीमंत बाया दुपारच्या वेळीं येतात व मुलांना कपडे शिवणें, खेळणीं करणें इत्यादि कामें करितात. जीं मुलें अगदीं निराधार झालेलीं असतात त्यांचेकरितां Children's Homes 'बालकगृहें' असतात. या ठिकाणीं मुलांचें शिक्षण होऊन तीं कामधंद्याला लागेपर्यंत, त्यांची राहण्याची, खाण्या-पिण्याची व शिक्षणाची सर्व सोय होते. कांहीं मुलें मोफत राहातात आणि बाकीच्यांचे पालक आपल्या ऐपतीप्रमाणें पैसे देतात.

गरीब मुलांच्या श्रीमंती सोयी

म्हातारपणीं ज्यांना आश्रय नसतो अशांच्या करितां Old Men's Home ' वृद्धाश्रम ' असतात. कांहीं अगदीं फुकट राहा-

वृद्धाश्रम-सुनांची सोय

तात तर कांहींचे नातेवाईक त्यांचेकरितां थोडेबहुत पैसे देतात. पाश्चात्य देशांतील विभक्त कुटुंबपद्धतीमुळें व घरांतील अडचणी मुळें कांहीं कांहीं वेळां वृद्ध आईबापांनाही अशा आश्रमांत ठेवण्याचा प्रसंग मुलांवर येतो, पण असे प्रसंग थोडे. सासुरवास सोसणाऱ्या हिंदी सुनांना वरील संस्था फार पसंत पडेल असें वाटतें !

कामधंदा नसल्यामुळें घरदार नाहीं आणि रात्रीं निजण्याची सोय नाहीं असे कांहीं लोक असतात. मुंबईंत असे लोक रस्त्यावर

निवाऱ्याचें स्थान

आणि दुकानाच्या फळ्यांवर निजतात. अमेरिकेंतील कडक थंडीमुळें ही गोष्ट शक्य नाहीं, माणसें कांकडून मरतील. त्यांचेकरितां स्थानिक सरकार Night Shelters रात्रींचीं निवासस्थानें बांधतें. येथें येणाऱ्या पांथस्थाला निजण्याला अंथरूण पांघरूण मिळतें आणि सकाळीं हलकी न्याहारी दिली जाते.

औद्योगिक सुधारणेमुळें संपत्तीची विषम विभागणी होऊन कांहीं लोक श्रम करूनही गरीबींत आहेत. तरी पण या गरीबींत त्यांना हातभार लावण्याकरितां अनेक धर्मार्थ संस्था निघालेल्या आहेत.

गरीब लोक शहरच्या राहणींत पडले म्हणजे त्यांच्या मुलाबाळांच्या फार गैरसोयी होतात. त्यांना खेळावयास भरपूर जागा

व्यसनावर उपाय संस्कृतिप्रसार

नसते, बापाचा कामधंदा नेहमीं घराबाहेर असल्यामुळें नैसर्गिक शिक्षणाचें तें एक साधन नाहींसें होतें, व आईबाप कामाकरितां सारा वेळ बाहेर असल्यानें या मुलांकडे पाहण्याला कोणीच नसतें. अशीं

मुलें रस्त्यांत स्वतंत्रपणें भटकूं लागलीं कीं त्यांना निरनिराळीं व्यसनें लागतात आणि हेच लोक पुढें गुन्हेगार बनतात. हीं मुलें शाळेंत जात असलीं तरी शाळा त्यांना फार तर सहा तास गुंतवून ठेवूं शकेल. बाकीच्या वेळांत मुलांना निर्व्यसनी करमणुकी व व्यायामाच्या सोयी मिळाव्यात म्हणून निरनिराळया संस्था स्थापन झालेल्या आहेत. व्यायामाची आणि कलेची आवड लागलेलीं मुलें सहसा वाममार्गाला लागत नाहींत असा अमेरिकन समाजकार्यकर्त्यांचा अनुभव आहे. Boy's Clubs 'युवक संघ' या संस्था विशेषतः व्यायामविषयक आहेत. अशा संस्था साधारणपणें कामकरी लोकांच्या वस्तींत असतात. तेथें पोहोण्याचा तलाव, व्हॉली बॉल, बिलियर्ड, पिंगपांग, इ. खेळ खेळण्याची सोय असते. त्यानंतर ज्यांना चित्रकला, संगीत, वक्तृत्वकला, नाटयकला इत्यादि गोष्टींची आवड असेल त्यांचेकरितां सर्व साधनसामग्री व शिक्षण यांची व्यवस्था केलेली असते. अशा एका संस्थेंत मुलांनीं भिंतीवर रंगविलेलीं चित्रें अगदीं चांगल्या चित्रकारानें काढलेल्या चित्रासारखीं होतीं.

**गरीबांची युनिव्हर्सिटी**

अशाच प्रकारची परंतु लहान, थोर सर्वांकरितां उपयोगी अशी संस्था म्हणजे सेटलमेंट हौस ही होय. या ठिकाणीं एका वर्षाच्या मुलापासून पन्नाशीच्या म्हाताऱ्यापर्यंत सर्वांना उपयुक्त असे कार्यक्रम चाललेले असतात. एका मोठया इमारतींत पोहोण्याचा तलाव, व्यायामशाळा, नाटकगृह, संगीतशाळा, देऊळ, ग्रंथसंग्रह, सभामंदिर, बैठे खेळ, स्टूडिओ इत्यादि सर्व सोयी केलेल्या असतात. सभासदांना अगदीं थोडी फी असते. सायंकाळीं आणि सुटीचे दिवशीं आबालवृद्धांनीं येथें येऊन वाटेल त्या कार्यक्रमांत भाग घ्यावा. गृहजीवनाला ही संस्था पूरक आहे. गरीबीमुळें ज्या गोष्टी घरीं करतां येत नाहींत

त्या थोडया खर्चांत येथें येऊन करितां येतात. अशा रीतीनें संस्कृति-संवर्धनाचीं साधनें गोरगरीबांच्याहि आटोक्यांत येतात. शहरांतील मोहापासून आणि व्यसनांपासून लोकांना अलिप्त ठेवण्याचे दृष्टीनें या संस्था फार उपयुक्त आहेत. हीं सेटलमेंट हौसेस अमेरिकेंतील गरीब लोकांच्या उन्नतीप्रीत्यर्थ फार उपयुक्त कामें करीत आहेत. प्रत्येक संस्थेमध्यें पगारी आणि स्वयं-सेवक असे अनेक समाजसेवक Social Workers असतात. यांच्या-तर्फे समाजाच्या बौद्धिक, सांस्कृतिक, आरोग्यविषयक, व्यायाम-विषयक, आर्थिक व शिक्षणविषयक गरजा भागविल्या जातात. या संस्थेचा जन्म आधुनिक यांत्रिक सुधारणेचे पोटीं झालेला आहे.

---

प्रकरण आठवें

## युगांतील नव्या संस्था

लहान धंदे—कॉटेज इंडस्ट्रीज—अमेरिकेंतून नष्ट झाले आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. भांडवल एकत्र आल्याशिवाय आणि मोठया प्रमाणावर उत्पादन केल्याशिवाय तें आर्थिक दृष्टया फायदेशीर होणार नाहीं असा सिद्धांत अमेरिकेनें बांधला आहे. त्यामुळें शेती आणि डेअरी यांसुद्धां सर्व धंदे मोठया प्रमाणावर चालले आहेत. एकेका कारखान्यांत हजारों माणसें असतात. कामाची विभागणी इतकी सूक्ष्म झालेली असते कीं, प्रत्येक कामकऱ्याकडे या कामापैकीं अगदीं लहान विभाग येतो. सहा ते आठ तास काम केलें तरी एका विवक्षित शारीरिक हालचालीपलीकडे कांहीं करावें लागत नाहीं. तयार होणाऱ्या वस्तूंतील एक लहानसा भाग तो करीत असतो. ती तयार झालेली वस्तु हजारों माणसांच्या श्रमानें बनलेली असल्यामुळें,

यंत्रासारखीं माणसें

कारागिराला आपल्या वैयक्तिक कौशल्याचा अभिमान वाटतो तो या यांत्रिक कामगाराला वाटत नाहीं. आणि एकच एक क्रिया दिवसभर करीत असल्यामुळें, कामगारांचें व्यक्तित्व जाऊन त्याला यंत्राचें स्वरूप येतें. अशा माणसास आपली स्वतंत्र कामगिरी दाखविण्याला वाव नसतो, त्यामुळें त्याचा बौद्धिक ताजेपणा नाहींसा होऊं लागतो.

दुसरी गोष्ट अशी कीं, यांत्रिक प्रगतीमुळें कामें वेगानें होतात, त्यांना पूर्वीइतकें मनुष्यबळ आणि वेळ लागत नाहीं. आज अमेरिकेंत इतकें यांत्रिक सामर्थ्य आहे कीं, कामाची व्यवस्थित वांटणी झाली तर प्रत्येक माणसाला रोज फक्त तीन तास काम करूनही श्रीमंतींत आणि ऐषआरामांत राहतां येईल. हे तीन तास काम केल्यावर बाकी दिवसभर काय करावें हा अमेरिकेपुढें मोठा प्रश्न येऊन पडला आहे. रिकामपणाचा सदुपयोग कसा करावा ( Problem of Leisure ) याविषयीं शिक्षणशास्त्रज्ञ आणि समाजपुढारी विचार करूं लागले आहेत. या प्रश्नांना उत्तर म्हणून कांहीं संस्था अस्तित्वांत आल्या आहेत.

रिकामपणाची कामगिरी

दिवसभर एकच काम करून कंटाळलेल्या माणसाला स्वतःची बुद्धि आणि कारागिरी वापरून हौसेनें काम करण्याची संधि मिळाली तर त्यांत त्याचा वैयक्तिक विकास होऊन, रिकामपणाचा वेळही चांगल्या रीतीनें जाईल. याकरितां हस्तोद्योग Hand-crafts आणि कलाव्यासंग Creative arts करण्याची संधि मिळेल अशा संस्था अस्तित्वांत येत आहेत. या ठिकाणीं लाकूड, माती, रंग, चित्रकलेचीं उपकरणीं, स्टूडियो इत्यादि अनेक उद्योगांचें आणि

प्रतिभा-पोषक रिकामपण

कलांचें साहित्य असतें. दिवसा एकच यांत्रिक काम करून कंटाळलेल्या जीवानें येथें यावें आणि घटकाभर आपल्या स्वातंत्र्य–बुद्धीला आणि प्रतिभेला पूर्ण मोकळीक द्यावी अशी सोय असते. या संस्थांच्या द्वारां सामान्य जनांना कलाव्यासंग करण्याला चांगली संधि मिळते.

रिकामपणाचा सदुपयोग करण्याचें शिक्षण लहान मुलांना प्रथमपासून मिळावें म्हणून सुटीचे दिवसांत Vacation Schools सुटींतील व्यवसाय व Summer Camps ग्रीष्म वननिवास या संस्था अस्तित्वांत आल्या आहेत. व्हेकेशन स्कूलमध्यें मुलें सकाळीं अथवा दुपारीं येऊन अनेक उपयुक्त व्यवसाय करीत असतात. लांकूडकाम, पत्राकाम, मातकाम इत्यादि हस्तव्यवसाय, चित्रकला, संगीतकला, लेखनव्यवसाय, वृत्तपत्रसंपादन, खेळ, गांवांतील स्थळें पाहाणें इत्यादि कार्यक्रमांचा त्यांत समावेश होतो. ज्या संस्थांना अधिक ऐपत असते त्या आपल्या मुलांना एकदोन महिने समुद्रकांठीं, डोंगरावर, अथवा अरण्यांत राहण्याकरितां घेऊन जातात. त्या ठिकाणीं वनसंचार, खेळ, हस्तव्यवसाय, निसर्गनिरीक्षण इत्यादि कार्यक्रम चालू असतात. भावी व्यवसायाचे दृष्टीनें आपली प्रवृत्ति शोधण्याचे कामीं आणि रिकामपणाचा सदुपयोग करण्याचे दृष्टीनें मुलांना या संस्थांचा चांगला उपयोग होतो.

शिक्षणाला सुटी, सुटींतील शिक्षण

समाजाचे बाल्यावस्थेंत उद्योगधंद्यांचें स्वरूप अगदीं साधें असतें आणि त्यांची संख्याही थोडी असते. बापाचा धंदा मुलानें करावयाचा अशी प्रथा असल्यानें उद्योगसंशोधन करण्याचा प्रश्नच नसे. आणि स्वतंत्र व्यवसाय करावयाचा झाला तरी लहान समाजाचे सर्व व्यवसाय व्यक्तीचे डोळ्यापुढें असल्यानें थोडया उद्योगां-

२००० धंदे, मी कोणता करूं?

तून एकादा निवडणें आणि ही निवड चुकल्यास धंदा बदलणें विशेष कठीण जात नसे. यांत्रिक युगामुळें आज समाज मोठे झाले आहेत आणि उद्योगधंद्यांची संख्या बेसुमार वाढली आहे. आज अमेरिकेंतील मोठे उद्योगधंदे कमींत कमीं २००० भरतील. यांतून आपण कोणता धंदा निवडावा हें व्यक्तीला केवळ निरीक्षणानें कळणें फार कठीण आहे. तसेंच लागलेला उद्योग सुटल्यानंतर पुनः कोणत्या धंद्यांत पडावें हें कळणेंही कठीण आहे. यांत्रिक शोधामुळें जुने धंदे बंद पडून नवीन धंदे अस्तित्वांत येत आहेत. अशा वेळीं बंद पडलेल्या धंद्यांतील लोकांना व्यवसायसंक्रमण करणें भाग पडतें. त्यांनीं कोणत्या नवीन धंद्याचें शिक्षण घ्यावें हा त्यांचेपुढें प्रश्न येऊन पडतो. हे सर्व प्रश्न वैयक्तिक खटपटीनें सुटण्यासारखे नाहींत. समाजांतील सर्व उद्योगधंद्यांची माहिती एकत्र असलेलें आणि व्यक्तीची लायकी पाहून तिला एकाद्या उद्योगाची शिफारस करणारें असें एकादें ठिकाण पाहिजे.

**धंदा कसा निवडावा ?**

या नवीन परिस्थितीला तोंड म्हणून Children's Guidance Bureaus उद्योग मार्गदर्शन संस्था, आणि Adjustment Bureaus व्यवसाय संशोधन संस्था, अस्तित्वांत आल्या आहेत. समाजांतील सर्व उद्योगधंद्यांची, त्यांच्यांत काम करीत असलेल्या लोकसंख्येची आणि त्यांपासून मिळणाऱ्या उत्पन्नाची नोंद या ठिकाणीं ठेवलेली असते. व्यवसाय शोधूं इच्छिणारा मुलगा अथवा पुरुष या ठिकाणीं आला म्हणजे मानसशास्त्रदृष्टीनें त्याची परीक्षा होऊन तो साधारण कोणत्या धंद्याला लायक होईल तें पाहिलें जातें. नंतर मुलगा असेल तर त्यास योग्य अशी धंदेशिक्षणाची शाळा सुचवितात आणि वयस्क माणसांना योग्य असा धंदा सुचवितात. अशा रीतीनें

व्यक्तीची लायकी, उद्योगधंद्यांची मागणी आणि माणसांचा पुरवठा या तीन गोष्टींची सांगड घालण्याचा प्रयत्न केला जातो.

अमेरिकेंतील औद्योगिक क्रांति, त्यामुळें समाजांत उत्पन्न झालेले प्रश्न, आणि ते प्रश्न सोडविण्याकरितां उत्पन्न झालेल्या संस्था या सर्व गोष्टींवरून हिंदुस्थानला आपलें स्वतःचें धोरण आंखलें पाहिजे. इतर राष्ट्रांचे हिंदुस्थानाशीं संबंध इतके निगडित झाले आहेत कीं, आपली इच्छा असो वा नसो, नवीन कल्पना आणि साधनें या देशांत येत आहेत आणि येत राहातील. यदृच्छेनें येतील त्या विचारांचा आणि साधनांचा डोळे झांकून स्वीकार करावयाचा, कीं चिकित्सक दृष्टीनें त्यांचें ग्रहण करावयाचें, हा आमच्यापुढें प्रश्न आहे. चिकित्सक दृष्टी ठेवावयाची झाली तरी चांगली गोष्ट कोणती आणि वाईट गोष्ट कोणती हें ठरविण्याचा कस आधीं निर्माण केला पाहिजे. औद्योगिक दृष्टीनें, आर्थिक तत्त्वज्ञानाचे दृष्टीनें व समाजरचनेचे दृष्टीनें आमचीं ध्येयें आणि योजना काय आहेत त्यांवर सर्व गोष्टी अवलंबून राहातील.

हिंदुस्थानचें धोरण

एवढी गोष्ट खरी कीं, मशीन अथवा यंत्र हें या जगांत जन्मास आलें आहे, आणि त्याची शक्ति आज इतकी वाढली आहे कीं, तें समाजाची घडी बदलून टाकीत आहे. पुराणप्रिय म्हणविणाऱ्या हिंदुस्थानांत औद्योगिक प्रगति बाल्यावस्थेंत असली तरी तिनें समाजांत फेरबदल घडवून आणल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. यांत्रिक सुधारणेमुळें जुने धंदे जाऊन नवे उत्पन्न झाले. त्यामुळें पिढीजाद धंदे नाहीसे होऊन सांपडेल तो व्यवसाय करावा अशी परंपरा पडूं लागली. त्यामुळें जन्मप्रधान कर्मविभागणी ढांसळली

हिंदुस्थानांत यंत्राचा प्रभाव

आहे. व्यवसायांचें क्षेत्र जन्मस्थानाच्या बाहेर गेल्यामुळें आणि यांत्रिक वाहतुकीचीं साधनें वाढल्यामुळें संयुक्त कुटुंबपद्धति मोडून विभक्त कुटुम्बपद्धति निर्माण झाली आहे. यांत्रिक युगांतील व्यवसायांच्याकरितां लागणाऱ्या दीर्घकाल शिक्षणमर्यादेमुळें आपल्या विवाहसंस्थेवर परिणाम झालेला आहे. सारांश, अल्प प्रमाणांत असलेल्या यांत्रिक सुधारणेमुळें आपल्या समाजांत अकल्पित क्रांति झाली आहे. अमेरिकेइतकी औद्योगिक सुधारणा येथें झाल्यास यापेक्षां कितीतरी पट क्रांति या समाजांत होईल. औद्योगिक सुधारणाहि करूं आणि पूर्व पद्धतीच्या समाजव्यवस्थेनेंहि राहूं असें म्हणणें म्हणजे स्वप्नसृष्टींत राहून सत्य जगाकडे डोळेझांक करण्यासारखें आहे.

पाश्चात्य देशांतील औद्योगिक क्रांतीमळें आपला एक फायदा झाला आहे तो असा कीं, त्यांच्या दोन शतकांच्या अनुभवाचा आपल्याला उपयोग करून घेतां येईल.

**यदृच्छा कीं पूर्वयोजना**

पाश्चात्य लोकांनीं यंत्राला प्रधान मानून त्याला अनुकूल अशी आपल्या समाजाची घडी बदलली आहे. हिंदुस्थानपुढें दोन मार्ग आहेत. एक यदृच्छेचा, म्हणजे पाश्चात्य देशाप्रमाणें यांत्रिक सुधारणेनें समाजांत आपोआप फेरबदल होऊं देणें आणि तो स्वीकारणें. दुसरा मार्ग पूर्वयोजनेचा, म्हणजे आमची भावी सामाजिक, आर्थिक, औद्योगिक समाजरचना काय असावी तें आधीं ठरवून मग त्याला अनुकूल असा यांत्रिक सुधारणेचा उपयोग करून घेणें. या दोन्हींपैकीं कोणता मार्ग स्वीकारावयाचा तें आपल्या जागरूकतेवर अवलंबून आहे. मशीनरी ही हिंदुस्थानांत येणार हें निश्चित आहे आणि हें इष्टही आहे. प्रश्न असा आहे कीं, मशीनरीनें समाज बदलणार कां समाज आपल्या इष्ट ध्येयाकरितां या मशीनरीचा पूर्ण उपयोग करून घेणार?

## प्रकरण ९ वें

# ऐहिक उत्कर्षाचें रहस्य

अमेरिकेंत प्रथम पाऊल टाकणाऱ्या नवख्या माणसाला एक गोष्ट विशेष झटकन् लक्षांत येते ती ही कीं, हरएक ठिकाणीं यंत्रांचा उपयोग करून मनुष्यबळाची जरुरी कमी केलेली आहे. शहरांमध्यें वाहतुकीच्या सोयीसाठीं जमिनीखालून जाणाऱ्या विजेच्या आगगाड्या चालू असतात, त्यांना सब्वे म्हणतात. त्यांतून रोज लाखो लोक जात येत असतात, परंतु त्यांना तिकिटें विकण्याकरितां किंवा तीं गोळा करण्याकरितां तिकीट मास्तरची जरुरी लागत नाहीं. प्रत्येक उतारूनें आपलें नाणें यंत्रांत टाकावें म्हणजे तें त्याला आंत सोडतें. स्टेशनमध्यें आणि इतरत्र फिरणाऱ्या अमेरिकन माणसाला नेहमीं तोंड हालवावयाला कांहीं तरी पाहिजे असतें त्याकरितां ठिकठिकाणीं भुईमुगाचे दाणे, चॉकोलेट इ. च्या पेट्या ठेवलेल्या असतात. आंत पैसा दोन पैसे टाकून मूठभर दाणे पडतील ते घ्यावे आणि पुढें चालूं लागावें. पैशा दोन पैशाच्या विक्रीकरितां मनुष्यबळ खर्च करणें येथें परवडत नाहीं. कांहीं कांहीं ठिकाणीं हॉटेलें अशीं आहेत कीं, तेथें २५–३० खिडक्यांतून विविध प्रकारचे खाद्य पदार्थ भरून ठेविलेले असतात, त्यांच्या किंमतीही तेथें बोर्डवर मांडलेल्या असतात. त्याप्रमाणें चवली पावलीचें नाणें यंत्रांत टाकावें म्हणजे भाजी, भाकरी, चहा, कॉफी, फळें, काय पाहिजे असेल तें आपोआप मिळतें. तें घेऊन टेबलावर बसून खावें, चालतें व्हावें. मनुष्यबळ वांचल्यामुळें अशा ठिकाणीं पदार्थही स्वस्त मिळतात. अशा खानावळींना 'ऑटोमॅट' म्हणतात. घराबाहेरील गोष्टी सोडून देऊन खुद्द स्वयंपाक घरांतील सोयी पाहिल्या तरी तीच

यंत्रमय जगत्

गोष्ट दिसून येते. घरीं स्वयंपाक करणाऱ्या अमेरिकन अन्नपूर्णेचें सुख पाहून हिंदुस्थानांतील कोणत्याही गृहलक्ष्मीला अमेरिकेंत जन्म घ्यावासा वाटेल. चुलीला पोतेरें घालून, रॉकेलचा काकडा लावून, छाती फुटेपर्यंत फुंकणीनें फुंकून, पेटलेल्या चुलीवर राख लावून भांडें ठेवण्यापासून तों शेवटीं नारळाच्या शेंडीनें भांडीं घासून बारा एक वाजतां हुश्श करून श्वास सोडणाऱ्या आपल्या माउलीचे श्रम आठवले, आणि अमेरिकेंतील गृहिणीच्या स्वयंपाकघरांतील सोयी पाहिल्या म्हणजे जमीन अस्मानाचें अंतर दिसतें. चूल पेटवावयाची असेल तर चावी फिरवून बटन दाबण्याचाच अवकाश. हात धुवावयास कढत पाणी घरांत चोवीस तास तयार. भाजी चिरण्याच्या, सोलण्याच्या, किसण्याच्या, रस काढण्याच्या, वगैरे हरएक कामाकरितां श्रम वांचविणारी सोयीस्कर यंत्रसामग्री घरांत तयार असते. भांडीं घासण्याकरितां यंत्रांत घालून काढावींत आणि आरशाप्रमाणें चक्क तोंड पाहून घ्यावें ! कपडे धुण्याकरितां घरांत एक यंत्र, वाळविण्याकरितां दुसरें यंत्र. सारांश, शोधकांनीं आणि शास्त्रज्ञांनीं बायकांचे श्रम कल्पनेबाहेर हलके केले आहेत. सामान्य माणसाच्या हरघडी लक्षांत येणाऱ्या या गोष्टी आहेत. यापेक्षां लाखो गोष्टी अशा आहेत कीं, त्या ठिकाणीं बुद्धीचा उपयोग करून यंत्रयोजनेनें मनुष्याचे श्रम हलके झाले आहेत आणि रोजच्या जीवनाच्या सुखसामग्रींत भर पडली आहे. अमेरिकेंतहि मधून मधून Depression म्हणजे दुष्काळासारखे व्यापारमंदीचे दिवस येतात. परंतु हा दुष्काळ हिंदुस्थानच्या सुकाळापेक्षां अधिक सुखाचा आहे असें येथील हिंदी लोक म्हणत असतात.

औद्योगिक-यांत्रिक प्रगति होऊन भौतिक सुखसमृद्धि वाढण्याला अमेरिकन लोकांचे बौद्धिक व शारीरिक श्रम कारण झाले

आहेत. हे लोक ३०० वर्षांपूर्वी आले तेव्हां अमेरिका म्हणजे निव्वळ अरण्य होतें. परंतु तेथेंच आज नंदनवनाची शोभा आणि सुखें आलीं आहेत. या घटकेला अमेरिकेंतील हजारों डोकीं शास्त्रीय आणि औद्योगिक शोधांत गुंतलेलीं आहेत. अमेरिकन लोकांची

सर्वत्र औद्योगिक संशोधन व प्रयोग

विशेष प्रवृत्ति व्यावहारिक आहे शास्त्राचा व्यवहारांत उपयोग कसा करितां येईल, याकडे त्यांचें नेहमीं लक्ष असतें. कॉलेजमध्यें प्रयोगशाळांतून तात्त्विक आणि व्यावहारिक विषयांवर संशोधन चालू असतें. प्रत्येक कारखान्याला जोडून प्रयोगशाळा असतात, त्यांतून औद्योगिक संशोधन चालू असतें. रेडिओ, ऑटोमोबील इत्यादि वापरणाऱ्या सामान्य माणसांनीं जरी लहान सहान शोध करून कारखान्याला सुधारणा सुचविल्या, तरी त्यांचा उपयोग करून त्या व्यक्तीचा कारखानदाराकडून यथायोग्य गौरव केला जातो. सारांश, येथील शास्त्र आणि शास्त्रीय पंडित ( म्हणजे कॉलेजमधील सायन्सचे प्रोफेसर ) हे संन्याशाप्रमाणें व्यवहारापासून अलिप्त राहिलेले नाहींत, म्हणून शास्त्राचा आणि शास्त्रज्ञांचा प्रत्यक्ष जीवनांत उपयोग होऊन राष्ट्र सुखी झालें आहे. हिंदुस्थानांतील सायन्सच्या प्रोफेसरांची आणि शास्त्रज्ञांची वृत्ति Pure Science मध्यें इतकी रंगलेली असते कीं शास्त्राचा व्यावहारिक उपयोगाच्या दृष्टीनें विचार करणें त्यांना खालच्या दर्जाचें वाटतें. ही स्थिति आहे तोंपर्यंत बायकांनीं छाती फुटेपर्यंत घरीं चुलीपाशीं फूं फूं केलें पाहिजे आणि प्रोफेसरांनीं कॉलेजच्या ' मायक्रॉस्कोपच्या ऑर्डरी ' यूरोपमध्यें दिल्या पाहिजेत !

शाळा, कॉलेजें, कारखाने यांच्या प्रयोगशाळांव्यतिरिक्त इतर अनेक मार्गांनीं जनतेस आणि विशेषतः तरुण वर्गास शास्त्रीय

आणि औद्योगिक विषयाची गोडी लागावी म्हणून हरतऱ्हेचे प्रयत्न केले जातात. त्यांपैकीं विशेष महत्त्वाचा प्रयत्न म्हणजे स्थायिक अथवा हंगामी औद्योगिक-शास्त्रीय प्रदर्शनें भरविणें हा होय. बहुतेक मोठ्या शहरीं एक कायमचें Museum of Science and Industry असतें. प्रदर्शन या शब्दानें येणाऱ्या कल्पनेपेक्षां पुष्कळ व्यापक प्रकारचे कार्यक्रम या संस्थांमार्फत केले जातात. शाळा आणि कॉलेजें यांना त्यांच्या अभ्यासक्रमांत या प्रदर्शनाचा उपयोग मुबलक व्हावा म्हणून सर्व प्रकारच्या सोयी केल्या जातात. कांहीं वेळेस कॉलेजचे वर्गच प्रदर्शनाचे जागेंत भरवितात. म्युझियमच्या जागेंत औद्योगिक व शास्त्रीय विषयांवर नेहेमीं व्याख्यानें चालू असतात. त्यांकरितां चित्रपटांचा पुष्कळ उपयोग केला जातो. न्यूयॉर्कमधील म्युझिअमच्या एका आठवड्यांतील कांहीं व्याख्यानांचीं नांवें पुढें दिलीं आहेत. त्यांवरून विषयांचें स्वरूप सामान्य माणसाला व्यावहारिक उपयोगाचें आणि त्याच्या ग्रहणशक्तीच्या आटोक्यांतलें असतें हें लक्षांत येईल.

धंदेवाल्यांनाही शास्त्रीय आवड

History of Gas lighting गॅस दिव्यांची माहिती व इतिहास, Sky Haibour विमानें, Empires of Steel पोलादाचा इमारत कामांत उपयोग, Far Speaking टेलिफोन, रेडियो; Revelations of the X Ray क्ष किरणांचे चमत्कार, Romance of Power विजेचा व्यावहारिक उपयोग.

हे चित्रपट बहुतेक निरनिराळ्या कारखान्यांनीं आपल्या मालाच्या अप्रत्यक्ष जाहिरातींकरितां तयार केलेले असतात. पण त्यांत उपयुक्त माहिती भरपूर असते.

यांत्रिक शोधांचा फायदा किती आहे, हें तुलनेनें दाख-

विण्याकरितां चीन व हिंदुस्थान देशांतील खाणींत आणि शेतांत श्रमानें चाललेल्या कामाचीं चित्रें दाखविलीं जातात. खाणींत शेंकडों स्त्री–पुरुष हातांनीं कामें करून रोजीं दहा आणे मिळवीत आहेत, असा देखावा संपल्याबरोबर लगेच अमेरिकन कारखान्यांतील आणि शेतांतील मजूर यंत्रसाहाय्यानें किती सुखानें काम करून रोजीं (पांच डॉलर) पंधरा रुपये मिळवितो याचें चित्र दाखविलें जातें. सारांश, यंत्रसाहाय्यानें श्रम कमी होऊन मजुरी अधिक मिळते ही गोष्ट प्रेक्षकांच्या मनावर अनेक मार्गांनीं बिंबविली जाते.

या तुलनात्मक पद्धतीचा उपयोग प्रत्येक ठिकाणीं केलेला दिसून येतो. न्यूयॉर्कमधील म्युझिअमच्या पहिल्या दालनांत शिरल्या-

**हिंदुस्थानी जातें व अमेरिकन यंत्र**

बरोबर एक हिंदुस्थानांतील देखावा दृष्टीस पडतो. तो पाहून खेडेगांवांतील पहांटेच्या दळणाच्या जात्याच्या घरघरीची आठवण झाल्यावाचून राहात नाहीं. चाळीस पन्नास वयाच्या दोन मारवाडी बाया दगडाच्या जात्यावर गहूं दळीत बसल्या आहेत, अंगांवर रुपेरी दागिने, पायांत पैंजण, आणि इंडियन–प्रिंटचें चिटाचें लुगडें असा त्यांचा पोषाख. याच चित्राशेजारीं लहान आकाराची यांत्रिक पिठाची चक्की ठेवली आहे. हिंदुस्थान आणि अमेरिका, मनुष्य-बळ आणि यंत्र, केवळ शरीरश्रम आणि बौद्धिक–शारीरिक श्रमाची सांगड, १६ वें शतक आणि २० वें शतक, हा विरोध जातें आणि यांत्रिक चक्की यांच्या चित्रांचे साहाय्यानें चटकन् लक्षांत आणिला जातो.

प्रदर्शनाचीं १०।१२ दालनें आहेत. शास्त्र आणि व्यवहार यांचा संबंध लक्षांत यावा, अशा रीतीनें त्यांची योजना केलेली आहे. न्यूयॉर्क सारख्या शहरांत जगांतील कानाकोपऱ्यांतून खाद्य

वस्तू कशा आणल्या जातात, त्यांत शास्त्राचा उपयोग कसा केला जातो, इ. गोष्टी यंत्रें आणि चित्रपट यांच्या साहाय्यानें दाखविल्या जातात. कापड आणि राहण्याचीं घरें यांत गेल्या दोन शतकांत कशी क्रांति झाली हें एका दालनांत दाखविलें आहे. वाहतुकीच्या साधनांत खटाऱ्यापासून विमानापर्यंत कशी उन्नति झाली, ती जुन्या नव्या यंत्रसामग्रीच्या साहाय्यानें दाखविली आहे. प्रत्येक यंत्राचे सुटे सुटे भाग दाखवून, त्यांत शास्त्रीय तत्त्व काय आहे त्याची माहिती होईल अशी सोय असते. विमानाच्या दालनांत एक लहान विमान ठेविलें असून मुलाबाळांनीं त्यांत जाऊन बसावें आणि यंत्र-सामग्री पाहून घ्यावी. याशिवाय टेलीफोन, रेडिओ, निरनिराळी मशिनरी, विजेचीं यंत्रें इत्यादि शोधांचें सामान्य जनाला व मुला-बाळांना आकलन होईल अशा रीतीनें सर्व प्रदर्शन मांडलेलें असतें.

**यांत्रिक जिज्ञासा वाढविली पाहिजे**

विशेष गोष्ट म्हणजे मुलाबाळांनीं देखील वाटेल त्या यंत्राला हात लावून तें चालवून पाहावें. प्रत्येक यंत्राला विजेचें बटन असतें, तें दाबलें कीं यंत्र सुरू होतें आणि त्याच्या क्रिया दिसतात. या सोयींत एक महत्त्वाचें तत्त्व आहे. खरी जिज्ञासा मुलांना असते. त्यांना हात लावण्यास किंवा यंत्र चालविण्यास प्रतिबंध करण्यापेक्षां या प्रवृत्तीला उत्तेजन दिलें पाहिजे, हें मुख्य धोरण आहे. कारण भावी शास्त्रज्ञ आणि संशोधक याच मुलांतून निर्माण होणार आहेत. प्रत्येक यंत्रापाशीं एक छोटा चलत् चित्रपट असतो. जिज्ञासूंनीं बटन दाबलें, कीं त्या यंत्राची अथवा विषयाची फिल्म सुरू होऊन ती दहा पंधरा मिनिटें चालते. सारांश, जिज्ञासा जागृत करून ती तृप्त करण्याचा शक्य तों प्रयत्न केलेला आहे.

अमेरिकेंत प्रवास करणाऱ्याला अमेरिकन लोक चैनींत

आणि सुखांत असलेले दिसतात. या सुखाच्या मुळाशीं अमेरिकेंतील शास्त्रीय आणि औद्योगिक प्रगति आहे. आणि या औद्योगिक प्रगतीचीं मुळें शिक्षणसंस्था, प्रयोगशाळा, कारखाने व औद्योगिक प्रदर्शनें यांतून खोलवर पसरलेलीं आहेत. देशाची भौतिक उन्नति करावयाची असेल तर बहुजन समाजांत आधीं शास्त्रीय शोधांची आणि शास्त्रीय उद्योगधंद्यांची आवड उत्पन्न झाली पाहिजे ही गोष्ट अमेरिकेपासून शिकण्यासारखी आहे.

चैनीच्या मुळाशीं शास्त्रीय श्रम

———— ————

विभाग दुसरा

# रशिया : पंधरा वर्षांतील क्रांति

प्रकरण दहावें

## रशियन समाजाचें दर्शनी चित्र

विसाव्या शतकाचा इतिहास लिहितांना भावी रियासतकार कदाचित् या कालखंडाला 'क्रांति-शतक' अशा अन्वर्थक नांवानें संबोधतील असें वाटतें. "मुलाचे पाय पाळण्यांत" या न्यायानें विद्यमान शतकाचीं पुरीं ३५ वर्षें लोटलीं नाहींत तोंच जगांतील कित्येक राष्ट्रांत महत्त्वाच्या क्रांत्या झाल्या आहेत. अधिकारसंक्रमणाच्या उंबरठ्यावर पाऊल ठेविलेल्या हिंदुस्थानला क्रांतिप्रवृत्त आणि उत्कर्षशील अशा सर्व राष्ट्रांच्या इतिहासाविषयीं आणि वर्तमानाविषयीं जिज्ञासा वाटत आली आहे.

चालू शतकाचा क्रांतिकारक-प्रारंभ

जपाननें रशियावर मात करून विजय मिळविल्याबरोबर हिंदी तरुणांनीं जपानी वीरांच्या कथा वाचल्या; आयर्लंडांतील स्वातंत्र्य प्रयत्नांच्या इतिहासाच्या आवृत्त्या केल्या; इटालियन राष्ट्रवीरांचीं चरित्रें चोरून वाचलीं आणि अशा रीतीनें स्वतःच्या देशांतील राष्ट्रीय भावना प्रदीप्त ठेविली. चालू पिढींत परवां परवां झालेल्या क्रांत्यांची छाया पुढील शतकावर पडणार असून त्यांच्या मुळाशीं असलेल्या विचारप्रवाहांचा ओघ लहान मोठ्या सर्व समाजांत वाहून त्यामुळें प्रस्थापित आणि परंपरागत राजकीय विचार गदगदा हालविले जातील यांत शंका नाहीं. एकोणिसाव्या शतकाचे अखेरपर्यंत राजसत्ता, लोकशाही, आणि साम्राज्यशाही हे विचार लोक-

मान्य होते. महायुद्धानंतरच्या काळांत रशिया, इटली, जपान आणि जर्मनी यांचीं राजकीय स्थित्यंतरें झालीं आहेत.

इटलीनें फॅसिझमच्या जोरावर युरोपमधील पहिल्या प्रतीच्या राष्ट्रांत स्थान मिळविलें; जर्मनींत नाझीझम् उत्पन्न होऊन त्यानें युरोपमधील राष्ट्रांच्या काळजांत धडकी भरविली; रशियानें अभूतपूर्व अशी समाजक्रांति करून निर्माण केलेल्या सत्तेला बलवान् राष्ट्रांची मान्यता मिळविली, आणि जपाननें युरोपियन राष्ट्रांचे अथवा श्वेत-वर्णीयांचे प्रस्थापित वर्चस्वाला आव्हान करून आशिया खंडांत साम्राज्यशाहीच्या नवीन युगास प्रारंभ केला. जगांत चाललेल्या या सर्व प्रयोगांचें अंध वृत्तीनें अनुकरण न करितां चिकित्सक वृत्तीनें त्यांचें निरीक्षण केलें पाहिजे. त्यांतील त्याज्य-ग्राह्य भागांची निवड करून स्वतःचे ध्येयाला पोषक अशा साधनांचा उपयोग करून घेणें अवश्य आहे.

रशिया आणि हिंदुस्थान

औद्योगिक संघटना, शिक्षणविस्तार, सामाजिक संघटना इ. अनेक दृष्टींनीं रशियांत चाललेल्या प्रयोगांपासून हिंदी कार्य-कर्त्यांना उपयुक्त सूचना मिळण्यासारख्या आहेत. अफाट देश-विस्तार, वाढती आणि मोठी लोकसंख्या, बहुजन समाजाचें अज्ञान, औद्योगिक बाल्यावस्था, समाजांतील भाषादिकांची विविधता इ. दृष्टींनीं रशिया आणि हिंदुस्थान यांत साम्य आहे. फरक इतकाच कीं, स्वतःच्या उत्कर्षाचीं सर्व साधनें रशियानें तयार केलीं असून तो सामर्थ्यप्राप्तीचे मार्गावर आहे आणि हिंदुस्थानला अद्याप तीं साधनें बनवावयाचीं आहेत.

'रेडस्क्वेअर' नांवाच्या प्रचंड चौकांत संध्याकाळीं पांचच्या सुमारास हजार दोन हजार लोकांची रांग लागलेली दिसते आणि

सात वाजेपर्यंत लोक या समूहांत सामील होत असतात. आंषाढी एकादशीला विठ्ठलवाडीला अथवा कार्तिकी यात्रेला पंढरपुरास पोलीस दारांत उभे राहून दोनतीन माणसें आंत सोडतात त्याचप्रमाणें येथें दोन दोन माणसें संथपणें एका दरवाज्यांतून आंत जातात. परंतु येथें धार्मिक स्वरूपाचें देवालय नसून राजकीय पुरुषाची समाधि आहे. रशियन राज्यक्रांतीचा विचारप्रवर्तक आणि कर्मवीर निकोलस लेनिन याचा देह या समाधींतच एका कांचेच्या पेटींत ठेविला असून हजारों लोक रोज त्याचें दर्शन घेऊन जात असतात. कॉकेशस पर्वतांतून आणलेल्या पांढरट काळ्या संगमरवरी दगडांनीं समाधीचें बाह्यांग सजविलें असून अंतर्भागांत एकजात जांभळा आणि क्वचित् निळा संगमरवरी दगड वापरला आहे. मंद प्रकाशामुळें आणि शांततेमुळें आंतमध्यें गांभीर्याचें वातावरण असतें. दर्शनेच्छू लोकांना लेनिनचा लष्करी पोषाखांतील निद्रिस्त देह पाहावयास सांपडतो. गुळगुळीत टक्कल पडलेलें डोकें, पिंगट दाढीमिशा, विचारी व करारी मुद्रा आणि सामर्थ्यदर्शक मूठ; एवंगुणविशिष्ट ही लेनिनची ठेंगणी मूर्ति पाहून, एकेका विचारास आयुष्य वाहिलेली एकेक व्यक्ति जगांत किती मोठें कार्य करूं शकते असा विचार मनांत येतो.

रशियाचा देव लेनिन

समाधीच्या बाहेर पडून रस्त्यांत चालूं लागावें म्हणजे ह्या लेनिननें निर्माण केलेला नवीन समाज आणि नवीन जग दिसूं लागतें.

लेनिनग्राड आणि मास्को हीं शहरें ३०–३५ लाखांचीं म्हणजे लोकसंख्येनें जगांतील पांचव्या सहाव्या क्रमाचीं आहेत. परंतु न्यूयॉर्क, लंडन, पॅरिस, व्हिएन्ना, बर्लिन या ठिकाणीं रस्त्यांतून दिसणाऱ्या समाजापेक्षां रशियन शहरांचे रस्त्यांतील समाज अगदीं

कामकरी समाजाची संस्कृति

भिन्न आहे. या रस्त्यांत पाऊल टाकल्याबरोबर आपण एका निराळ्या समाजांत आणि संस्कृतींत आलों आहों अशी जाणीव उत्पन्न होते. रुबाबदार पोषाख किंवा डौलदार वस्त्रें परिधान केलेल्या स्त्रिया येथें नाहींत. हा कामकरी वर्गाचा समाज आहे. मध्यम वर्ग म्हणून संबोधला जाणारा वर्ग अथवा त्याच्या निदर्शक व्यक्ती येथील समाजांत दिसत नाहींत. उंच उंच मापासारख्या टोप्या ( इंग्लिश प्रधानांचीं चित्रें पाहा ), उंच टाचांचे बूट, पायघोळ लंगे आणि इस्तरी केलेले सूट या ठिकाणीं दिसत नाहींत. यूरोपियन शहरांतील औद्योगिक भागांतून फिरत असतां जो कामकरी समाज दिसतो तोच समाज मास्को—लेनिनग्राडमध्यें सर्व रस्त्यांतून दृष्टीस पडतो. ही श्रीमंतांची वस्ती आणि ही गरीबांची वस्ती अथवा Slums असा भेद येथें नाहीं. थोडक्यांत, हा कामकरीवर्गाचा समाज आहे आणि ही त्यांची संस्कृति आहे.

युरोपमधून रशियांत आल्याबरोबर हिंदुस्थानच्या दारिद्र्याचें चित्र डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभें राहातें. राजरस्ते सोडून आडरस्त्याला गेल्याबरोबर चिखल आणि खांचखळगे लागतात. घरांना दिलेले रंग फिक्के पडले असून अनेकांची डागडुजी करण्याची राहिली आहे.

दारिद्र्यांत हिंदुस्थानची नक्कल

बाहेरून भव्य दिसणाऱ्या एकाद्या वाड्याच्या आंत गेल्याबरोबर लोकांच्या घरांतील गरीबी दिसूं लागते. रस्त्यांत चालणाऱ्या कांहीं लोकांच्या पायांत चांगले जोडे आहेत तर कांहींनीं फाटक्या बुटांना पुरवण्या देऊन थंडीनिवारणाची सोय केली आहे. उत्तर रशियांत थंडीमुळें हरएक मार्गांनीं शरीर उबदार ठेवणें भाग असल्यामुळें कांहींनीं साधेसुधे पोषाख घातले आहेत, इतरांनीं ठिगळें देऊन जुन्या फाटक्या कपड्यांवर शरीरसंरक्षण चालविलें

आहे. भुकेची वेळ झाली कीं लोक असतील तेथें आपली शिंधोरी सोडून खाऊं लागतात. त्यांचें अन्न म्हणजे बाजरीसारख्या धान्याचें रोट, फिक्का चहा आणि साखरेचे एकदोन खडे. रस्त्यावर खाणाऱ्या व्यक्तीचेंच हें अन्न नसून मोठमोठ्या रीसर्च लॅबोरेटरीमधून काम करणाऱ्या लोकांना मधल्या वेळच्या जेवणाला हेंच अन्न खातांना मी पाहिलें आहे. स्थानिक अधिकारी परदेशी उतारूंना बहुतेक तिसऱ्या वर्गांतून प्रवास करण्यापासून निवृत्त करितात. परंतु लेखकानें समाज-निरीक्षणाकरितां मुद्दाम तिसऱ्या वर्गांतून प्रवास केला. थेट हिंदुस्थानच्या दारिद्र्याची नक्कल! सोय एवढीच कीं, प्रत्येकाला एक स्वतंत्र बांक मिळतें. परंतु बहुजन समाजाची भौतिक सामग्री, पोषाख आणि अन्न या दृष्टीनें गरीबीची स्थिति तीच आहे. अशा समाजांत व्यवस्थित पोषाख केलेला आणि जरा चांगली टोपी घातलेला एकादा मनुष्य दिसला कीं, लोक भोंवतीं जमून त्याचेकडे पाहूं लागतात.

परंतु वर वर्णन केलेली दारिद्र्याची स्थिति ही पूर्वपरि-स्थितीपेक्षां फार बरी आहे. विद्यमान परिस्थितीची प्रवृत्ति खालीं जाण्याकडे नसून सुधारण्याकडे आहे. पंचवीस वर्षांपूर्वी रशियांत असलेल्या आणि दोन वर्षांपूर्वीं येथें आलेल्या अशा दोन गृहस्थांशीं बोलण्याचा प्रसंग आला असतां त्यांनीं सांगितलें : सध्यांची परि-स्थिति पूर्वीपेक्षां सुधारलेली आहे. निदान साधे पण भरपूर कपडे, कसेतरी बूट आणि कांहींतरी अन्न लोकांना खावयास मिळत आहे. पूर्वीं इतकीही चांगली परिस्थिति नव्हती.

या समाजचित्रावरून सध्यांच्या सोव्हिएट सरकारपुढें अस-लेल्या कार्याची कल्पना येईल. सोळा कोटी लोकांना भरपूर कपडे-लत्ते, अन्न, राहण्याच्या जागा आणि जीवनोपयोगी वस्तू निर्माण

करणें, या लोकांना आरोग्याचें आणि सुसंस्कृत जीवनपद्धतीचें शिक्षण देणें, आणि हें सर्व करणाऱ्या शासनपद्धतीचे त्यांना बोधपूर्वक अनुयायी बनविणें असें प्रचंड कार्य सोव्हिएट सरकारनें हातीं घेऊन धडाडीनें चालविलें आहे.

नवीन समाजाची उभारणी

उत्पत्ति, स्थिति आणि लय अशा तीन अवस्था आहेत, त्यांपैकीं पहिल्या अवस्थेची भावना रशिया पाहतांना होते. जिकडेतिकडे उभारणीचें आणि बांधण्याचें काम चालू आहे; रस्त्यांत दगडांचे ढीग पडलेले असून डांबरी पक्के रस्ते बांधले जात आहेत; कोठें लोखंडी रूळ पडले असून नवीन ट्रामरस्ता घालण्याचें काम चालू आहे; कोठें पांच मजली इमारत वाढवून ती आठ मजली करीत आहेत; कोठें आधुनिक शिल्पपद्धतीच्या नवीन इमारती उभारल्या जात असून शेजारी जुन्या इमारतीचे अवशेष आणि नवीन बांधकामाचा मालमसाला पडला आहे; कोठें नवीन कारखान्यांच्या इमारती चालल्या असून त्यांत उभारण्याची यंत्रसामग्री येऊन पडली आहे. सारांश नवीन रचना, उभारणी, बांधकाम हें प्रत्येक रस्त्यांतून, प्रत्येक भागांतून आणि प्रत्येक शहरांतून चालू आहे. या सर्व संघटनेच्या मागें एक योजक शक्ति असून तिच्या प्रेरणेनें या सर्व गोष्टी चालू आहेत असें वाटूं लागतें. यूरोप—अमेरिकेंतील शहरें पाहतांना एकप्रकारची पूर्णतेची जाणीव होते. तेथें शिल्प, संस्कृति, समाज यांचें बांधकाम पूर्ण झालें असून त्याला स्थिर स्वरूप आलें आहे असें वाटतें. तेथें रस्त्यांतून अडगळ दिसत नाहीं किंवा एकादी गोष्ट बांधकामाचे दृष्टीनें अपुरी राहिली आहे असें भासत नाहीं. तेथील संस्कृति उत्पत्तीच्या प्राथमिक अवस्थेंतून स्थितीच्या साहजिक अवस्थेंत गेली आहे. रशियांतील भौतिक आणि मानवी संस्कृति

यंत्रें व मुलें यांवर रशियाचें प्रेम आहे



यंत्रांशीं खेळणाऱ्या मुलांतूनच पुढें संशोधक निघतील.



कामकरी वर्गाचे राज्यांतील नागरिक

उत्पत्तीच्या प्राथमिक अवस्थेंत आहे. इकडील म्युनिसिपालिटीचे ज्याप्रमाणें वर्षभर 'काम चालू' असून 'रस्ते बंद' असतात, त्याप्रमाणें रशियांत ठिकठिकाणां प्रचंड कामें चालू आहेत, परन्तु रस्ते मात्र बंद नसून वाहते आहेत.

मास्को आणि लेनिनग्राड (पूर्वींचें पेट्रोग्राड) हीं शहरें रशियन झार बादशहांनीं वसविलेलीं असून त्यांचे आणि त्यांच्या सरदार अमीरउमरावांचे प्रचंड राजवाडे आणि विलासस्थानें या शहरांतून आहेत. परंतु एके काळीं अमीरांच्या वस्तीनें गजबजलेल्या या शहरांतून आज जनतेचें साम्राज्य पसरलेलें आहे. श्रीमंतांनीं जेथें आपले विलास उधळले त्या ठिकाणीं शिक्षणाच्या आणि संशोधनाच्या संस्था स्थापन झाल्या आहेत. खाशांच्याकरतां राखून ठेवलेल्या उद्यान-उपवनांतून आतां सामान्य जनांकरितां आणि कष्ट करून थकून आलेल्या कामकरी वर्गाकरितां विश्रांतीच्या, शिक्षणाच्या आणि सुसंस्कृत मनोरंजनाच्या सोयी केलेल्या आहेत. राजकुमार आणि राजकन्या यांचेकरितां खास बांधलेल्या एका इमारतींत आज २०० च्या ठिकाणीं २००० सामान्य विद्यार्थी–विद्यार्थिनी शिकत आहेत. ज्या नाटयशालांतून फक्त बादशहांच्या पाहुणे मंडळीकरितां खास प्रयोग होत असत तेथेंच आज सामान्य कामकरी पुरुष आणि स्त्रिया जाऊन उच्चतम अशा कलांचा अनुभव घेत आहेत. रशियन क्रांतीचें वैशिष्टय यांत आहे. भौतिक सुखें, समृद्धि, आणि सुसंस्कृत कला यांच्याभोंवतीं वरिष्ठ समाजवर्गानें घातलेले कृत्रिम आर्थिक बंधारे फोडून संस्कृतीचा प्रवाह बहुजन समाजांत तिनें वाहता केला आणि अखिल जनता-जनार्दनाच्या उद्धाराच्या कार्याला प्रारंभ केला. पाश्चात्य शहरांतून दिसून येणारीं बेलगामी नृत्यगृहें, कामुक कर-

जुन्या नव्या रशियांतील फरक

मणुकी आणि उत्तेजक विलासस्थानें रशियांत नाहींत, कारण नवीन समाजरचनेच्या उत्साहानें कार्यदक्ष बनलेल्या गंभीर मनोवृत्तीला हे प्रकार पोरकट वाटतात; परंतु कलांचे संस्कार या दृष्टीनें पोरा-पासून थोरापर्यंत सर्व स्त्रीपुरुषांचें मनोरंजन करून त्यांना शिक्षण देणारीं स्थानें जागजागीं पसरलीं आहेत.

रशियन लोक आज गरीब आहेत. ते साधे किंवा फाटके कपडे परिधान करून चहामाकरीवर दिवस काढीत आहेत. परंतु पाश्चात्य राष्ट्रांत ठिकठिकाणीं दिसून येणारे बेकार लोकांचे निकामी फिरणारे थवे येथें दिसत नाहींत. प्रत्येक जण कामांत गुंतला असून उद्यां काम कोठें मिळेल या चिंतेची छटा कोणाच्या तोंडावर नाहीं. आज गरीबींत दिवस काढीत असलों तरी, कालांतरानें परिस्थिति सुधारत असून आपल्याला व्यक्ति व समाजदृष्टया उत्कर्षाचे दिवस येतील असा आत्मविश्वास लोकांचे ठिकाणीं आलेला आहे. हिंदुस्थानच्या आणि रशियाच्या समाजांत दारिद्र्य-दृष्टीनें साम्य दिसत असलें तरी रशियन लोकांत असलेली आशेची आणि आत्मविश्वासाची भावना आज हिंदुस्थानांत नाहीं, हा फरक अत्यंत मोठा आहे.

बेकारी तरा नाहीं

——— ———

## प्रकरण अकरावें

# रशियांत क्रांति कां झाली ?

योगायोग मोठा विचित्र आणि विचार करण्यासारखा आहे. कार्ल मार्क्सचा जन्म जर्मनींत झला, त्याचें लेखन जर्मन भाषेंत झालें, परन्तु त्याच्या विचारांचें मूर्तिमंत व्यवहारांत रूपांतर जर्मनींत न होतां रशियांत झालें, आणि त्याचे शिष्यांना १९३३ सालीं जर्मनींत राहणें अशक्य होऊन तुरुंग किंवा देशांतर यांचा मार्ग पत्करावा लागला ! कोणत्याही तत्त्वज्ञानाचें सामाजिक आचारांत रूपांतर होण्याला त्या समाजांत अनुकूल भूमिका तयार व्हावी लागते. सर्वसामान्य जनतेची मनोवृत्ति या तत्त्वज्ञानाचे ग्रहणास अनुकूल झाल्याशिवाय केवळ विचारांचे जोरावर समाजांत क्रांति होऊं शकत नाहीं. अशा प्रकारची अनुकूल भूमिका रशियांत होती आणि जर्मनींत नव्हती. शतकानुशतकें रशियन झारशाहीच्या आणि सरदारशाहीच्या जुलुमामुळें प्रजा इतकी गांजून गेली होती कीं क्रांति किंवा मृत्यु यांशिवाय दुसरा मार्गच तिला दिसत नव्हता. क्रांतिपूर्व रशियन इतिहास पाहिला म्हणजे ही क्रांति यापूर्वींच कशी झाली नाहीं असें वाटून मानवजातीच्या सहनशीलतेबद्दल कौतुक आणि स्वार्थी जुलूमशाहीविरुद्ध तिरस्कार उत्पन्न होतो.

जर्मन कार्ल मार्क्सचा रशियांत जय कां ?

ज्या ऐतिहासिक परिस्थितीमुळें राज्यक्रांति झाली तो इतिहास विद्यमान आणि भावी पिढयांना साद्यंत आणि समूर्त स्वरूपांत कळावा अशी सोव्हिएट सरकारनें काळजी घेतली आहे. लोकशिक्षणाच्या कामीं म्यूझियम्सचा उपयोग त्यांनीं पूर्णपणें करून घेतलेला असून त्यांच्या योजनेंत मोठी कल्पकता दाखविली आहे.

झारशाहींतील तुरुंग व राजकीय कैदी

पीटर आणि पॉल नांवाचा एक जुना किल्ला लेनिनग्राडमध्यें असून त्या किल्ल्यांत एका बाजूस धर्माचें चिन्ह म्हणून सुंदर कॅथीड्रल ( देऊळ ) आहे आणि दुसरे बाजूस विधर्माचें चिन्ह म्हणून राजकीय कैद्यांना कोंडण्याचा एक जुना तुरुंग आहे ! या तुरुंगाचें दर्शन घेतलें म्हणजे पूर्वीच्या अमदानींत राजकीय कैद्यांना किती अमानुषपणें वागविलें जात असे तें समजून, सुधारलेल्या मानवांनीं अद्यापही त्याची परंपरा चालविली आहे हें पाहून मनाला खंती वाटते. तुरुंगाच्या निरनिराळ्या खोल्या पाहिल्या म्हणजे क्रमाक्रमानें त्यांच्यांत कुधारणा कसकशा होत गेल्या तें समजतें. पूर्वीच्या एका कोठडींत कॉट आणि टेबल–खुर्ची जमिनीपासून अलग असत. डांबून ठेवलेले राजकीय कैदी कंटाळून जाऊन इकडची टेबल–खुर्ची तिकडे, तिकडची इकडे अशी ठेवून स्वतःची करमणूक करून घेत आणि शरीराला हालचाल देत. परंतु तुरुंगावरील नादीरखानांना ही गोष्ट सहन न होऊन ताबडतोब सर्व कॉट्स आणि टेबल-खुर्च्या लोखंडी पट्ट्यांनीं जमिनीला भक्कम खिळून टाकण्यांत आल्या. रशियांत थंडी भयंकर असते, इतकी कीं, नदींतील पाणी गोठून जातें. अशा वेळीं तुरुंगांतील कोठड्या थंडगार पडून कैदी गारठून जात. त्यांनीं गडबड करून शेक द्या म्हणून मागणी केली कीं, अधिकारी शेक देत. परंतु त्याची योजना अशी असे कीं, शेकलेली हवा कोठडीच्या वरच्या बाजूनें येई व विज्ञानशास्त्राचे नियमानें ती खालीं न येतां वरचेवर जाई आणि खालची हवा थंड राही. या उप्पर कैद्यानें गडबड केली कीं त्याचे कपडे आणि पांघरूण हिसकावून घेऊन त्याला गार लोखंडी खाटेवर निजवीत. असा अनुभव घेतलेल्या एका कैद्यानें क्रांतीनंतर या तुरुंगाला आणि आपल्या कोठडीला मुद्दाम भेट देऊन वरील युक्तीचा शोध लावला. या तुरुं-

गांत स्त्रिया आणि पुरुष अशा सर्व कैद्यांना ठेवीत असत. राजकीय कैदी म्हणून ठेवलेल्या २७ वर्षांच्या एका तरुणीनें कंटाळून जाऊन दिव्यांतील तेल कपडयावर ओतून घेतलें आणि काडी लावून स्वतःची मुक्तता करून घेतली. आत्महत्येचा हा मार्ग इतर कैद्यांना मिळूं नये म्हणून अधिकाऱ्यांनीं ताबडतोब तेलाचे दिवे रद्द करून विजेचे दिवे सुरू केले. एकांतवासाला कंटाळलेले कैदी एकमेकांशीं भितींवर टिचक्या मारून बोलण्याचा प्रयत्न करीत. त्यांची ठराविक सांकेतिक लिपी आतां प्रसिद्ध झाली आहे, ती पुढील कोष्टकावरून समजेल. पहिली टिचकी उभ्या रकान्याची व दुसरी टिचकी आडव्या रकान्याची अशा रीतीनें हें तारायंत्र चालत असे.

| | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | A | B | C | D | E | F |
| २ | G | H | I | J | K | L |
| ३ | M | N | O | P | Q | R |
| ४ | S | T | U | V | W | X |

कल्पक मानवी बुद्धि जुलमी बंधनावरही कडी करूं शकते याचें एक मनोरंजक परंतु हृदयस्पर्शी उदाहरण या तुरुंगांत घडलें. एका राजकीय कैद्याची पत्नी त्याला तुरुंगांत भेटण्यास नियमित वेळीं येत असे आणि अधिकाऱ्याच्या समक्ष भेटून परत जात असे. अधिकाऱ्यादेखत पत्रें देण्याघेण्याची सोय नसे, परंतु पत्रव्यवहाराचें काम मात्र या जोडप्यानें बेमालूम चालविलें होतें. पातळ कागदावर पत्र लिहून त्याची घडी करून पतिपत्नी आपापल्या गालांत ठेवीत आणि अधिकाऱ्यादेखत परस्परांचा मुका घेत असतां मोठ्या शिताफीनें एका मुखांतून दुसऱ्या मुखांत पत्राचें संक्रमण करीत. परंतु एके दिवशीं बिचारी पत्नी मुका घेण्यांत चुकली आणि कैद्याच्या

तोंडांतून पत्र खालीं पडलें. तें अधिकाऱ्यांनीं पाहिलें. कादंबरीपेक्षां सत्यांत नवलाई अधिक आहे, ही म्हण खोटी नाहीं. या प्रकारानंतर तुरुंगांत सहा फूट अंतरावर दोन पिंजरे ठेवण्यांत आले आणि त्यांतून पतिपत्नींना बोलण्याची परवानगी देण्यांत येऊं लागली. हालअपेष्टेच्या गोष्टी वाचतांना रम्य वाटतात, परंतु त्या ज्यांनीं भोगल्या किंवा भोगीत आहेत त्या पुण्यपुरुषांचें स्मरण झालें म्हणजे अंगावर रोमांच उभे राहतात.

क्रांतीचा इतिहास

मास्कोमध्यें म्यूझियम ऑफ दि रेव्होल्यूशन नांवाचें ऐतिहासिक प्रदर्शन आहे. या प्रदर्शनांत दिवसभर शाळेंतील लहान विद्यार्थ्यांपासून प्रौढ आणि वृद्धापर्यंत स्त्री-पुरुष येऊन तेथील देखावे पाहून जात असतात. गेल्या तीन शतकांत क्रांतीचे कसकसे प्रयत्न आणि स्थित्यंतरें झालीं यांचे देखावे येथें दाखविले आहेत. एकोणिसाव्या शतकापूर्वीं रशियांत सर्फडम म्हणजे गुलामगिरीची पद्धत असे. शेंकडा ९६ लोक गुलाम असत व शेंकडा ४ लोकांची त्यांच्यावर सत्ता असून ते जमिनीचे मालक असत. लोक फक्त भाकरीचे तुकड्यावारी शेतावर राबत. जमीनदारांची गुलामांवर पूर्ण सत्ता असून त्यांची खरेदीविक्री करण्याचा त्यांना अधिकार असे. एकोणिसाव्या शतकांत यांत्रिक उद्योग वाढल्यामुळें हे गुलाम गिरण्यांत काम करण्यास मिळाले तर अधिक चांगलें असें वाटल्यामुळें १८६१ सालीं गुलामगिरीची पद्धत बंद करण्यांत आली; परंतु जे हाल शेतावर होत तेच गिरणींत होऊं लागले. स्थलांतर झालें, स्थित्यंतर झालें नाहीं. या गुलामगिरीविरुद्ध चळवळ करणारांची कशी स्थिति होत असे तें पूर्वींच्या चित्रांवरून दिसतें. कैद्याला जमिनीवर निजवून त्याच्या उरावर धोंडा ठेवीत; नंतर क्रमाक्रमानें

त्याचे पाय, नंतर हात तोडून शेवटीं कुऱ्हाडीनें डोकें छाटीत! दुसऱ्या एका राजकीय कैद्याला ३×५ फूट लोखंडी पिंजऱ्यांत घालून मास्कोमध्यें आणण्यांत आलें आणि माकडाप्रमाणें त्याची शहरभर मिरवणूक काढून शेवटीं बाजारपेठेंत ठेवण्यांत आलें. या प्रसंगाचें एक जुनें चित्र प्रदर्शनांत ठेविलें आहे.

प्रारंभींचे क्रांतिकारक सुशिक्षित वर्गांतील युनिव्हर्सिटीचे पदवीधर वगैरे असत, आणि ते आपली चळवळ शांततेचे मार्गानें चालवीत. यानंतर वैयक्तिक अत्याचारानें क्रांति करूं पाहणाऱ्या तरुणांचा वर्ग निर्माण झाला. परंतु हे सर्व मार्ग विफळ ठरून सर्वसामान्य जनतेचें शिक्षण केल्याशिवाय मूठभर लोकांकडून क्रांति होऊं शकणार नाहीं असें तत्त्व प्रतिपादन करणारे आणि त्याप्रमाणें संघटना करणारे लेनिन, स्टॅलीनप्रभृति पुढारी पुढें आले. शेवटची क्रांति यशस्वी होईपर्यंत ही चळवळ जुलमी मार्गानें दडपून टाकण्यांत येत असे. कोणत्याही चळवळीला यश मिळेपर्यंत अपयशच येत राहणार.

चळवळ दडपण्याचे झारशाहीचे मार्ग सार्वत्रिक जुलूमशाहीच्या गोत्रांतीलच होते. लेनिनग्राड—(पूर्वीची राजधानी पेट्रोग्राड) मध्यें उरीटस्की चौक नांवाचा प्रचंड चौक राजवाडयासमोर आहे. पन्नास हजार लोक येथें सहज मावतील. सरदार—जमीनदारांच्या जुलमास कंटाळलेल्या लोकांना वाटलें कीं, त्याची दाद राजाकडे—झारकडे—मागावी म्हणजे तो आपलें गाऱ्हाणें दूर करील. म्हणून शेतकरी—कामकरी वर्गाचे हजारो लोक वरील चौकांत जमले आणि राजाकडे दाद मागूं लागले. झारनें राजवाडा सोडून दुसऱ्या राजवाडयांत पलायन केलें आणि या चौकाभोंवतीं शिपायांच्या पलटणींचा घेर करून लोकांवर गोळ्या घातल्या आणि हजारो निरपराधी निःशस्त्र माणसांची कत्तल केली. लोकांचे डोळे उघडले कीं राजा

आपलें गाऱ्हाणें दूर करूं शकत नाहीं. प्रत्येक राष्ट्राचे इतिहासांत वरील प्रकाराची आवृत्ति झालेली आहे.

आमच्या बरोबर असलेल्या रशियन वाटाड्यानें सांगितलें, " आमचे झार बादशहा फार लोकप्रिय असत. आमचें त्यांच्यावर फार प्रेम असे म्हणून त्यांच्यांतील शेंकडा नव्वद आम्हीं स्वर्गाला पाठविले. "

सोव्हिएट सरकार धर्मावर तिलांजली घेऊन उठलें आहे. या गोष्टीचा प्रथम तिरस्कार वाटतो. परंतु रशियांतील ख्रिस्ती धर्माचा इतिहास पाहिला म्हणजे या धोरणाचें कारण समजतें. जनतेच्या स्वातंत्र्याच्या न्याय्य चळवळीला धर्मसंस्थेनें कधींच उचलून धरलें नाहीं, उलट ती दडपून टाकण्याला जुलमी झार राजांना मदत केली. लोकांचें लक्ष राजकारणांतून दुसरीकडे गुंतविण्यास धर्म हें चांगलें साधन आहे असें ओळखून झारनीं त्याचा उपयोग करून घेतला. त्यांनीं एकसारखीं देवळें बांधण्यास सुरुवात केली. या देवळांची (चर्च) फुगती संख्या पुढील आंकड्यांवरून दिसेल. १८८६ सालीं १४८८५ चर्चेस् होतीं तीं १९१४ सालीं २३५९३ झालीं. धर्मसत्ता राजसत्तेला सामील झाली. झार हे देवाचे अवतार आहेत असें भाबड्या जनतेला भासविण्याकरितां त्यांनीं देवादिकांच्या मूर्ति करून त्यांच्यावर झारचे मुखवटे चढविले. मानवी न्याय आणि जनतेचें कल्याण यांपासून पराङमुख झालेल्या धर्माला नवीन सोव्हिएट सत्तेकडून आधार मिळणें शक्य नव्हतें. ख्रिस्ती धर्म हाणून पाड-ण्याचा आणि नवीन पिढीला धर्माचें वारें लागूं न देण्याचा नवीन सरकारनें आटोकाट प्रयत्न केला आहे. या धोरणाचें एक साधन म्हणून प्रत्येक शहरीं Anti-religious Museums विधर्म प्रदर्शनें

धर्माविरुद्ध मोहीम कां ?

स्थापन केलेलीं आहेत. ख्रिस्ती धर्मोपाध्यायाचा आणि चर्चचा अध:पात कसा झाला हें या प्रदर्शनांतून दाखविलें आहे. लोकसेवा आणि परमात्मचिंतन हें ध्येय नष्ट होऊन देवळांतून सोन्याचांदीचे ढीग सांचू लागले, आणि हें सांचलेलें भांडवल अधिक वाढतें करण्या-करतां देवळांतील बडव्यांनीं व्यावहारिक उद्योगधंदे आरंभिले. सत्याकरितां स्थापन झालेला धर्म सत्याला विरोध करूं लागला. ' पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते ' असें तत्त्व गॅलिलिओनें शोधून काढलें, परंतु सांप्रदायिक ख्रिस्ती तत्त्वाप्रमाणें पृथ्वी सुवर्ण—शृंखलांनीं देवाचे पायास बांधली असून ती स्थिर आहे अशी समजूत आहे. गॅलिलिओचा कॅथॉलिक ख्रिस्ती धर्मोपदेशकांशीं शास्त्रीय विरोध आल्यामुळें त्यांनी त्याला लांकडाच्या राशीवर खांबाशीं बांधून जिवंत जाळलें. स्पेनमध्यें अशाच कारणाकरितां जॉर्ज ब्रूनो यास जाळण्यांत आलें. या प्रसंगांचीं चित्रें या प्रदर्शनांत दाखविलीं आहेत. राज्यक्रांतीनंतर या सर्व देवळांतील संपत्ति सरकारनें जमा करून तिचा विनियोग देशाचे उद्योगधंदे वाढविण्याकडे केला आणि चर्चच्या मोठमोठया इमारतींचा उपयोग प्रदर्शनें आणि शैक्षणिक संस्था यांचेकरितां केला. यापुढेंही एक पाऊल जाऊन रशियन लोकांनीं धर्माच्या ऐवजीं "निरीश्वर" पंथ काढला आहे. या पंथाची प्रगति पुढील आंकडयांवरून दिसेल.

१९२९— ४,००,००० सभासद

१९३३— ७०,००,००० सभासद

नास्तिक पंथाची ही मोहीम रशियानें इतक्या कळकळीनें चालविली आहे कीं, दर पंचवार्षिक योजनेंत किती लोक नास्तिक बनवावयाचे याचें "बजेट" (अंदाजपत्रक) केलेलें असतें.

वरील प्रदर्शन पाहून ख्रिस्ती आणि हिंदू धर्माविषयीं व

त्यांच्या भवितव्याविषयीं विचार मनांत येऊं लागतात. रशियांतील हीं प्रदर्शनें धर्माविरुद्ध आहेत असें म्हणण्यापेक्षां तीं अधर्माविरुद्ध आहेत असें म्हणणें अधिक यथार्थ होईल. कारण, ख्रिस्ती धर्मानें आजपर्यंत केलेल्या आणि येथें दाखविलेल्या गोष्टी धर्माप्रमाणें झाल्या नसून धर्माचे विरुद्ध झाल्या आहेत. धर्माचें विकासी आणि प्रवाही स्वरूप नष्ट होऊन त्याला स्थिरतेचें रूप आलें म्हणजे तो कुजूं लागतो. त्याच्याभोंवतीं सोनेंचांदी, अधिकार, स्वार्थ आणि राजसत्ता यांच्या उपाधी गोळा होतात. वेदोपनिषत् कालीं आध्यात्मिक धीटपणानें चार्वाकवादापासून ' अहं ब्रह्मास्मि ' तत्त्वापर्यंत विचार करण्याचें स्वातंत्र्य जोंपर्यंत हिंदूधर्मांत होतें तोंपर्यंत त्याचें स्वरूप विकासी आणि उत्क्रांतक्षम होतें. परंतु वेदांततत्त्वाला पोंचल्यानंतर अध्यात्मतत्त्वाचा शोध लागला अशी आमची भावना होऊन अध्यात्मविकास थांबला आणि उत्क्रांतिविन्मुख धर्माला सुरुवात झाली. सत्याचा शोध लागल्यानंतर अधिक सत्यशोध करण्यापेक्षां उपलब्ध सत्याचें संरक्षण, प्रसार आणि स्थिरीकरण करण्यांत आमचा वेळ गेला. अध्यात्मविचाराचा ताजेपणा नाहींसा होऊन त्याला सांचलेल्या तलावाचें स्वरूप आलें. पूर्व ऋषींनीं सत्य शोधून ठेवल्यामुळें त्यांच्या वंशजांना अधिक शोध करण्याची जरूरी वाटली नाहीं. धर्माचें हें स्थिर स्वरूप नष्ट होऊन त्याला अध्यात्माचें विकासी स्वरूप प्राप्त होईल तेव्हां त्याला पुनः ताजेपणा येईल, नाहीं पेक्षां पूर्वसंशोधित अध्यात्मतत्त्वावर सत्ता, स्वार्थ, सुवर्ण यांच्या उपाधी गोळा होऊन त्याला सांप्रदायिक संस्थेचें स्वरूप प्राप्त होईल. तसें झाल्यास रशियांतील अनीश्वर आणि नास्तिक वादाला हिंदुस्थाननें आपण होऊन निमंत्रण दिल्यासारखें होईल.

हिंदुस्थानांत निरीश्वरवाद येईल काय ?

स्वार्थामुळें प्रस्थापित सत्ता किती मूर्ख बनते आणि क्रांतीला कारणीभूत होते तें पाहिलें म्हणजे तिची कीव येते. काळाला, परिस्थितीला आणि विकासी तत्त्वज्ञानाला अनुसरून वागणाऱ्या समाजांत उत्क्रांति होते. एतद्विरुद्ध समाजांत क्रांति होते.

---

प्रकरण बारावें

## सोव्हिएट : प्रचंड पुनर्घटना

योजनापद्धतीचे तत्त्वाचा स्वीकार

जगांत आजपर्यंत झालेली मानवी प्रगति यदृच्छेनें होत आलेली आहे. जरूर तेवढ्याच सामाजिक जीवनावर प्रस्थापित सत्तेनें आपला अंमल चालवून सत्ता स्थिर ठेवण्याची काळजी घ्यावयाची, आणि समाजाच्या स्वाभाविकपणें होणाऱ्या विकासाला जातां जातां हातभार लावावयाचा असा आजपर्यंतचा चालत आलेला राजकीय शिरस्ता आहे. व्यक्तिस्वातंत्र्य, लोकशाही इत्यादि नवीन तत्त्वांनीं वरील परंपरेला पुष्टीच दिली.

हा यदृच्छा पक्ष सोडून बुद्धिपुरःसर मोठ्या प्रमाणावर योजनापक्षाचा स्वीकार करणारा पहिला देश रशिया आहे. सामाजिक प्रगतीची निश्चित रूपरेषा आणि योजना आंखून इष्ट आणि पूर्वयोजित ध्येयाप्रमाणें तिला वळण लावण्याचें तत्त्व प्रथम या देशानें अंमलांत आणिलें. यदृच्छामार्गानें होणाऱ्या समाजवाढीला अर्थातच फार वेळ लागतो आणि ही प्रगति फार अनिश्चितपणें होते. या स्वाभाविक विकासाची वाट पाहण्याइतकी सवड रशियाला नाहीं. म्हणून आर्थिक, शैक्षणिक, औद्योगिक, सांस्कृतिक आणि राजकीय प्रगतीच्या पंचवार्षिक योजना वारंवार आंखून त्या पूर्ण करण्याचा आटोकाट प्रयत्न करावयाचा असें धोरण

पुढाऱ्यांनीं स्वीकारलें. निश्चित आणि तात्काळ साध्य करण्याचें ध्येय, सत्तेचें पाठबळ आणि आपलेपणाच्या भावनेनें काम करणाऱ्या समाजाचा उत्साह यांचे जोरावर रशियानें गेल्या दहा वर्षांत जितकी प्रगति केली तितकी कोणत्याही राष्ट्रानें केली नाहीं. या विधानांत काडीचीही अतिशयोक्ति नाहीं.

सोव्हिएट सरकारच्यापुढें आज प्रचंड कार्य आहे. आजपर्यंत अज्ञानांत, दारिद्र्यांत आणि असंस्कृत स्थितींत ठेविलेल्या समाजाला सज्ञान करून भौतिक संपन्नतेची स्थिति प्राप्त करून देणें, आणि पाश्चात्य राष्ट्रांनीं आजतागायत केलेली सुधारणा थोडक्या काळांत रशियांत प्रचलित करणें हा या कार्यक्रमाचा मुख्य भाग आहे.

कामकरी वर्गाची आणि बहुजन समाजाची राहण्याची सोय स्वच्छ, आरोग्यानुकूल आणि पुरेशा जागेंत करणें हा सरकारपुढील पहिला प्रश्न आहे. सध्यां रशियन शहरांतून राहण्याच्या जागेची अत्यंत टंचाई आहे. जुन्या इमारती वाढवून मोठ्या करणें आणि आधुनिक पद्धतीच्या सोयीस्कर अशा नवीन इमारती बांधणें अशा दोन्ही मार्गांनीं हें काम सध्यां चाललें आहे. झारशाहीच्या अमदानींत कामकरी लोक कशा प्रकारच्या खोपटांतून राहात असत तें अद्यापि पाहावयास सांपडतें. चारी बाजूला लाकडाच्या फळ्या ठोकून कशा तरी रीतीनें निवाऱ्याची जागा करण्याकरितां या चाळी बांधलेल्या असत. नवीन इमारती झालेल्या नसल्यानें अद्यापही अशा झोंपड्यांतून कांहीं कामकरी राहतात. परंतु, पुढील दोन तीन पंचवार्षिक योजना पूर्ण झाल्यावर ही स्थिति पालटून जाऊन सर्व लोकांना राहण्याकरितां चांगल्या जागा मिळतील असें दिसतें. प्रथम प्रथम बांधलेल्या नवीन इमारती औद्योगिक आणि इतर क्षेत्रांत महत्त्वाचें काम करणाऱ्या

लोक राहतात कसे ?

लोकांना आणि यांत्रिक कलेचें व इतर उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना राहावयास दिलेल्या आहेत. कारण, यांचे जीवांवर भावी प्रगति आणि प्रस्थापित सत्तेची शाश्वती अवलंबून आहे. मास्कोमध्यें " वर्क्स सेटलमेंट " नांवाची नवीन वसाहत झालेली आहे. यांतील एका इमारतींत विद्यार्थ्यांची राहण्याची सोय केलेली आहे. ३३ ते ४० वयाच्या कामगारांना शिष्यवृत्त्या देऊन युनिव्हर्सिटींत दाखल केलें आहे. या वसतिगृहांत विवाहित विद्यार्थ्यांचीही राहण्याची सोय आहे. इमारत प्रशस्त असून खोल्या आंतून स्वच्छ आणि सोईस्कर आहेत. प्रत्येकाचे खोलींत स्वाभाविक असणाऱ्या वस्तू म्हणजे एक लेनिनचा अर्धपुतळा, रेडिओ, स्वच्छ अंथरुणाची कॉट आणि टेबल या होत. या वसाहतींत सर्व सोयी आहेत. तिला जोडून एक मोठा दवाखाना आहे. अशा प्रकारच्या सर्व सोयीपूर्ण वसाहती ठिकठिकाणीं आणि शहरोशहरीं बांधावयाचें काम चालू आहे.

रशियांत खोलीभाडें जागेच्या लांबीरुंदीवर आणि भाडेकऱ्याला मिळणाऱ्या पगारावर अवलंबून असतें. कमी पगाराच्या माणसाला एखादी खोली ज्या भाडयानें मिळते त्यापेक्षां अधिक भाडें बडया पगाराच्या भाडेकऱ्याला द्यावें लागतें. राहण्याच्या जागेप्रमाणेंच शाळा, दवाखाने इत्यादि इमारती बांधण्याचीं कामें चालू आहेत.

आरोग्य आणि वैद्यक यांचे दृष्टीनें बरीच प्रगति झाली आहे. मास्को शहरांतील निरनिराळ्या भागांत दहा मोठीं हॉस्पिटल्स् आहेत. प्रत्येक हॉस्पिटलचा उपयोग त्या वस्तींतील ५०००० लोकांना होतो. या दवाखान्यांतील सामग्री आजतागायतची आधुनिक प्रकारची आहे. एक्स रेज, हायड्रोथेरपी, इ. खर्चाचे उपचार

आरोग्याच्या सार्वत्रिक सोयी

प्रत्येक व्यक्तीचे आटोक्यांत आले आहेत. प्रत्येक कुटुंबाला घराजवळ राहणारा टराविक डॉक्टर असतो. या कुटुंबानें डॉक्टरला टेलिफोन करून केव्हांही बोलवावें.

मुलें आजारी पडलीं म्हणजेच आयांनीं दवाखान्यांत यावें हा शिरस्ता येथें नाहीं. प्रसूतिपूर्वीं आणि नंतर वारंवार मुलाला दाखवून त्याच्या दिनचर्येविषयीं सल्ला विचारण्याकरितां आलेल्या आयांची दवाखान्यांत गर्दी असते. शाळेंतील मुलांकरितां एक स्वतंत्र खातें असून तेथें मुलांची पूर्ण शारीरिक परीक्षा होऊन तो पुढें कोणत्या उद्योगधंद्याला लायक आहे हें दवाखान्यामार्फत शिक्षकाला आणि पालकांना कळविलें जातें. विशेष गोष्ट म्हणजे दवाखान्यावरील डॉक्टर इ. अधिकारी वर्गांत शेंकडा सत्तर प्रमाण स्त्रीकामकऱ्यांचें आहे.

रशियन क्रांतीपूर्वीं देशांत कांहीं उद्योगधंदे होते, परंतु ते अत्यंत मागासलेले असत. युरोपियन राष्ट्रांनीं आपणाला नको असलेली जुनी झालेली यंत्रसामग्री रशियावर लादा॰ आणि रशियन भांडवलवाल्यांनीं बारा बारा ता मजुरांना राबवून त्या यंत्रसामग्रींतून निघेल त॰ माल तयार करावा अशी स्थिति असे. सोळा कोटी लोकांना पुरेसें अन्नवस्त्र, कपडा आणि जीवनोपयोगी वस्तू स्वतःच्या श्रमावर कशा निर्माण कराव्यात, हा विद्यमान सरकारपुढें प्रश्न असल्यामुळें आपल्या कार्यक्रमांत त्यांनीं औद्योगिक प्रगतीवरच विशेष भर दिला आहे. रशियांत जाऊन आलेल्या पौर्वात्य प्रवाशाला रशियाचें हें औद्योगिक वेड आवडत नाहीं, परंतु आज दारिद्र्याचे हाल भोगीत असलेली रशियन प्रजा पाहिली म्हणजे सोव्हिएट सरकारचा औद्योगिक 'टेंपो' वर इतका भर कां आहे तें चटकन् लक्षांत येतें. लोकांना पोटभर खायला, अंगभर पांघरायला आणि उबदार घर राहायला असल्या-

प्रचंड कारखान्यांची उभारणी

शिवाय संस्कृति, सुधारणा, प्रगति इत्यादि वेदांताच्या गप्पा मारणें व्यर्थ आहे, ही गोष्ट पुढाऱ्यांनीं ओळखली आहे. रशियन वर्तमानपत्रांतील बातम्या पाहिल्या म्हणजे मुख्य भर दोन गोष्टींवर आढळतो. एक औद्योगिक प्रगतीचा आढावा आणि दुसरी राजकीय परिस्थिति. औद्योगिक क्षेत्रांत पूर्ण स्वावलंबी होण्याचा रशियानें निश्चय केला आणि त्या धोरणानें आपली पंचवार्षिक योजना आंखली. लहानसहान वस्तु निर्माण करण्याचीं यंत्रें परदेशांतून मागविण्यापेक्षां हीं यंत्रेंच तयार करण्याचे कारखाने आपल्या देशांत निर्माण झाले पाहिजेत म्हणजे औद्योगिक परावलंबन नाहींसें होईल असें दूरदर्शी धोरण पुढाऱ्यांनीं आंखलें. पहिल्या पांच वर्षांत त्यांनीं यंत्रोत्पादक उद्योगधंदे स्थापन करण्याचा कार्यक्रम योजिला आणि पार पाडला, त्यामुळें आज रशियांत प्रचंड कारखाने स्थापन झाले आहेत. अन्न पाहिलें कीं क्षुधिताला हांव सुटते तसें या देशाचें झालें आहे. औद्योगिक क्षेत्रांत इंग्लंड आणि जर्मनी मागें पडले आहेत हें रशियन लोक धरून चालतात. उरली अमेरिका. रशियन इंजिनियरांची महत्त्वाकांक्षा अशी आहे कीं, प्रत्येक क्षेत्रांत आपले कारखाने अमेरिकेपेक्षां मोठे झाले पाहिजेत. त्यामुळें हे लोक प्रेक्षकांशीं बोलतांना नेहमीं "अमेरिकेपेक्षां मोठे" या वाक्याचा उपयोग करीत असतात.

यंत्रोत्पादक मोठी यंत्रसामग्री उभारल्यामुळें आतां लहानसहान यंत्रें रशियांतच होऊं लागतील आणि या पंचवार्षिक योजनेप्रमाणें लहानसहान उद्योगधंद्यांना चालना मिळेल. गेल्या दहा वर्षांपूर्वीं औद्योगिक दृष्टया मागासलेल्या या देशांत आतां स्वतःच्या मोटारगाड्या, रेल्वेज, रबरटायर्स, विजेचे ग्लोब, रेडिओ, दवाखान्याचीं व शास्त्रीय उपकरणें तयार होऊं लागलीं आहेत. अनेक प्रयोगशाळा पाहून त्यांच्या चालकांना मी विचारलें, 'यांतील किती सामग्री परदेशी

आहे?', बहुतेकांनीं उत्तर दिलें, 'शेंकडा एक.'

रशियाचा हा औद्योगिक 'टेंपो' प्रचंड आहे आणि तो अपरिहार्य आहे. आज येथील सर्व कारखाने २४ तास चालू आहेत.

मग दारिद्र्य कां दिसतें ?

प्रश्न असा उभा राहातो कीं, इतकी औद्योगिक प्रगति असतां देशांत इतकें दारिद्र्य कां? रशियानें आपली पंचवार्षिक योजना आखली, त्या वेळीं त्याचा विचार असा कीं, पाश्चात्य राष्ट्रांपासून यंत्रसामग्री घेऊन त्याचे मोबदला त्यांना रशियांतील मँगॅनीज इत्यादि खनिज वस्तू विकाव्यात. परंतु १९२८ पासून चालू झालेल्या डिप्रेशनचा (मंदी) त्यांना आधीं अंदाज लागला नाहीं. या मंदीमुळें रशियाच्या खनिज संपत्तीला मागणी राहिली नाहीं आणि स्वतःची पत कायम राखण्याकरितां वायदे पुरे करणें तर जरूर. अशा परिस्थितींत खनिज वस्तूंचे ऐवजीं जीवनाच्या आवश्यक वस्तू म्हणजे गहूं, लोणी, मासे, फळें, मांस इ० वस्तू परदेशीं विकून कर्जफेड करणें हा एकच मार्ग रशियास उरला आणि तो त्यानें पत्करला. त्यामुळें देशांत उत्तम अन्न निर्माण होत असलें तरी लोकांना तें खावयास मिळत नाहीं.

पोटाला चिमटा घेऊन त्यांना काम करावें लागत आहे. त्यामुळें रशियाच्या दारिद्र्याचें चित्र पाश्चात्य देशांतील संपन्नतेच्या दृष्टीनें अधिक भेसूर दिसतें. औद्योगिक प्रगतीचा हा टेंपो (वेग) कमी केल्यास लोकांचे हाल न होतां प्रगति सावकाश होईल. परंतु भौतिक सामर्थ्याच्या दृष्टीनें पाश्चात्य राष्ट्रांचे तोडीला लौकर येऊन बसावें ही महत्त्वाकांक्षा आणि थोडे तात्पुरते हाल सोसल्यास लौकरच मालाची उत्पत्ति व्हावयास लागून सर्वांना भरपूर वस्त्रप्रावरण मिळेल ही आशा मनांत असल्याकारणानें राष्ट्राचें हें धोरण जाण-

णाऱ्या जनतेला आपले कष्ट सोसण्यास धैर्य आलें आहे.

सोव्हिएट सरकारच्या कार्यक्रमाचा विशेष हा आहे की त्यांत भौतिक, औद्योगिक आणि राजकीय प्रगतीबरोबर समाजाच्या सांस्कृतिक प्रगतीवरही भर दिलेला आहे.

**संस्कृति प्रसाराचे उपक्रम**

क्रांतिपूर्व रशियांत शेंकडा ८० लोक निरक्षर होते. गेल्या पंधरा वर्षांतील प्रयत्नांमुळें हा निरक्षरतेचा आंकडा शेंकडा २० वर आला आहे. यांतील बहुतेक म्हातारे लोक असून त्यांनाही शाळेंत जावें लागतें. रशियांत शेंकडा ५० लोक कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारच्या शाळेंत जात असतात. सोव्हिएट सरकारची लोकशिक्षणाची व्याख्या निव्वळ साक्षरतेपेक्षां अधिक व्यापक आहे. साहित्य, संगीत, आणि कला यांची आवड उत्पन्न व्हावी याकरितां सरकारी रीत्या अनेक प्रयत्न चालले आहेत. त्यांतील एक महत्त्वाचा मार्ग म्हणजे संस्कृतिमंदिरांची ( Palace of Culture) स्थापना होय. या संस्थेची कल्पना अत्यंत मनोवेधक आहे. सायंकाळचे वेळीं कामगार लोकांनीं या ठिकाणीं मनोरंजनाकरितां आणि शिक्षणाकरितां जावें. तेथें वाचनास ग्रंथसंग्रह, वादविवादाच्या सभा, व्यायामाकरितां सर्व प्रकारचें साहित्य, सिनेमा थिएटर्स, नाटयगृहें इ. हरएक प्रकारच्या संस्कृतिवर्धनपर संस्था एका इमारतींत असतात. लहान मुलांच्या सांभाळण्यामुळें आयांचें हें संस्कृतिशिक्षण चुकूं नये याकरितां विशेष सोय असते. प्रत्येक संस्कृतिमंदिरांत एक ( किंडर गार्टन ) बालोद्यानाचा वर्ग तज्ञ शिक्षकिणींचे हाताखालीं असतो. तेथें लहान मुलांना २।३ तास ठेवावें आणि स्वतः शिक्षणास अथवा करमणुकीस जावें अशी संधि मातांचेकरितां असते. सोव्हिएट सरकारच्या शिक्षणविषयक कार्यक्रमाचें विवेचन करावयाचें झाल्यास निराळा ग्रंथ लिहावा लागेल, इतका तो कार्यक्रम व्यापक आहे.

शिक्षणाचा इतका विशाल पाया आजपर्यंत कोणत्याही समाजानें घातला नाहीं.

उपरिनिर्दिष्ट सर्व विधायक कार्यें करीत असतां सोव्हिएट सरकारला आपलें सत्तात्मक अस्तित्व कायम ठेवण्याचे दृष्टीनें सतत

राज्यसंस्थेचें संरक्षण

काळजी घ्यावी लागते. क्रांति झाल्यापासून आजपर्यन्त सामर्थ्याच्या जोरावर सरकारनें सर्व सत्ता आपले हातीं ठेविली आहे. परन्तु त्यांचे ठिकाणीं ही जाणीव आहे कीं, ही राज्यपद्धति कायम राहावयाची असेल तर क्रांतीच्या मुळाशीं असलेल्या तत्त्वांचें शिक्षण जनतेला दिलें पाहिजे. लहानापासून थोरापर्यंत, अशिक्षितापासून सुशिक्षितापर्यंत, सर्वांना हें राजकीय शिक्षण सरकारच्या हातांत असलेल्या सर्व प्रकारच्या साधनांनीं दिलें जातें. शिक्षण संस्था, रेडिओ, वर्तमानपत्रें इत्यादि संस्था आपलें कार्य करून शिवाय राजकीय तत्त्वप्रसाराचें कार्य सरकारी नियंत्रणाखालीं करीत असतात. अर्थात् सत्तासंरक्षणाचीं इतर बरींवाईट राजमान्य साधनें इतर देशांप्रमाणें या देशांतही सढळ हातानें उपयोगांत आणलीं जातात!

सारांश, रशियांत कोठेंहि गेलों तरी वरवर दिसणाऱ्या व्यवहार–विविधतेच्या मुळाशीं कांहीं सामान्य तत्त्वें आहेत. जनतेच्या भौतिक जीवनाची सुधारणा करण्याकरितां औद्योगिक संघटना करणें, भौतिक प्रगतीबरोबर संस्कृति–विकासाची सोय करणें, आणि या सर्व गोष्टी जिच्या आधारावर शक्य आहेत ती सत्ता दृढ करणें या आद्य तत्त्वांवर सोव्हिएट सरकारचा सर्व कार्यक्रम रचलेला आहे.

---

प्रकरण तेरावें

## समाज आणि संस्था यांचा प्रत्यक्ष परिचय

बायकांचें बंड

" बायकांचें बंड " आणि " स्त्रीसाम्राज्य " नाटकें पाहणाऱ्या प्रेक्षकाला रंगभूमीवरील दृश्यें प्रत्यक्ष समाजांत पाहावयास सांपडतील असें स्वप्नांतही वाटलें नसेल. कवींच्या कल्पनासृष्टींतील हीं चित्रें आज एका देशांत दिसूं लागलीं आहेत ही गोष्ट खरी. रशियांत स्त्रियांच्या सांप्रदायिक जीवनांत क्रांति झाली आहे आणि हें बायकांचें बंड बायकांनीं केलें नसून पुरुषांनीं केलें आहे ! आजपर्यंत जगांत ज्या क्रांत्या झाल्या त्या राजकीय स्वरूपाच्या आणि तात्कालिक सत्तासंक्रमणानंतर पूर्ण होणाऱ्या अशा होत्या. रशियांत झालेली क्रांति केवळ राजकीय नसून सामाजिक आणि सांस्कृतिक आहे, आणि ती पुरी झाली नसून तिला नुकतीच सुरुवात झाली आहे. त्यामुळें रशियांत फिरणाऱ्या प्रेक्षकाला नेहेमीं दिसणाऱ्या समाजापेक्षां विशिष्ट गुणांनीं युक्त असा निराळा समाज डोळ्यांपुढें दिसतो.

पुरुषांच्या कार्यक्षेत्रांत पाऊल

मी आजपर्यंत फ्रेंच, ब्रिटिश, अमेरिकन, इटालियन आणि रशियन बोटींनीं प्रवास केला. परंतु रशियन बोटीवर जें दृश्य दिसलें तें इतर बोटींवर दिसलें नाहीं. बोट लंडन बंदरांतून नुकतीच सुटली होती आणि नेहेमीं-प्रमाणें खलाशी डेकवर दोऱ्या ओढीत होते. त्याच सुमारास २५ वर्षांची एक रशियन स्त्री डेकवर दोरी ओढून बोटीवरील रेडियोच्या तारा ताणीत होती. या बाईच्या ताब्यांत रेडियोचें खातें दिलेलें होतें आणि ती नाजूक यंत्रापाशीं काम करण्यापासून तों दोऱ्या ओढण्यापर्यंत सर्व प्रकारचीं

कामें करीत होती. लेनिनग्राडमध्यें आमची मोटार गांवांत फिरत असतां नाक्यावर पोलिसनें पासाकरितां अडविली. पितळी बटणाचा मोठा डगला घालून एक बाई येथें पोलिसचें काम करीत होती. मास्कोला जाण्याकरितां आम्ही रेल्वेचे डब्यांत बसलों; काळा युनिफॉर्म घालून हातांत हिरवा तांबडा कंदिल घेतलेल्या व्यक्तीनें सिग्नल दाखवितांच गाडी सुरू झाली. पुरुषी कोट अंगावर चढविलेल्या या व्यक्तीचे पायाकडे पाहतां, तिनें बायकी परकर घातलेला दिसला. सारांश, स्त्रीशिक्षणाचे दृष्टीनें पुढारलेल्या देशांतही स्त्रियांनीं अद्याप ज्या भूमिका घेतल्या नाहींत, त्या अवघ्या १५ वर्षांत रशियन स्त्रियांनीं स्वीकारल्या आहेत. व्यावहारिक जगांतील अमुक क्षेत्र पुरुषांचें आणि अमुक क्षेत्र स्त्रियांचें असें राहिलें नाहीं. लोहाराच्या भट्टीपाशीं उभें राहून घण मारण्याचें काम पुरुषांचें; शारीरिक कष्टाच्या या क्षेत्रांत तरी स्त्रिया लवकर पाऊल टाकणार नाहींत असा माझा अंदाज, परंतु तोही चुकीचा ठरला. मॉस्कोंत मोटारच्या फॅक्टरीला जोडून एक धंदेशिक्षणाचें कॉलेज आहे. त्याच्या वर्कशॉपमध्यें सात आठ विद्यार्थी लोहाराचें काम करीत होते. त्यांत तीन विद्यार्थिनीहि होत्या. भट्टींतून तापलेलें लोखंड काढण्याचें आणि वजनाचा घण उचलून मारण्याचें काम त्या करीत होत्या. बाकीच्या यंत्रांवर कलाकुसरीचें कामही मुली करीत होत्या हें सांगण्यांत कांहीं विशेष राहिलें नाहीं. ट्रामवेमध्यें कंडक्टरचें व तिकीट विकण्याचें आणि रस्त्यावर थंडींत व पावसांत उभें राहून रुळाचे सांधे बदलण्याचें कामही अनेक स्त्रिया करीत आहेत. शिक्षणसंस्था, न्यायसभा, हॉस्पिटल्स् इत्यादि पोषाखी व्यवसायांतही अर्थात् स्त्रियांचा भरणा पुष्कळच आहे. समाजाच्या आर्थिक जीवनांत बायकांचें क्षेत्र चूल, पाळणा आणि आरसा यांनीं आजपर्यंत मर्यादित

झालें होतें. रशियांत पुरुषांचे सर्व व्यवसाय करण्याचा समान हक्क स्त्रियांना प्राप्त झाला आहे.

स्त्रियांच्या आरोग्याची आणि त्यांच्या मनोविकासाची काळजी रशियांत अत्यंत दक्षतेनें घेतली जाते. कारखान्यांत काम करणाऱ्या

भाग्यवान् माता

स्त्रियांना बाळंतपणाचे पूर्वी आणि नंतर दोन दोन महिने पगारी रजा देण्यांत येते. सार्वजनिक दवाखान्यांतून सल्लामसलत आणि औषधोपचार यांची आधुनिक साधनांच्या साह्यानें सोय केली जाते. त्या पुन्हां कामावर रुजूं झाल्या म्हणजे दर दोन तासांनीं सुटी देण्यांत येते. त्या अवधींत त्यांनीं आपल्या मुलांना पाजावें. कारखान्याला जोडूनच एक शिशुमंदिर असतें. त्यांत सात आठ तास मुलांना ठेवितां येतें. तेथें तज्ज्ञ दाया मुलाच्या आरोग्याची व शिक्षणाची काळजी घेतात. रशियन राज्यक्रांतीपूर्वी हें सौख्य स्त्रियांना नव्हतें. गरोदर स्त्रियांना कारखानदारानें कामावरून बडतर्फ करावें आणि दारू पिऊन झिंगून घरीं आलेल्या नवऱ्यानें चाबकाखालीं त्यांना झोडपावें असा सांप्रदाय होता.

तेरा मिनिटांत लग्नविधी उरकूं शकतो ही गोष्ट एखाद्यानें डोळ्यानें पाहिली असल्यास इतरांनीं त्यावर विश्वास ठेवण्यास हरकत

विवाहसंस्थेचा साधेपणा

नाहीं. रशियांत लग्न आणि काडीमोड रजिस्टर करणाऱ्या संस्थेला 'ZAGS' म्हणतात. आम्हीं ही संस्था पाहून बाहेर पडणार इतक्यांत १९।२० वयाचें एक जोडपें लग्नासाठीं तेथें आलें. त्यावेळीं एक वाजून दोन मिनिटें झालीं होतीं. रजिस्ट्रार बाईनें उभयतांचे कागदपत्र पाहिले, तीन रूबल फी घेऊन एक पावती दिली, एक वाजून पंधरा मिनिटें झालीं, आणि या व्यक्ती विवाहित होऊन

ऑफीसच्या बाहेर पडल्या! रशियांतील विवाहपद्धति बेलगामी आहे ही समजूत चूक आहे. विवाहाचे त्यांचे कायदे थोडे आणि सोपे आहेत, आणि आनुषंगिक समारंभ, खर्च इ. गोष्टींना काट मारला आहे. रोगमुक्त असल्याचा वैद्यकीय दाखला असल्याशिवाय विवाह होऊं शकत नाहीं. हा कायदा मोडून संसर्गजन्य रोग दुसऱ्या व्यक्तीला देणाऱ्या अपराध्यास १००० रूबल दंड आणि तीन वर्षें कैद अशी शिक्षा होते. भ्रमिष्ट, पूर्वविवाहित, आणि निकटसंबंधीं व्यक्तींना विवाह करतां येत नाहीं. विवाह न करतां एकत्र राहणाऱ्या व्यक्तींना कायद्यानें विवाहित समजण्यांत येतें आणि सर्व निर्बंध लागू होतात. काडीमोड करावयाची असल्यास तीन रूबल फी पडते. पति-पत्नी यांपैकीं कोणाला एकालाही वरील कचेरींत जाऊन ताबडतोब काडीमोड करितां येते. या ऑफिसमध्यें बाहेरचे बाजूस वैवाहिक शिक्षणविषयक माहितीचे तक्ते लाविले आहेत. वैवाहिक ब्रह्मचर्याचे नियम, शिशुसंगोपन आणि सुसंस्कृत कुटुंबराहाणी कशी असावी याविषयीं माहितीही या ठिकाणीं ठेविली आहे. सारांश, विवाह व काडीमोड या संस्था रशियानें सोप्या केल्या आहेत त्याचा उद्देश वैषयिक वृत्तीस उत्तेजन द्यावें हा नसून, स्त्रीपुरुषांना परस्पर-संबंधाची जबाबदारी वाटावी आणि गृहजीवन सौख्यमय व्हावें हा आहे. या देशांत काडीमोडीचें प्रमाण सध्यां शेंकडा ५० आहे.

शाळेंत जाणारा समाज

सायंकाळचे वेळीं रशियांतील एकाद्या शहरांतून चालणाराला कित्येक प्रौढ व्यक्ती हातांत विद्यार्थ्याप्रमाणें पुस्तकांचें पाकिट घेऊन लगबगीनें कोठें तरी चाललेल्या दिसतात. वयानें तीस ते साठच्या घरांतील हे स्त्री-पुरुष शाळेंत जात आहेत किंवा शाळेंतून आले आहेत. रशियांतील शेंकडा पन्नास लोक कोणत्या ना कोणत्या तरी शाळेंत

जात असतात. तेथें कोणी मुळाक्षरें, कोणी प्राथमिक शिक्षण, कोणी दुय्यम शिक्षण, कोणी धंदेशिक्षण तर कोणी उच्च दर्जाचें राजकीय शिक्षण घेत असतात. झारशाहीच्या अमदानींत अज्ञानांत ठेवलेल्या या लोकांना शिक्षणाची भूक लागली आहे कीं काय असें वाटतें. निरक्षरतेचें प्रमाण पंधरा वर्षांत ऐंशीचें वीसवर आलें आहे, ही गोष्ट सहजासहजीं विश्वास पटण्यासारखी नाहीं. एका अमेरिकन मित्रासमवेत रशियन कोश ( डिक्शनरी ) खिशांत घेऊन आम्हीं रस्त्यावर इतस्ततः समाजनिरीक्षण करीत जात होतों. रस्ता अडला किंवा कांहीं विचारावयाचें झालें म्हणजे मुद्दाम एखाद्या अशिक्षित दिसणाऱ्या माणसाला थांबवून त्याला कोशांतील इंग्रजी शब्दांचा रशियन प्रतिशब्द दाखवून प्रश्न विचारावा. इतक्या व्यक्तींतून वाचतां येत नाहीं अशी एकही व्यक्ती आम्हांस आढळली नाहीं. सोळा कोट लोकांना साक्षर करणें ही सोपी गोष्ट नाहीं. १५ वर्षांत ही कामगिरी करणाऱ्या सत्तेनें अनेक शतकें सूर्यप्रकाशांत राज्य करून अज्ञानांधकारावर साम्राज्य चालविणाऱ्या इतर सत्तांना लाजविलें आहे यांत शंका नाहीं.

ज्ञानाची भूक व जिज्ञासा

साक्षर झालेल्या या समाजांत वाचनाची अभिरुचि उत्पन्न झाली आहे आणि या अभिरुचीला पोषक आणि सात्त्विक असें वाङ्मय सरकारनें निर्माण केलें आहे. शहरांतून कोणत्याही रस्त्याला जा, पुस्तकांचीं अनेक दुकानें थाटलेलीं दिसतात. यांत हलक्या दर्जाच्या लघुकथा कादम्बऱ्यांच्या स्वरूपाचें वाङ्मय नसून इतिहास, राजकारण, तत्त्वज्ञान, टेक्नॉलाजी, विज्ञान, रेडिओ इ. गंभीर विषयांवरील पुस्तकें असतात. प्रत्येक दुकानाभोंवती खूप गर्दी असते. या गिऱ्हाइकांत केवळ शाळा कॉलेजमधील तरुण नसून प्रौढ

वयाचे स्त्री–पुरुषही असत. बोटीवरचे सेलर्स – खलाशी – म्हणजे काम झाल्यावर मजा करणाऱ्या आणि बंदरांत आल्यावर माणुसकी विसरणाऱ्या व्यक्ती समजल्या जातात. रशियन बोटीवरील खलाशी बसत ती जागा आम्हीं जाऊन पाहिली. या ठिकाणीं लेनिन, स्टालिन, मार्क्स इ. फोटो लाविले होते; सिनेमा नटींचे फोटो दिसले नाहींत. आणि टेबलावरील मासिकांत सर्व राजकीय, सामाजिक आणि टेक्निकल विषयांवरील वाङ्मय होतें. कामकरी खलाशांपासून वरपर्यंत ज्या समाजांत गंभीर विषयाच्या विचाराची, वाचनाची आणि वादविवादाची आवड उत्पन्न होते तो समाज उच्च संस्कृतीच्या मार्गास लागला यांत शंका नाहीं.

रशियन लोकांना वादविवादाची अत्यंत हौस. हे लोक बोलतांना अडखळत नाहींत. इंग्रजींत एक वाक्य सांगितलें तर तें दुसऱ्याला समजावून सांगतांना रशियन मनुष्य दहा वाक्यांत सांगेल इतकी त्याला बोलण्याची आवड असते. तुम्हांला इंग्लिश येत आहे हें माहित असतांना देखील अपरिचित असलेला इंग्रज गृहस्थ तुमच्या शेजारीं तीन चार तास बसला तरी चकार शब्द बोलणार नाहीं. उलट तुमची भाषा येत नसली तरी खाणाखुणांनीं, करपल्लवीनें, मोडक्या तोडक्या इंग्रजी भाषेंत रशियन मनुष्य आपलें मनोगत व्यक्त करून तुमच्या भावना समजावून घेईल.

न्यायदानाच्या पद्धतींत क्रांति करून रशियानें एकप्रकारची गांवपंचायत सुरू केलेली आहे. कोर्टांत दिसून येणारा औपचारिकपणा, दरारा, कायदेबाजी इ. येथें नसून उलट माणुसकीचें आणि घरगुतीपणाचें वातावरण न्यायसभेंत असतें. न्यायसभेचें चित्र पाहण्यासारखें आहे. २०×५० फुटाचे दिवाणखान्यांत एक फूट

न्यायकोर्टाचें चित्र

उंचीच्या प्लॅटफॉर्मवर काळया फ्रेमची आरशी लावून चाळिशींच्या घरांतील एक बाई बसलेली आहे. ही मुख्य न्यायाधीश. तिच्या डाव्या बाजूस त्याच वयाची एक बाई आणि उजव्या बाजूस एक गृहस्थ बसलेला असून उभयताही गिरणीकामगार आहेत. न्यायाधिशाला मदत करण्याकरितां या दोन व्यक्तींची निवड गिरणी कामगारांनीं एकमतानें केलेली आहे. टेबलावर हिरवें कापड, मागील बाजूस लेनिनचा फोटो, आणि इतर भिंतीवर पंचवार्षिक योजनेचीं चित्रें आहेत. समोर बाकें असून त्यावर येणारे जाणारे बसले आहेत. न्यायाचें काम सुरू झालें पण येथें पट्टेवाला नाहीं, अमुक वकील हजर म्हणून ललकारी नाहीं, आणि विशेष म्हणजे आरोपीला उभे राहाण्याला पिंजरा नाहीं. आरोपी न्यायाधिशासमोर उभा राहून टेबलावर टेकून आपली केस समजावून सांगत होता. आणि चोवीस वर्षें वयाच्या या पुरुषाला न्यायाधीशबाई उलटसुलट प्रश्न विचारीत होती. पहिल्या केसमध्यें आरोपीवर आक्षेप होता कीं, त्यानें कोऑपरेटिव्हमधील भाकरी स्वस्त दरानें घेऊन ती विकली आणि फायदा मारला. दुसऱ्या केसमध्यें एका गृहस्थावर असा आरोप होता कीं, त्यानें पेंटिंग करण्याकरितां क्रेयॉन(खडू) आणि रंग चोरले. पहिली केस संपल्यानंतर कोर्टाचें काम मुद्दाम थोडा वेळ थांबवून वरिष्ठ न्यायाधिशानें आणि वरील न्यायाधीश बाईनें प्लॅटफॉर्मचे खालीं येऊन इतर लोक बसले होते त्यांच्यांतच बसून केस काय होती आणि काय निकाल लागला इ. गोष्टी आम्हां परदेशी पाहुण्यांना समजावून सांगितल्या. न्यायाधिशांचे अंगावर मोठमोठे काळे गाऊन नव्हते, आणि खालीं लोकांत येऊन बसल्यास आपली इज्जत आणि दरारा कमी होईल अशी त्यांना भीति वाटली नाहीं.

न्यायाधिशाचे दोन मदतनीस पाळीपाळींनें बदलले जातात. त्यांच्यापुढें आलेले आरोपी, साक्षीदार इत्यादी त्यांना परिचित असतात. न्यायाधीश आणि दोन सल्लागार यांच्या बहुमतानें न्याय होतो. सार्वत्रिक शिक्षा शारीरिक श्रमाची दिली जाते. या श्रमाबद्दल कैद्यांना त्यांचा पगार मिळतो, आणि सरकारी सुट्टीचे दवस त्यांचे शिक्षेंतून कमी केले जातात. तुरुंगाचे आंत कैदीच आपआपली सर्व व्यवस्था आणि कारभार पाहातात, वॉर्डर वगैरे कोणी नसतात. सर्व वकील सरकारी नोकर असतात. वाटल्यास वकील द्यावा किंवा स्वतःच केस चालवावी. वरील दोन्हीहि प्रसंगीं वकील दिलेला दिसला नाहीं. त्यावरून वकील ही संस्था फार थोडया प्रमाणांत अस्तित्वांत असावी असें दिसतें.

रशियन राज्यक्रांति केवळ राजकीय स्वरूपाची नसून समाजाच्या अखिल सांप्रदायिक जीवनांत तिनें क्रांतीला आरंभ केला आहे.

---

प्रकरण चौदावें

## निश्चित ध्येय आणि सुसंगत कार्यक्रम

अंधानुकरण कीं कल्पकता ?

आंब्याच्या मोह्होरावरून मोसमांतील फळांचा अंदाज करणें फार अनिश्चित असतें. आभाळ येऊन मोहोर केव्हां गळून पडेल, आणि त्यांतून टिकलेल्या कच्च्या कैऱ्यांपैकीं पुनः वादळांतून किती टिकून राहातील हें सांगवत नाहीं. आज रशियांत सर्व गोष्टी महत्त्वाच्या आणि आशादायक दिसतात. परंतु नवीन विचारांच्या आभाळानें आणि काळाच्या झंझावातानें यांतील किती गोष्टी सुदृढपणें टिकून राहतील आणि किती गळून पडतील हें सांगणें कठीण आहे.

तरी पण एक गोष्ट निश्चित आहे कीं, गेल्या पंधरा वर्षांत रशियानें मानवीं प्रयत्नांची शिकस्त करून जगांतील कोण त्याही राष्ट्रापेक्षां अधिक वेगानें प्रगति केली आहे. आणि हाच वेग कायम राहिल्यास पुढील १५।२० वर्षांत जगांतील पहिल्या प्रतीच्या राष्ट्रांचे तोडीस रशिया येऊन बसेल आणि त्याच्या विचारप्रवाहांची छाप सर्व राष्ट्रांतील समाजांवर पडेल यांत संशय नाहीं. यदृच्छेनें घरीं आलेल्या विचारांचें चिकित्साहीन वृत्तीनें अनुकरण करणें ही एक वृत्ति, आणि उत्पन्न होणाऱ्या नवीन विचारांचे प्रवाहांशीं जाऊन त्यांतील त्याज्य-ग्राह्य भागांची परीक्षा करून ध्येयानुकूल भाग आत्मसात् करणें ही दुसरी वृत्ति. हिंदुस्थाननें आजपर्यंत पहिल्या वृत्तीचें अनुकरण केलें आहे. यूरोपमध्यें डिमॉक्रसीचा घोष सुरू झाल्याबरोबर त्याचा प्रतिध्वनि हिंदुस्थानांत उठूं लागतो, आणि यूरोपमध्यें कम्यूनिझम किंवा फॅसिझमचा जयजयकार सुरू झाला कीं भावनाप्रधान हिंदी अंतःकरणांत त्याचे पडसाद उठूं लागतात. ऑक्सफर्डच्या ब्लेझरची नक्कल करणें आणि युरोपांत आजच्या घटकेस उत्पन्न होणाऱ्या राज्कीय तत्त्वज्ञानाच्या गप्पा मारणें या कालांतरानें सारख्याच फॅशनच्या गोष्टी होऊन बसतात, परंतु त्यांत बौद्धिक आळस आणि कल्पकतेचा अभाव हे दोष उत्पन्न होतात. इतर राष्ट्रांनीं आपल्या परिस्थितींतून उत्पन्न केलेला राजकीय वेदांत आणि तदनुकूल साधनें जशींच्या तशींच उचलणें यांत सुकरता आहे, पण प्रयोजकपणा नाहीं. हिंदुस्थानचा राजकीय वेदांत हिंदी जमिनींतून,परिस्थितींतून आणि ध्येयांतून उगवला पाहिजे. ज्या कल्पकतेनें आणि धीटपणानें, हिंदी तत्त्वज्ञान्यांनीं अध्यात्मशास्त्रांत आघाडी मारून जगांत पहिलें स्थान मिळविलें तीच कल्पकता आणि तोच धीटपणा राजकीय, आर्थिक, आणि सामाजिक क्षेत्रांत खळविला

तर त्यांतून नवीन समाज, राज कारण, अर्थशास्त्र यांचीं ध्येयें आणि योजना निर्माण होतील. मग जगांतील नवीन नवीन प्रयोगांचें केवळ सर्रास अंधानुकरण न करितां त्यांतील तंत्रांचा आणि साधनांचा स्वतःचे ध्येयाचे कामीं उपयोग करून घेणें सोपें जाईल.

समाजाच्या औद्योगिक, राजकीय आणि सांस्कृतिक अशा तिन्ही गोष्टींवर रशियानें सारखा भर दिलेला आहे. अमेरिका,

औद्योगिक प्रगती-चा बेफाम वेग

इंग्लंड व जर्मनी हीं राष्ट्रें उद्योगधंद्यांच्या दृष्टीनें पुढारलेलीं आहेत. परंतु गेल्या पांच वर्षांत या राष्ट्रांच्या प्रगतीची तुलना करतां त्यांचें प्रमाण जर्मनी ८३, अमेरिका ९७ आणि रशिया २१९ असें पडतें. खनिज तेल आणि दगडी कोळसा हीं आजचीं उद्योगप्रगतीचीं मुख्य साधनें; यांचे उत्पादनांत रशियानें स्वतःचे पंचवार्षिक योजनेचेही पुढें आघाडी मारली. आजपर्यंत तयार मालाची रशियांत आयात होत असे, परन्तु आतां रशिया आपला तयार केलेला माल इतर देशांत पाठवूं लागला आहे. रशियाची टेक्स्टाइल ( कापड ) धंद्याची यंत्रसामग्री जर्मनींत जाऊं लागली आहे, आणि त्याच्या मोटारगाडया वगैरे माल तुर्कस्थान इ. पौर्वात्य देशांत निर्यात होऊं लागला आहे. तुर्कस्थाननें रशियन एंजिनियर्सना बोलावून स्वतःचे औद्योगिक वाढीची पुनर्घटना करण्याचे साहाय्यास घेतलें आहे, आणि तुर्क विद्यार्थी रशियांत येऊन धंदेशिक्षणाचे धडे घेऊं लागलेले आहेत. इतर देशांत बेकारी कायम ठाणें देऊन बसली असतां रशियानें आपली बेकारी नाहींशी करून बहुतेक कारखाने रात्रंदिवस चालू ठेविले आहेत, आणि रोजच्या कामाच्या तासांचें प्रमाण सातावर आणिलें आहे.

याच वेगानें शिक्षणविषयक प्रगति चालू आहे. निरक्षरतेचें

अवघ्या पंधरा वर्षांत पार उच्चाटन करून टाकलेलें आहे.

नवीन सत्तेची शाश्वती

शाळा, शिक्षणसंस्था, आणि विद्यार्थ्यांची संख्या यांच्यांत झपाट्यानें वाढ झालेली आहे. या प्रगतीचे आंकडे दिल्यास फार जागा अडेल. राजकीय दृष्टीनें झालेली प्रगति आंकड्यांत मावणें कठीण आहे, तिचा कल्पनेनेंच अंदाज केला पाहिजे. क्रांतीचे प्रारंभीं रशियास अंतस्थ आणि बाहेरचे असे दोन्ही बाजूंनीं शत्रू होते. राजकीय क्रांतीमुळें ज्यांचें नुकसान झालें ते लोक नवीन सत्ता उलथून पाडण्याचा प्रयत्न करीत होते. आणि रशियांतील या नवीन समाजक्रांतीचें वारें आपल्याही देशांत शिरेल कीं काय या भीतीनें युरोपियन राष्ट्रांचे छातींत धडकी भरली होती. त्यामुळें रशियाला इतर राष्ट्रांत वजन नव्हतें व कायदेशीर मान्यता नव्हती, म्हणून आर्थिक संबंधही मर्यादित होते. पंधरा वर्षांनंतर रशियास अमेरिकेनें मान्यता दिली कारण अमेरिकन भांडवलवाल्यांना रशियन राजसत्तेच्या स्थिरतेचा भरंवसा आला. राष्ट्राचे पुढारीपणाचे स्थानीं विचारवंत, कल्पक, ध्येयनिष्ठ आणि धैर्यवान् पुढारी असल्याशिवाय जगाचे विरोधास तोंड देऊन इतकी प्रगति करणें अशक्य आहे.

रशियाच्या यशाचें बीज काय आहे असा प्रश्न साहजिकच मनांत उभा राहातो. ध्येयाची निश्चितता आणि साधनांची विविधता

यशाचें बीज काय ?

या दोन गोष्टी रशियन प्रयोगांत प्रमुखपणें दिसतात. भूत–विद्यमान परिस्थिति आणि भावी साध्य यांतून रशियानें आपलें ध्येय निर्माण केलें. या ध्येयाला अनुकूल अशीं साधनें मिळतील तेथून उसनीं घेतलीं आणि नवीन साधनें निर्माण केलीं. साधनांची निवड किंवा त्याग करण्यास रशियाजवळ ध्येयाची कसोटी आहे. त्यामुळें केवळ

भांडवलशाहीनें उपयोगांत आणिलें आहे म्हणून रशियन पुढारी एखाद्या साधनाचा त्याग करीत नाहींत, किंवा आपण एवींतेवीं स्वीकारलें आहे म्हणून एकादें साधन ते उराशीं बाळगून असत नाहींत. अमेरिकन शिक्षणपद्धतीपैकीं प्रोजेक्ट मेथड नांवाची शिक्षणपद्धति रशियानें कांहीं वर्षें स्वीकारली होती. परंतु अनुभवांतीं आपल्या ध्येयास ती प्रतिकूल आहे असें आढळून येतांच त्यांनीं तिचा एकदम त्याग केला. त्याचप्रमाणें नवीन साधनें निर्माण करतांना या गोष्टी इतर राष्ट्रांनीं केल्या नाहींत तर आपण कशा कराव्यात असा भेकडपणा रशियन पुढाऱ्यांनीं दाखविला नाहीं. राजकीय, शैक्षणिक आणि आर्थिक क्षेत्रांत प्रत्येक पावलागणिक युरोपमधील मानदंडाकडे डोळा ठेवण्याची वृत्ति त्यांनीं स्वीकारली नाहीं. रशियांतील पुढाऱ्यांचा हा धीटपणा इतरांना मार्गदर्शक आहे. नवीन वाटा निर्माण करणाऱ्यांची जगाला गरज आहे. प्रारंभींच्या उपहासांतून आणि उपेक्षेंतून बाहेर पडलेल्या अशा समाजाकडे जग आदरानें व कुतूहलानें पाहात राहातें. ध्येय आणि साधनें यांचा मेळ रशियानें कसा घातला आहे हें एका उदाहरणावरून दिसून येईल. विद्यार्थ्यांच्या एका वसतिगृहांत २५० विद्यार्थी होते. या विद्यार्थ्यांचा अभ्यासक्रम पाहिला म्हणजे त्यांत आणि रशियन औद्योगिक ध्येयांत किती सुसंगतता आहे तें दिसून येईल. देशाच्या गरजांकडे लक्ष न देतां निवळ पुस्तकी शिक्षणाकरितां दगडावर दगड रचणाऱ्यांनीं या गोष्टीकडे विशेष लक्ष द्यावें; विद्यार्थ्यांच्या अभ्यासक्रमाचे विषय पुढें दिले आहेत.

मेकॅनिकल एंजिनिअरिंग ३०, इलेट्रिकल ५०, टेक्स्टाईल ३०, केमिकल १५, लष्करीकॉलेज १५, ट्रान्सपोर्ट एंजिनिअरिंग ६, ऑटो मेकॅनिक्स १५, स्टील इंडस्ट्री १२, टूल कनस्ट्रक्शन १०, उच्च शेतकी शास्त्र ८.

पाश्चात्य सुधारणेचा आणि शास्त्रीय प्रगतीचा रशियानें भरपूर उपयोग करून घेतला आहे. विज्ञान, यंत्रकला, शिक्षणशास्त्र, संशोधनपद्धति, वैद्यक इ. शास्त्रांतील अमेरिकन, जर्मन आणि इंग्लिश तज्ञ, शास्त्रज्ञ आणि एंजिनियर्स स्वदेशांत आणून मोठमोठाले कारखाने रशियानें उभे केले आणि त्यांचे बरोबरीस कामाला लावून आपलीं माणसें तयार करून घेतलीं. या बाबतींत रशियानें पाश्चात्य राष्ट्रांची बरोबरी केली आहे इतकेंच नसून कांहीं बाबतींत त्यांचेवर मातही केली आहे. परंतु इतकें असूनही स्वःतचें ध्येयवैशिष्ट्य रशियानें गमावलें नाहीं.

नवीन तत्त्वज्ञान, नवीन अर्थशास्त्र, नवीन समाजशास्त्र यांचे पायावर आपला समाज उभारावयाचा आहे, अशी जागृती जाणीव रशियन पुढाऱ्यांच्या ठिकाणीं सतत असल्या-कारणानें हें ध्येयवैशिष्टय प्रत्येक क्षेत्रांत कसें प्रतीत करितां येईल याविषयीं त्यांचा अहर्निश विचार चालू असतो. वैशिष्टयसाधनाचें हें ध्येय कांहीं वेळां अजाणपणें हास्यास्पद ठराला जातें इतकी ध्येयनिष्ठा या लोकांत उत्पन्न झाली आहे. कोणतेंही शास्त्र असलें तरी त्याला "मार्क्सियन" हें विशेषण लावल्याशिवाय रशियन लोक तें घेत नाहींत, उ० मार्क्सियन सायकॉलॉजी, मार्क्सियन पेडॅगॉजी इ. या गोष्टींचा अचंबा वाटून मी एका शास्त्रज्ञाला म्हणालों, न्यूटनचा गुरुत्वा-कर्षणाचा शास्त्रीय सिद्धांत घ्या. या सिद्धांतांत कांहीं मार्क्सियन ग्रॅव्हिटेशन आणि कॅपिटॅलिस्टिक ग्रॅव्हिटेशन असा फरक होणार नाहीं. यावर रशियन शास्त्रज्ञांचें म्हणणें असें होतें कीं, मार्क्स आणि लेनिन यांनीं आपल्या ग्रंथांतून ठिकठिकाणीं भौतिक शास्त्रें आणि संशोधन या विषयांवर विचार प्रदर्शित केले आहेत. त्यांच्या

ध्येयांत सुसंगति

अनुरोधानें यापुढें संशोधन चालू ठेवणें हें रशियाचें कार्य आहे. मास्कोंतील शास्त्रीय विषयाच्या संस्था पाहिल्या म्हणजे त्यांच्या 'मार्क्सियन सायन्सचा' अर्थ समजतो. समर्थ राष्ट्रांनीं आतांपर्यंत शास्त्रांचा उपयोग साम्राज्यसंवर्धन आणि परस्परांशीं युद्ध यांकडे करून घेतला आहे. युद्धाकरितां विषारी धूर कसा तयार करावा, नवीन युद्ध उपस्थित झालें असतां 'केमिकल वॉरफेअर' चा (रसायन अस्त्रात्मक युद्धपद्धति) उपयोग कसा करितां येईल इ. विषयांचें संशोधन करण्यांत सध्यां समर्थ राष्ट्रांतील शास्त्रज्ञांचे प्रयत्न चालू आहेत. ही दृष्टि सोडून मानव जातीच्या हिताकडे शास्त्रांचा उपयोग कसा करून घेतां येईल, या दिशेनें जें संशोधन त्याला मार्क्सियन संशोधन असें संबोधण्याचा रशियन लोकांचा उद्देश असावा.

विभूतिपूजेचा अतिरेक

मानव जातीचा स्वभाव असा आहे कीं, पुढारी म्हणून एकाद्या व्यक्तीचा स्वीकार समाजानें केला कीं, त्याचेवर वास्तविक आणि काल्पनिक सर्व सद्गुण आणि सर्वज्ञता लादण्यांत येते. राजकारण व अर्थशास्त्र यांवर लेख लिहिणाऱ्या मार्क्सच्या संग्रहांतून रशियन लोक ज्याप्रमाणें सायन्स काढतात, त्याचप्रमाणें सध्यां जर्मन लोकांचीही स्थिति झाली असून हिटलरच्या लेखनांतून ते मानस शास्त्रादि विषयांचा शोध करूं लागले आहेत! भावनावशतेच्या भरांत विभूतिपूजेचा अतिरेक होतो, परंतु कांहीं काळ निघून गेल्यानंतर विवेचक दृष्टि जागृत होऊन ती शाश्वत तत्त्वांचा अंगिकार करते आणि आनुषंगिक गोष्टी सोडून देते.

समाजांतील वर्गकलह नाहींसे करून वर्गहीन समाज निर्माण करणें, भांडवलशाहीची व खाजगी मालमत्तेची संस्था

मोडून भौतिक सुखांच्या सर्व साधनांवर समाजाची सत्ता स्थापन करणें, धर्म आणि गूढवाद इत्यादि पासून समाजाचें मन मुक्त करून तें भौतिक शास्त्राकडे लावणें, आणि पारलौकिक ध्येयापेक्षां ऐहिक ध्येयांवर भर देणें, या गोष्टी समाजसत्तावादाच्या मुळाशीं आहेत. त्या साध्य करण्याचा प्रयोग सोळा कोट लोकसंख्येच्या समाजावर रशियन लोक करीत आहेत. वरील तत्त्वांचें आचरण प्रत्यक्ष व्यवहारांत कितपत आलें आहे, येत आहे, किंवा येण्याचा संभव आहे, या गोष्टीवर रशियाचें यश किंवा अपयश अवलंबून राहील.

---

## प्रकरण पंधरावें

# रशियाचा प्रयोग व हिंदी मनोवृत्ति

रशियन सरकारनें राजकीय सत्तेच्या जोरावर शेती, कारखाने, राहाण्याचीं घरें, व्यापार इ. गोष्टी आपल्या हातांत घेतल्या आहेत.

समाजसत्तेचे सुपरिणाम

या सर्व गोष्टींचा कारभार केंद्रीभूत अशा एका सत्तेच्या हातांत आला असल्याकारणानें विशिष्ट ध्येयानें आणि धोरणानें त्यांची प्रगति करणें शक्य झालें आहे. लहानसहान शेतें एकत्र करून त्यांची मोठी शेती बनविल्यामुळें तेथें यांत्रिक सामग्रीचा उपयोग करितां येऊन उत्पन्न वाढवितां येतें आणि शारीरिक कष्ट कमी करतां येतात. कारखाने सरकारनें आपल्या हातीं घेतल्यामुळें मोठ्या प्रमाणावर यंत्रसामग्री खरेदी करणें, परदेशी एंजिनिअर्स आणून कामास लावणें व नवीन कारखाने भराभर उभारणें या गोष्टी शक्य झाल्या आहेत. याच धोरणास अनुसरून राहाण्याचीं घरें, दवाखाने व शाळा या गोष्टींची वाढ मोठ्या प्रमाणावर होत आहे.

नवीन समाजरचनेचा उत्साह लोकांचे ठिकाणीं आहे, व ही रचना बाल्यावस्थेंत आहे तोंपर्यंत ठीक आहे. परंतु याच तत्त्वानुसार मानवी व्यवहाराच्या सर्व संस्था समाजसत्ताधारी स्टेटच्या हातांत गेल्या म्हणजे त्यांच्यांतील माणुसकीचा भाग हळुहळू कमी होत जातो. नियम-कायद्यावर सर्व व्यवहार चालू लागतात आणि व्यक्तीव्यक्तींच्या संबंधांत असणारी अगत्याची भावना नाहींशी होऊन त्या ठिकाणीं तुसडेपणा येण्याचा संभव असतो. "सरकारी" म्हणून मानल्या गेलेल्या सर्व संस्थांमधून अनुभवास येणारी कठोरता मानवी व्यवहारांत सर्रास येऊं लागली तर एकंदर जीवन रुक्ष होऊन जाईल. याचा थोडया प्रमाणावर अनुभव रशियांत येऊं लागला आहे. वाण्याच्या दुकानापासून आणि खाणावळीपासून तों वरपर्यंत सर्व लोक प्रस्थापित सत्तेचे अधिकारी. प्रत्येक जण नियमांकडे आणि कायद्यांकडे बोट दाखवून वागतो. वैयक्तिक जरूरीप्रमाणें नियम पुढेंमागें करावा लागतो हें तत्त्व कोणी ओळखीत नाहीं, किंवा अपवाद करण्याची जबाबदारी आपल्या अंगावर घेत नाहीं. त्यामुळें कांहीं कांहीं वेळीं असें वाटूं लागतें कीं, खाजगी भांडवलशाही पुरवली पण हा सरकार—दरबार नको. लोकशिक्षणानें अर्थात् या गोष्टी कमी होतील हें जमेस धरून चालावयास पाहिजे.

अपेक्षित दुष्परिणाम व त्यावर उपाय

पूर्वीचें व्यक्तिस्वातंत्र्याचें तत्त्व आणि रशियांतील समाजसत्तेचें तत्त्व यांतील मध्यबिंदु साधणें शक्य आहे कीं काय याचा विचार केला पाहिजे. समाजाच्या आर्थिक हिताच्या आणि सुरक्षिततेच्या दृष्टीनें जरूर तेवढीच सत्ता आणि संपत्ति सामुदायिक रूपानें ठेवून बाकीचीं जीवनव्यवहाराचीं क्षेत्रें व्यक्तीच्या हातीं ठेविलीं तर त्यांत दोन्ही गोष्टी साध्य होऊन उभय पद्धतींतील दोष टळतील. सामु-

दायिक संपत्तीचा सर्व फायदा समाजास मिळेल आणि त्याचबरोबर वैयक्तिक व्यवहारांतील ओलेपणाही कायम राहील.

वर्गहीन समाज निर्माण करण्याचे दृष्टीनें रशियन सत्तेनें पूर्वीचा वर्गप्रधान समाज नाहींसा करून एकजात सर्व कामकरी वर्गाचा समाज निर्माण केला, अथवा असें करण्याचा प्रयत्न चालविला. परंतु या नवीन वर्गातही उच्च-मध्यम-नीच असे वर्ग उत्पन्न झालेले आहेत, कारण व्यक्तीच्या कर्तबगारीप्रमाणें आणि महत्त्वाप्रमाणें तिला सरकारी पगार दिला जातो. पगाराच्या दर्जाप्रमाणें समाजांत निरनिराळे वर्ग पडले आहेत. वरिष्ठ पगाराच्या अधिकाऱ्यांचे संघ निराळे, त्यांची राहाण्याची पद्धत निराळी, व त्यांचीं खाण्याचीं हॉटेल्स् निराळीं. स्वाभाविकच या आर्थिक विषमतेमुळें समाजाची वर्गवारी पडत जाते, आणि समान दर्जाचे लोक आपापला वर्ग करितात. ही गोष्ट नजरेस आणून दिली म्हणजे रशियन लोक सांगतात कीं, आत्यंतिक समाजसत्ता येण्यापूर्वींचा हा सोशालिझमचा काळ आहे. या काळांत वैयक्तिक कामाप्रमाणें पगार दिला जातो. परंतु यापुढें हळुहळू कम्यूनिझम सुरू होईल त्यावेळीं प्रत्येकजण आपल्या शक्तीप्रमाणें काम करील व आपआपल्या जरूरीप्रमाणें सामायिक संपत्तींतून लागेल तेवढें घेईल. सुखस्वप्न या दृष्टीनें वरील विचारसरणी चांगली आहे, परंतु असा काळ कधीं येईल कीं काय हा प्रश्न आहे. कांहीं लोक सांगतात कीं, हा काळ फक्त ध्येयसृष्टींतच राहाणार आहे. असो. मानवी स्वभाव जमेस धरला म्हणजे असें दिसतें कीं, समाजांत वर्ग पडणें ही गोष्ट अपरिहार्य आहे. हे वर्ग कोणत्या तत्त्वावर पडावेत या गोष्टी फार तर समाजशासनाच्या आटोक्यांत राहातील. जन्मावर, संपत्तीवर, कर्मावर, गुणांवर, चारित्र्यावर, संस्कृतीवर अथवा दुसऱ्या

आर्थिक विषमता कायम आहे

कोणत्या तत्त्वावर समाज विभागला जावा हें ज्या त्या समाजाच्या तत्त्वज्ञानावर आणि जीवनध्येयावर अवलंबून राहील.

रशियन समाजसत्तावाद बुद्धिपूर्वक जडवादावर आधारलेला आहे. युरोपियन आणि अमेरिकन लोकांतही जडवाद पसरलेला आहे, परंतु तुम्हीं जडवादी "मटिरिआलिस्टिक" आहांत असें म्हटलें कीं त्यांना कमीपणा वाटतो. रशियाची तशी गोष्ट नाहीं.

**रशियाचा प्रयोग व हिंदी मनोवृत्ति**

त्यानें जाणून बुजून जडवाद स्वीकारलेला आहे. मानवी दुःखें आणि जुलूम यांच्या भावना बुजाव्यात म्हणून धर्माचा शोध लावला गेला; धर्मानें मानवी दुःख नाहींसें होणार नसून तें भौतिक शास्त्रांचे अध्ययनानें आणि निसर्गाच्या नियमांचें ज्ञान करून घेतलें म्हणजे नाहींसें होईल असा समाजसत्तावाद्यांचा सिद्धांत आहे. त्यामुळें त्यांच्या कार्याचा भर भौतिक संपत्तीचें संवर्धन आणि तिचा उपयोग या गोष्टींवर आहे. या ध्येयाचे मागें एकनिष्ठेनें लागल्यामुळें थोडयाच दिवसांत रशियन लोक भौतिक क्षेत्रांत अमेरिकन लोकांचे बरोबर येतील. घरोघर रेडिओ, टेलिफोन, मोटारी, शॉवर–बाथरूम्स, सुंदर फर्निचर इ. गोष्टी दिसूं लागतील.

या जडवादाला रशियानें संस्कृतिसंवर्धनाची जोड दिलेली आहे. साहित्य–संगीत–कला इ. गोष्टींच्या सहाय्यानें प्रत्येक व्यक्तीनें आपला विकास करून घ्यावा याकरितां कलासंपादनाचीं साधनें प्रत्येकाचे आटोक्यांत आणून देण्याचा सरकार प्रयत्न करीत आहे. त्यामुळें आधींच संगीत–नर्तन–नाटय यांत पुढें असलेल्या या देशांत बहुजनसमाज कलाप्रेमी आणि रसमर्मज्ञ होईल अशीही अपेक्षा करण्यास हरकत नाहीं.

या सर्व गोष्टी साध्य झाल्या म्हणजे तरी लोकांना खरें सुख

आणि चिरकाल अपेक्षित शांति मिळेल किंवा नाहीं असा प्रश्न मनांत उभा राहतो. जो समाज उत्पन्न करावा अशी आज रशियाची महत्त्वाकांक्षा आहे त्या प्रकारचा समाजाचा एक लहान भाग आज अमेरिकेंत व युरोपियन राष्ट्रांत थोडा थोडा आहे. सुख मिळूं लागलें म्हणजे अधिक सुखाची हाव सुटून असमाधान उत्पन्न होतें, किंवा हें सर्व कशाकरितां असा विचार मनांत येऊन मनाला उद्विग्नता तरी येते. अशा परिस्थितींत मनाला समाधान स्थितींत ठेवून शांति देणारें तत्त्वज्ञान उत्पन्न होणार नाहीं तोंपर्यंत खरें सुख आणि शांति प्राप्त होणार नाहीं. न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति। हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥ अशी भौतिक सुखाची रीत आहे. प्राचीन आर्यांना आलेला हाच अनुभव पुढें रशियन लोकांना येऊन तेथून त्यांच्या नवीन तत्त्वज्ञानाला प्रारंभ होईल कीं काय असें वाटतें. आज तरी वस्तुस्थिति अशी आहे कीं, पिढयान्पिढया दारिद्र्यांत ठेवल्या गेलेल्या या समाजाला भौतिक जीवनाची कडकडून भूक लागलेली आहे.

तरी सुख शांति मिळेल काय ?

फरेंच आणि अमेरिकन राज्यक्रांतीप्रमाणें रशियन राज्यक्रांतीही कांहीं वर्षांनीं शिळी होऊन जाईल आणि तिच्या मूलभूत तत्त्वांवर वैयक्तिक परंपरा, वैयक्तिक स्वार्थ, पक्षभेद इ. गोष्टींचा लेप चढेल. परंतु असें झालें तरी व्यापक दृष्टीनें पाहतां जागतिक राजकीय विचारांत या क्रांतीनें एक पाऊल पुढें पडलें यांत संशय नाहीं. समाजाच्या प्रारंभकालापासून आजपर्यंत आदर्श समाजरचना कशी असावी हा प्रश्न सोडविण्याकरितां मानवी वृत्ति चांचपडत आहे. आत्यंतिक सत्य सहजासहजीं शोधून काढण्याचें सामर्थ्य मानवाला नसल्या-

जगाचें एक पाऊल पुढें

कारणानें प्रयोग करीत करीत आणि यशापयश घेत घेत त्यानें हा शोध चालविला आहे. एक वेळ नवीन वाटणारें तत्त्व कालांतरानें शिळें होऊन समाजव्यवहाराला नालायक होतें. त्याचे जागीं फिरून नवीन तत्त्व येऊन पूर्व-समाजांत क्रांति होते. अशा रीतीनें हा समाजपुरुष अडखळत अडखळत एक एक पाऊल पुढें टाकीत आहे. राजसत्ता, प्रातिनिधिक लोकसत्ता, राजसत्ता-लोकसत्ता यांचें मिश्रण इ. अनेक प्रयोग आजपर्यंत झाले. ते सर्व चुकीचे वाटल्यामुळें समाजसत्तेचें नवीन तत्त्व उदयास येऊन मानवी इतिहासांत नवीन प्रयोग सुरू झाला. या दीर्घकालीन पूर्व इतिहासावरून दिसून येणारी समाजाची विकासप्रवृत्ति लक्षांत घेतां असें दिसतें कीं, समाजसत्तावाद हा समाजेतिहासांत अखेरचा मोक्ष नाहीं. त्यापुढेंही अनेक पायऱ्या असाव्यात. परंतु असें असलें तरी समाजसत्तावादांतील शाश्वत स्वरूपाचीं तत्त्वें आत्मसात् करून त्यांचे पायावर पुढील समाजपद्धति उभी राहील अशीं तत्त्वें रशियन राज्यक्रांतींत आहेत.

**दोन टोकांमधील सुवर्णमध्य**

राष्ट्रांतील अथवा समाजांतील संपत्ति योगायोगामुळें आणि परंपरेनें कांहीं व्यक्तींच्या हातीं आली असली तरी वास्तविक दृष्टीनें ती समाजाच्या सामायिक मालकीची असते. बहुजनसमाजाला तिच्यापासून सुख आणि ऐश्वर्य मिळेल अशा रीतीनें या राष्ट्रीय संपत्तीचें उत्पादन, रक्षण, आणि वाढ झाली पाहिजे हें तत्त्व आज ना उद्यां समाज-व्यवहारांत मान्य होईल. तें किती प्रमाणांत मान्य होईल आणि या मान्यतेचें व्यावहारिक स्वरूप काय राहील यावर समाजशासनपद्धतीला डिमॉक्रसी, फॅसिझम् अथवा सोशालिझम् अशीं नांवें दिलीं जातील. सामाजिक संपत्तीवरील बहुजन समाजाच्या अधिकाराचें हें तत्त्व अमुक प्रमाणांत लोकशाही पद्धतींत

होतें आणि आहे. परंतु तें अमलांत आणण्याचें तंत्र (टेक्निक्) लोकशाहीला निर्माण करितां आलें नाहीं. स्वार्थी व्यक्तिस्वातंत्र्य आणि पक्षभेदात्मक समाज या साधनांवर आधारलेली लोकशाही अपेशी ठरली, म्हणून गेलेला तोल सांभाळण्याकरितां समाजसत्ता आणि पक्षभेदहीन केंद्रीभूत सत्ता या दुसऱ्या टोकाकडे युरोपियन समाज झुकला आहे. तारेवर कसरत करणारा कोलाटी तोल सांभाळण्याकरितां उजव्या डाव्या बाजूस क्रमाक्रमानें झुकला तरी अजाणतां त्याची प्रवृत्ति स्थिरमध्य साधण्याकडेच असते, त्याप्रमाणें युरोपच्या राजकारणांतही होईल. व्यक्तिस्वातंत्र्य, विचारविविधता आणि सामायिक संपत्तीचा बहुजनसमाजाचे सुखाकडे विनियोग, या तिन्हीं सुवर्णतत्त्वांचा एकाच पद्धतींत समन्वय करणारी समाजसत्ता स्थापन होण्याच्या भावी काळाला रशियानें आपल्या राज्यक्रांतीनें आवाहन केलें आहे असें आज दूरदृष्टीला दिसतें.

कम्यूनिझम् अथवा समाजसत्तावाद हिंदी मनोवृत्तीस मान्य होईल काय असा प्रश्न मनांत उभा राहतो. त्याला तात्त्विक दृष्टीनें 'होय' आणि व्यावहारिक दृष्टीनें 'नाहीं' अशीं दोन उत्तरें दिसतात. पाश्चात्य लोकांनीं राजकारणांत जितका विचार केला तितका विचार हिंदी लोकांनीं अध्यात्मक्षेत्रांत केला. त्यामुळें उभय समाज दोन निरनिराळ्या क्षेत्रांत आत्यंतिक तत्त्वाला पोंचलेले आहेत. जीवन आणि समाज यांचा विचार करीत "सर्व भूतस्थमात्मानं सर्व भूतानि चात्मनि" या उच्च अध्यात्मतत्त्वाचें शिखर हिंदी तत्त्वज्ञान्यांनीं गांठलें. याच विचारस्वातंत्र्याच्या प्रवृत्तीनें सामाजिक जीवनाचा विचार करून "राष्ट्राची अखिल संपत्ति समाजाच्या मालकीची असून सर्वसामान्य जनांना तिचा उपयोग झाला पाहिजे" या

आध्यात्मिक व भौतिक भूमिका

सामाजिक तत्त्वाचा कळस पाश्चात्य तत्त्वज्ञान्यांनीं गांठला. व्यक्तीचें आध्यात्मिक आणि भौतिक व्यक्तित्व सहस्रशीर्ष–अक्ष–हस्त–पाद असलेल्या समाजांत विलीन झालें पाहिजे हें सामान्य तत्त्व दोन्हीही तत्त्वज्ञानांचे मुळाशीं आहे. फरक इतकाच कीं, हिंदी तत्त्ववेत्ते तत्त्वाच्या टोंकास आहेत, पाश्चात्य तत्त्ववेत्ते व्यवहाराच्या टोंकास आहेत. हिंदी तत्त्ववेत्त्यांना आपल्या आध्यात्मिक तत्त्वाचें व्यावहारिक समाजरचनेंत रूपांतर करण्यास वेळ मिळाला नाहीं; पाश्चात्य तत्त्ववेत्त्यांना आपल्या सामाजिक तत्त्वज्ञानास वेदांताचें अधिष्ठान शोधून काढण्यास वेळ मिळाला नाहीं. स्वतंत्र भूमिकेवर विचार करीत करीत एकानें तत्त्व शोधून काढलें व एकानें व्यवहारपद्धति शोधून काढली.

आत्यंतिक ध्येयाचे दृष्टीनें कम्यूनिझममधील समाजपद्धति विचारी हिंदी मनोवृत्तीस कदाचित् मान्य होईल. परन्तु साधनांचे दृष्टीनें रशियन कम्यूनिझमचा हिंदी मनोवृत्तीशीं महत्त्वाचा विरोध येईल. अत्याचार आणि रक्तपात यांचा आधार घेऊन झालेली समाजक्रांति हिंदी मनोवृत्तीस मान्य होणार नाहीं. गेल्या सहा हजार वर्षांत अनेक गुंतागुंतीचे समाजप्रश्न हिंदुस्थाननें सोडविले, परंतु या सर्वांत क्रांतीपेक्षां उत्क्रांति आणि विकास या तत्त्वावरच त्यानें आपली भिस्त ठेविली आहे. क्रांतीच्या साधनांची छाया तद्भव समाजावर शतकानुशतकें पडलेली असते. अत्याचारानें निर्माण केलेला समाज अत्याचारानेंच टिकवावा लागेल.

इतर आक्षेप

अधोगतीस गेलेल्या धर्मविरुद्ध रशियानें केलेलें बंड योग्य आणि न्याय्य असलें तरी त्यानंतर स्वीकारलेली अनीश्वर वादाची आणि नास्तिक वादाची वृत्ति अध्यात्माचें माहेरघर असलेल्या हिंदु-

स्थानास मानवणार नाहीं. " यावज्जीवेत् सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत् । भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ॥ " या जडवादी तत्त्वाला हिंदुस्थानांत थारा मिळाला नाहीं. हिंदी तत्त्वज्ञानाशीं काडीमोड केलेल्या आमच्या शिक्षणसंस्थांतून बाहेर पडलेल्या पिढीला रशियन जडवाद दुरून पटला तरी अखेर मानवणार नाहीं. तिसरी गोष्ट, व्यक्तीच्या आध्यात्मिक आणि भौतिक जीवनाच्या सर्व क्षेत्रांवर समाजाचें वर्चस्व असावें ही गोष्टही हिंदुस्थानास पटणार नाहीं. समाजहिताचे दृष्टीनें योग्य ते अधिकार समाजाचे हवालीं व्यक्ति करील. परंतु या सीमेपलीकडे जाऊन समाजसत्तेनें व्यक्तित्व चुरडून टाकावें ही गोष्ट समाजाचे दृष्टीनें अनिष्ट आहे. वैयक्तिक स्वातंत्र्यानें समाजसंस्कृतीचा विकास होऊन तींत विविधता येते, आणि योग्य प्रमाणांत असलेल्या समाजसत्तेनें या संस्कृतीचें संरक्षण केलें जातें.

सारांश, आत्यंतिक ध्येयाच्या दृष्टीनें मतैक्य, परंतु साधनांचे दृष्टीनें मतभेद अशी विचारी हिंदी वृत्ति राहील. परंतु काळ असा

हिंदुस्थानला सावधानतेचा इशारा

आला आहे कीं केवळ अकरणात्मक वाद न घालतां विधायक विचार आणि योजना करून समाजशासनाचे कामीं हिंदुस्थाननें लागलें पाहिजे. आजचा स्वातंत्र्याचा प्रश्न हिंदुस्थान आज ना उद्यां सोडवील, हें आतां निश्चित आहे. परंतु स्वातंत्र्य हें साधन आहे, साध्य नाहीं. स्वातंत्र्यानंतर विधायक असा आमचा सामाजिक वेदांत काय आहे असा प्रश्न लौकरच उभा राहील. परकीय भांडवलसत्तेपासून पारतंत्र्यांतील हिंदुस्थानची मुक्तता होते न होते तोंच स्वदेशी भांडवलसत्तेचा दुसरा फांस या दुर्दैवी देशाच्या गळ्याभोंवती बसणार असेल, तर शेवटीं आगींतून सुटून फुपाट्यांत पडल्या-

सारखें वाटल्यावांचून राहणार नाहीं. पाश्चात्य देशांच्या औद्योगिक वाढीपासून बोध घेऊन हिंदुस्थाननें त्यांतील संकटें टाळून स्वतःची वाढ केली पाहिजे. समाजाच्या हिताचे आणि मालकीचे उद्योगधंदे स्वार्थी व्यक्तींच्या हातांत न जातां समाजाच्या हातीं राहतील, आणि त्यांचा उपयोग सामान्य जनांना लुबाडण्याकडे न होतां त्यांचें भौतिक आणि सांस्कृतिक सुख वाढविण्याकडे होईल अशी खबरदारी आजपासूनच घेतली पाहिजे. वाढलेले उद्योगधंदे खासगी व्यक्तींच्या हातांत जाऊन तेथें मिरास उत्पन्न झाली म्हणजे पाश्चात्य देशांत जसा भांडवलवाले व कामगार यांचा कलह अक्षय्य चालू आहे तसा हिंदुस्थानांत चालू होईल, आणि हरघडी कम्यूनिझमचा बागुलबोवा वाटून देशांत सारखी यादवी माजून राहील. जगांतील विचारप्रवाह लक्षांत घेऊन, दूरवर नजर टाकून, आणि भावी परिस्थितीचें आकलन करून जर आम्हीं आपली समाजघडी बसविली तर त्यांत दूरदर्शीपणा आहे.

रशियांतील सर्व देखावा पाहून प्रेक्षक जेव्हां स्वतःचे मनाशीं शांततेनें विचार करूं लागतो तेव्हां त्याला असें वाटतें कीं, मी स्वतः कम्युनिस्ट नाहीं, पण कम्यूनिझममध्यें भिण्यासारखें असें कांहीं नाहीं. प्रत्येक समाजानें आपल्या परिस्थितीच्या व मनोवृत्तीच्या दृष्टीनें त्याच्या औचित्याचा व युक्तायुक्ततेचा विचार करून त्यांतील चांगलीं तत्त्वें आपल्या सामाजिक वेदांतांत कशीं घेतां येतील याचा विचार करणें प्राप्त आहे. जेथें गोरगरिबांना पुरेसें अन्नवस्त्र मिळतें, जेथें श्रम करणाराच्या मुलाबाळांना त्यांच्या नैसर्गिक प्रवृत्तीप्रमाणें शिक्षण मिळतें, जेथें रंकालाही सर्व वैद्यकीय साधनें उपलब्ध आहेत, जेथें साहित्य–संगीत–कला सर्वांच्या आटोक्यांत आणण्याचा प्रयत्न केला जातो, अशा प्रकारचा समाज आजपर्यंत स्वर्गनंदनवनांची

सुखस्वप्नें निर्माण करणाऱ्या कवींच्या प्रतिभेंतच होता, तो आज मूर्त स्वरूपांत आणि आपल्या डोळ्यांपुढें या पिढींत विकास पावत आहे. आपापल्या परंपरा, मनोवृत्ति आणि जीवनध्येय यांशीं सुसंगत अशा साधनांनीं वरील आदर्श समाज निर्माण करणें हेंच प्रत्येक समाजाचें अंतिम ध्येय आहे.

---



विभाग तिसरा

# जर्मनी, इंग्लंड, व इटली : पुराण संस्कृतींचें संरक्षण

प्रकरण सोळावें

## पराभूत जर्मनींत राष्ट्रतेजाचा उगम कसा झाला ?

"हाईल् हिट्लर" म्हणून खांद्यापर्यंत हात उचलून सलाम करणारे लष्करी पोषाखांतील जर्मन विद्यार्थी बर्लिन विश्वविद्यालयांत

सर्वत्र लष्करी वातावरण

पाहिले म्हणजे चुकून आपण युनिव्हर्सिटीचे ऐवजीं मिलिटरी ॲकॅडेमींत आलों आहोंत कीं काय असें नवख्या माणसाला वाटतें. गुडघ्यापर्यंत लष्करी थाटाचा वजनदार बूट, पोकळ मांड्याच्या विजारी, खांद्यावर कातडी पट्टा, दंडावर स्वस्तिक चिन्ह, कमरेवर तरवार, कट्यार अथवा दुसरें एखादें हत्यार, आणि डोक्यावर लष्करी थाटाची टोपी—अशा प्रकाच्या पोषाखांनीं सर्व जर्मन राष्ट्र सज्ज झालें आहे. कॉलेजांत, रस्त्यावर, ऑफिसांत, सभेंत, कोठेंहि जा, लष्करी थाटाच्या सरंजामाचीं माणसें प्रत्येक ठिकाणीं किती तरी दिसतील. रस्त्यावर एक घटकाभर फिरणाराला स्वस्तिक चिन्हांकित निशाणें फडकावीत, रपूरप् करून पाय आपटीत जाणाऱ्या दोनतीन पलटणी तरी सहज दिसतील. आठ वर्षांच्या लहान मुलापासून तों पन्नास वर्षांच्या वयस्क माणसापर्यंतच्या बहुतेक व्यक्तींवर खाकी पोषाख चढलेला आहे. रस्त्यांतून सहज चालणारीं दोन मुलें पाहिलीं, तरी तीं लष्करी तालावर एक दोन—एक दोन करीत चाललेलीं दिसतात. रविवारच्या दिवशीं तर या लष्करी देखाव्याला ऊत आल्यासारखा दिसतो.

जिकडे तिकडे पडघमूचे आवाज ऐकूं येतात आणि खाकी पोषाखां-तील अरुण—तरुण—वरुणांच्या पलटणी स्वस्तिक निशाणें घेऊन चर्चमधून बाहेर पडत असलेल्या दिसतात. जनसमुदायाकडून वस्तु-समुदायाकडे दृष्टि टाकावी तरी विषय तोच. कपड्यांचीं दुकानें पाहिलीं तर त्यांत आबाल-वृद्धांचे लष्करी पोषाख विक्रीस मांडलेले आहेत. विमानांचा हल्ला आला तर संरक्षण कसें करावें याचीं प्रद-र्शनें ठिकठिकाणीं दुकानांतून मांडलेलीं असून विषारी धुरापासून बचाव करण्याचीं साधनें विक्रीस ठेवलेलीं आहेत. "विमानी हल्ल्या-पासून संरक्षण करणें हें राष्ट्रीय कर्तव्य आहे." अशा अर्थाच्या म्हणी रस्त्यावर आडव्या टांगलेल्या ठिकठिकाणीं दिसतात.

सायंकाळच्या शांत वेळीं फिरावयास जावें तरी तोच देखावा. ज्याला ज्याला म्हणून वीसपंचवीस पोरें मिळतील तो त्यांना घेऊन मिळेल त्या मैदानावर अथवा आड जागेच्या बखळींत जातो आणि या तरुणांना लष्करी कवायत, दौड इ. शिकवीत असतो.

जर्मन लोकांचे आजचे विचार तरी काय आहेत, म्हणून पुस्तक विक्रीच्या दुकानांत जाऊन क्षणभर ग्रंथांवरून नजर फिरवावी. हिटलरचें चित्र मुखपृष्ठावर असलेलीं निदान दहाबारा पुस्तकें त्यांत दिसतील. शिल्लक राहिलेल्या इतर पुस्तकांचे विषय पाहिले तर वंशविद्या (Rassenkunde) आणि लष्करी विद्या या विवेचनाचे ते ग्रंथ असावेत असा सहज तर्क होतो. सिनेमा पाहिला तरी मुख्य चित्रपटाचे पूर्वी अथवा नंतर हिटलर व नात्झी सैन्य यांचा एकादा प्रसंग आणि एकादें भाषण याशिवाय कार्यक्रम पूर्ण होत नाहीं. सारांश, आजच्या जर्मनींत जिकडे तिकडे लष्करी तेज आणि राजकारण यांचा संचार झालेला आहे. या देशांतून प्रवास करणाराला असें वाटतें कीं, जर्मनी हा युद्धांत गुंतलेला एक देश असावा.

यूरोपला पुन्हां युद्धाचे डोहाळे होऊं लागावेत यांत आश्चर्य नाहीं. एका युद्धांतून दुसरें युद्ध उत्पन्न होतें. गेल्या महा-

हिंदुस्थान व जर्मनी

युद्धानंतर जेत्या राष्ट्रांनीं पराभूत जर्मनीवर जो तह लादला त्यानें भावी युद्धाचें बीं पेरून ठेविलें. तपशील सोडून दिल्यास कांहीं अंशानें जर्मनीची आणि हिंदुस्थानची परिस्थिति सारखीच आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. १८५७ च्या आंदोलनानंतर हिंदी जनतेला कायमचें निःशस्त्र करून ब्रिटिश साम्राज्यानें हिंदुस्थानवर राजकीय व आर्थिक सत्ता चालविली. त्याच चालीवर महायुद्धानंतर जर्मनीला निःशस्त्र करून तिच्यावर सत्ता चालविण्याचा प्रयत्न जेत्या राष्ट्रांनीं केला. हिंदुस्थानचा व्याप. आणि विविधता यामुळें येथें जागृति होण्यास विलंब लागला. परंतु महायुद्धानंतर अवघ्या चौदा वर्षांत जर्मनीमध्यें जागृति झाली आणि पराभवानें झालेल्या अपमानाचें परिमार्जन करण्याच्या मार्गास तो लागला.

हिटलरसारख्या रानवट पुढाऱ्याच्या मागें जर्मनीसारखें सुसंस्कृत राष्ट्र कां जातें याचें प्रथम प्रथम आश्चर्य वाटतें. परंतु

महायुद्धानंतरची वजबजपुरी व गोंधळ

महायुद्धोत्तरची जर्मन परिस्थिति पाहिली म्हणजे या प्रश्नाचें उत्तर मिळतें. व्हर्सायच्या तहामुळें जर्मनीवर आर्थिक बोजा प्रमाणाबाहेर पडला आणि तशांत दुष्काळ अथवा व्यापारमंदीचीं लागोपाठ तीन चार वर्षें आलीं. युद्धानंतर जर्मनींत लोकशाही स्थापन झाली, परंतु या राज्यव्यवस्थेंत पक्ष आणि उपपक्ष यांची संख्या इतकी वाढली कीं, कोणत्याहि एका पक्षाला राज्यकारभार व्यवस्थितपणें हांकतां येईना. निवडणुकीचे दिवस म्हणजे मारामारी, दंगल, आणि खून यांचे प्रसंग अशी परिस्थिति झाली होती. जर्मनी-

तील शिक्षण पद्धतीमुळें केवळ पुस्तकी शिक्षण घेऊन बाहेर पडलेले असंख्य पदवीधर कामधंदा न मिळाल्यामुळें बेकार होऊन रस्तोरस्तीं हिंडूं लागले. "डॉक्टर ऑफ फिलॉसफीलाही" किंमत राहिली नाहीं, इतके डॉक्टर बाहेर पडले. या मध्यम वर्गांत चालू राज्यपद्धतीबद्दल असंतोष उत्पन्न झाला होता.

कामकरी वर्गाची बेकारी इतर राष्ट्रांप्रमाणें जर्मनींतही पसरलेली होती. अशा प्रकारच्या आर्थिक परिस्थितींत व्हर्साय तहाच्या अपमानाची भर पडली. लष्करी शिस्तींत दोन शतकें वाढलेल्या जर्मन राष्ट्राला जेत्या राष्ट्रांनीं सक्तीनें निःशस्त्र केलें याची जाणीव सुप्त स्वरूपानें जर्मन राष्ट्रांत होती. त्याचप्रमाणें अन्यायानें केलेली जर्मन प्रांतांची विभागणी हें शल्यही लोकांच्या मनांत डांचत होतें.

अशा वेळीं या परिस्थितींतून देशाला वर काढणारा पुढारी जर्मनीला पाहिजे होता. हिटलर रानवट आणि मुत्सद्देगिरीवजा आहे हें लोकांना समजत होतें. पण 'माझ्या हातीं सत्ता द्या, एका क्षणांत जर्मनीची स्थिति सुधारून दाखवितों' असें छातीवर हात मारून सांगणारा दुसरा पुढारी जर्मनींत नव्हता. त्यामुळें हिटलरला संधि द्या, निदान आहे त्यापेक्षां तरी परिस्थिति वाईट होणें शक्य नाहीं अशा वृत्तीनें जर्मन राष्ट्रांनीं हिटलरला आपला पुढारी केलें, आणि एप्रिल १९३३ पासून जर्मन राष्ट्रांत नवीन क्रांतीला प्रारंभ झाला.

विद्यमान आपत्तींतून बाहेर पडण्याकरतां जर्मनीनें हिटलरला मूर्धस्थानीं नेमल्याबरोबर हिटलरनें आपल्या कल्पना आणि तत्त्वें समशेरीच्या जोरावर जर्मन राष्ट्राच्या गळीं उतरविण्याचा कार्यक्रम आरंभला. सामान्य जनतेच्या मनाची पारख करून, त्यांना पटतील अशा चार सोप्या गोष्टी सांगून, त्याचबरोबर आपलीं चार

**हिटलरचें धोरण**

बरीवाईट मतें सांगितलीं म्हणजे दोन्हींही गोष्टी लोकांच्या गळीं उतरतात, आणि प्रथम जनतेला न पटणारें तत्त्व वारंवार कानावर आदळल्यानें आणि पुनरुक्तीनें आपोआप स्वीकारलें जातें अशी हिटलरची विचारसरणी आहे. जर्मनी पुनः सामर्थ्यवान् व्हावयाचा असेल तर राष्ट्रांत ऐक्य उत्पन्न झालें पाहिजे, आणि पराभवामुळें उत्पन्न झालेली कनिष्ठत्व भावना धुवून काढली पाहिजे, या गोष्टी हिटलरनें ओळखून त्यावर आपली इमारत उभारली आहे.

**ज्यू द्वेषाची मीमांसा**

महायुद्धांत पराभव झाला तो जर्मनीच्या दुर्बलपणामुळें किंवा शत्रूच्या सामर्थ्यामुळें झाला नसून लोक युद्धांत गुंतले असतां मार्क्सिस्ट लोकांनीं बंड करून घरभेद केला म्हणून जर्मनी हरला, नाहीं तर तो यशस्वी झाला असता हें नवीन तत्त्व वारंवार ठांसून सांगून त्यानें लोकांना पटवून दिलें. लोकांत एकी करावयाची असेल तर एखादा शत्रू उत्पन्न केला पाहिजे. असा शत्रू आज परदेशांत उत्पन्न केला तर जर्मनीची युद्धाची तयारी नाहीं. म्हणून देशांतील मार्क्सिस्ट आणि ज्यू लोक जर्मनीचे शत्रू आहेत असें लोकांना भासवून त्यानें ऐक्य साधण्याचा प्रयत्न केला. आधींच शतकानुशतकें ख्रिस्ती आणि ज्यू लोकांचें हाडवैर, तशांत कार्ल मार्क्स स्वतः ज्यू, आणि त्याच्या अनुयायांत ज्यूंचा भरणा अधिक, अशा दोन्ही गोष्टींची सांगड जमल्यानें ज्यू लोकांविरुद्ध जर्मनींत अडाणी जनता चेतविण्यास वेळ लागला नाहीं. ज्यू लोकांविरुद्ध असलेला स्वतःचे मनांतील द्वेष जनतेवर लादून या लोकांची देशांतून कायमची हकालपट्टी करण्याकरितां हिटलरनें आपलें वंशशुद्धीचें तत्त्वज्ञान निर्माण केलें. जर्मन लोक शुद्ध आर्यन आणि नॉर्डिक वंशाचे असून ही शुद्धता राखण्याकरितां त्यांना सेमिटिक (म्हणजे ज्यू) लोकांपासून अलिप्त ठेवलें

जर्मनीतील नाझी चळवळीचे दोन आधारस्तंभ



पुढारी हिटलर व प्रचारखात्याचा प्रधान गोबेल्स

इटालियन मुलांचें लष्करी शिक्षण बालवयांतच सुरू होतें



बॅलिरला संघांतील मुलें मशीन-गन्सचें शिक्षण घेत आहेत.

पाहिजे. कारण नॉर्डिक वंश हा तेजस्वी आणि कर्तबगार असून इतर वंशांशीं त्याची भेसळ झाल्यास ही कर्तबगारी आणि तेज नष्ट होईल. जर्मन संस्कृति जगांत श्रेष्ठ आहे, कारण ती एकवंशीय समाजानें निर्माण केली आहे. यापुढें जर्मन संस्कृति श्रेष्ठ ठेवावयाची असेल तर जर्मन वंशाची शुद्धता राखली पाहिजे. अशा रीतीनें वंश-शुद्धता आणि संस्कृतिश्रेष्ठत्व या तत्त्वांच्या गोंडस नांवाखालीं हिटलरनें आपला ज्यूविषयींचा द्वेष शास्त्रशुद्ध केला.

राष्ट्रांत एकजूट व लष्करी वृत्ति

राष्ट्रांत एकी करून पूर्वींप्रमाणें लष्करी तेज निर्माण करण्या-करितां या वृत्तीला प्रतिकूल असलेल्या सर्व तत्त्वांचें आणि प्रश्नांचें खंडन करणें जरूर होतें. म्हणून वर्गकलहाचे तत्त्वावर उभारलेल्या कम्यूनिझमविरुद्ध मोहिम करून त्यानें राष्ट्रैक्याच्या भावनेवर जोर दिला; त्याचप्रमाणें पक्षोपपक्षांवर आधारलेल्या लोकशाहीच्या तत्त्वाविरुद्ध झोड उठवून " एक पक्ष, एक पुढारी, आणि एक जनता " या मंत्राची सारखी घोषणा करून सर्व लोकांना " Ja या " ( होयबा ) म्हणण्यास भाग पाडलें. युद्धास कंटाळलेल्या युरोपमध्यें गेल्या पंधरा वर्षांत जो शांततावाद उत्पन्न झाला त्यानें जर्मनींतही प्रवेश केला होता. हा शांततावाद लष्करी तेजोत्पादनाला प्रतिकूल आहे असें ओळखून हिटलरनें शांततावादी व्यक्ती आणि संस्था यांचेवर आपली करडी नजर फिर-विली आणि त्यांची वाचा बंद केली. व्यक्तिस्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्य, लेखनस्वातंत्र्य, आणि भाषणस्वातंत्र्य यांमुळें एकमुखी सत्तेचा भंग होतो म्हणून या सर्व स्वातंत्र्यांवर पडदा पाडण्यांत आला. आणि समाजव्यवहारांत स्त्रिया पुरुषांचे बरोबरीनें पडल्यास पुरुषांत स्त्रैण्य

येऊन त्यांचें लष्करी तेज नाहींसें होईल या भीतीनें त्यानें स्त्रियांना पूर्ववत् माता आणि पत्नी याव्यतिरिक्त इतर क्षेत्रांतून दूर केलें.

सारांश, जर्मनीचें ऐक्य आणि तिचें राष्ट्रीय पुनरुज्जीवन या सात्त्विक ध्येयाला हिटलरनें आपल्या वर्णद्वेषाच्या आणि आकुंचित मताच्या तामसी ध्येयांची जोड देऊन त्यांतून एक गंगाजमनी आणि विसंगत असें तत्त्वज्ञान उत्पन्न करून तें राष्ट्राच्या गळीं उतरविलें. हिटलरशिवाय दुसरा पुढारी नसल्यामुळें, या दोन्हीं गोष्टींचा नाइलाज म्हणून स्वीकार करणें जर्मन राष्ट्राला भाग पडलें. वाळल्याबरोबर ओलेंही जळतें या न्यायानें चांगल्या-वाईट दोन्ही तत्त्वांची सांगड जर्मन राजकारणांत झाली असली तरी कालांतरानें त्यांतील तामस भाग आपोआप गळून जाऊन फक्त सात्त्विक भाग राहील इतका चांगुलपणा जर्मन संस्कृतींत आहे असें मानण्यास हरकत नाहीं.

चांगल्याबरोबर वाईटही खपतें

अंगावर जबाबदारी पडली म्हणजे विवेक आणि समंजसपणा आपोआप अंगीं येऊं लागतो या तत्त्वानुसार हिटलरच्या स्वभावांतही फरक पडत जाईल असें वाटतें. इटलीचा मुसोलिनी प्रथम अधिकारावर आला त्या वेळीं त्यानेंही हिटलरप्रमाणेंच धोरण स्वीकारलें होतें. परंतु व्यवहारांत पडल्यानंतर त्याचे अगचा मूळचा हिरवटपणा जाऊन आज मुसोलिनी जगांतील एका प्रमुख राष्ट्राचा मुत्सद्दी होऊन बसला आहे. जर्मन लोकच सांगतात कीं, प्रारंभींचा हिटलर आज राहिला नाहीं. जबाबदारी अंगावर पडल्याबरोबर त्याचा पूर्वींचा अविवेकी आवेश नाहींसा होऊन तो आतां जपून पाऊल टाकूं लागला आहे. तरी पण चळवळींतील आधारभूत तत्त्वांवरील त्याची निष्ठा तिळमात्रहि कमी झालेली नाहीं.

## प्रकरण सतरावें

# नाझींची कार्यपद्धति आणि हिंदुस्थानला बोध

स्वतःच्या राजकीय आणि राष्ट्रीय तत्त्वज्ञानाची निश्चितता केल्यानंतर ती व्यवहारांत आणण्याकरितां हिटलर पक्षानें जीं साधनें

एकतंत्री सत्तेचा मार्ग

अंमलांत आणलीं त्यांत त्यानें रशियन आणि इटालियन राज्यक्रांतीच्या साधनांचीच नक्कल केली. पहिली गोष्ट म्हणजे या पक्षानें एकतंत्री सत्ता स्थापन करून सर्व अधिकार आपले हातांत घेतले. आपल्या विरुद्ध असलेल्या पक्षांचा आणि व्यक्तींचा अत्याचारानें आणि हातीं येतील त्या साधनांनीं निःपात करून टाकला. नाझी पक्षाला शत्रुवत् वाटणारे लोक म्हणजे कम्यूनिस्ट आणि ज्यू. या लोकांच्या पुढाऱ्यांना एक तर कैदेंत जावें लागलें (कॉन्सेंट्रेशन कॅंप्स) किंवा देशांतर तरी करावें लागलें. आपल्या पुढाऱ्यांना कम्यूनिस्ट आणि ज्यू लोक नकोत अशी नाझी अनुयायांची खात्री झाल्याबरोबर त्यांनीं आपल्या हातांत अधिकार घेऊन, आपल्या खाजगी भांडणांचा आणि व्यक्तिसंबंधाचा सूड उगविण्याकरितां जर्मन संस्कृतीस काळिमा लावण्यासारखे अत्याचार केले, आणि पुढाऱ्यांनीं त्यांकडे दुर्लक्ष केलें. काल्पनिक अंतःस्थ शत्रूंचा याप्रमाणें बीमोड केल्यानंतर स्वतःची सत्ता दृढ करण्याकडे आणि सर्वसामान्य जनतेची निष्ठा संपादन करण्याकडे नाझी पक्षानें आपलें लक्ष वळविलें. प्रथम त्यांनीं सर्व वर्तमानपत्रें काबीज केलीं. विविध मतांच्या सर्व वृत्तपत्रांचे चालकांवर आपल्या पक्षाचा एकेक अधिकारी नेमून त्याचे एकरंगी पडद्यांतून सर्व बातम्या आणि मजकूर जावा अशी योजना केली. जर्मन भाषा न समजणाऱ्यानें जर्मन नागरिकाला विचारावें—'वर्तमानपत्रांत आज मजकूर काय आहे?' यावर तो उत्तर

देतो कीं, 'नवीन कांहीं नाहीं. त्याच त्याच बातम्या, तींच तींच भाषणें.' सर्व बातम्या सेन्सॉर होत असल्यामुळें खुद्द जर्मनींत काय चाललें आहे हें त्या देशांत राहणाऱ्या माणसाला परदेशांतील पत्रें वाचल्याशिवाय समजत नाहीं. जनतेची निष्ठा संपादन करण्याकरितां त्यांना सक्तीचें राजकीय शिक्षण दिलें जातें. हिटलरचें अथवा प्रमुख पुढाऱ्याचें भाषण असेल त्या वेळीं कारखान्यांना सुटी देऊन सभेच्या ठिकाणीं त्यांची हजेरी ठेविली जाते. त्यामुळें इच्छा असो अगर नसो कानांवरून चार राजकीय मतें हटकून जातात. सक्तीची ही वृत्ति अधिक थराला गेल्यास लोकांत कुतूहलापेक्षां उपहासाची प्रवृत्ति उत्पन्न होते. ता. १२ नोव्हेंबर रोजीं हिटलरचें भाषण झालें. या वेळीं सर्व समाज–व्यवहार बंद ठेवण्यांत येऊन प्रमुख थिएटरें, हॉटेलें, ग्रंथसंग्रहालयें, सभागृहें इत्यादि ठिकाणीं रेडिओवर तें भाषण ऐकण्याकरितां सभांची व्यवस्था केली होती. त्या वेळीं हॉटेलमधून भोजनहि वाढलें जाऊं नये अशी शिफारस करण्यांत आली होती.

हिटलरचें वक्तृत्व

हिटलरच्या वक्तृत्वाची फार स्तुति करतात. पण त्यांत एका आवेशाशिवाय दुसरा गुण नाहीं. जर्मन भाषा स्वाभाविक जोरदार आणि ठसकेबाज आहे. त्यांतून सूड सूड, हाणा, मारा, ह्या सुरावर एखादा भाषण करूं लागला म्हणजे तर या भाषेला अधिकच जोर चढतो. हिटलर आपल्या भाषणाला सावकाश आणि संथपणें हलक्या आवाजांत आरंभ करतो. आवेशाचा एखादा मुद्दा येतो तसतसा अवाज हलके चढवून, मोठ्या आवाजांत वाक्याचा शेवट करून तो पुन्हां एकदम आवाज खालीं आणतो. तो आवेशांत येतो तेव्हां लांबलांब रचनेचीं वाक्यें करून जोरानें ठासून आणि स्पष्ट बोलतो. कांहीं कांहीं वेळ तर घसा खरडून आणि कर्कशपणें ओरडून वाक्या-

वर कळस चढवितो. शब्दाकरितां कधीं अडखळत नाहीं. पाठांतर केल्याप्रमाणें वाक्-प्रवाह बाहेर पडत असतो. याच पद्धतीची पुनरावृत्ति दर पांचसहा मिनिटाला, याप्रमाणें एकसारखी होत असते. अवेशाव्यतिरिक्त विनोद, मार्दव, हास्य, उपहास इत्यादि भावनांची त्यांत विविधता नाहीं.

पद्धतशीर मतप्रचार

नाझी मताविरुद्ध अन्य मताला डोकें वर काढण्याला आज संधि नाहीं. स्वतंत्र सभा करून अथवा वृत्तपत्रद्वारां मतप्रदर्शन करणें शक्य नाहीं, एवढेंच नव्हे तर खाजगी भाषणांतहि अगदीं जिवलग आणि विश्वासांतील व्यक्ति असल्याशिवाय स्पष्टपणें बोलण्याची जर्मन नागरिकाला सोय नाहीं. विरुद्ध मताची नाकेबंदी जितक्या बेमालूमपणें केली आहे तितक्याच मोकळेपणानें आणि पद्धतशीरपणानें स्वतःच्या मतांचा प्रसार करण्याचें कार्य नाझी पक्षानें चालविलें आहे. मतप्रचाराकरितां ( Propaganda Minister ) स्वतंत्र प्रधान नेमलेला असून उपलब्ध अशा सर्व साधनांनीं त्याचें कार्य चालू असतें. नाझी तत्त्वें जर्मन लोकांच्या नजरेपुढें आणि अंतःकरणांत सदैव कशीं राहतील या दृष्टीनें मतप्रचार-प्रधानांचें काम फार सुसंघटितपणें चालू असतें. रोज नवीन नवीन जाहिराती भिंतीवर प्रसिद्ध होत असतात. रेडियोवर भाषणें, सिनेमांतून भाषणें आणि प्रसंग, रस्त्यांतून नाझी सैन्याच्या आणि नाझी बालचमूंच्या एकसारख्या मिरवणुकी इ. अनेक साधनांनीं मतप्रचाराचा नुसता पाऊस पडत असतो. लोकांच्या कानीं कपाळीं एकसारखें ओरडा म्हणजे वाटेल त्या तत्त्वावर लोकांचा विश्वास आपोआपच बसेल असें नाझी मानसशास्त्र आहे. त्यांचा भर तर्कपद्धतीपेक्षां पुनरावृत्तीवर अधिक आहे.

या चळवळींत आबालवृद्ध स्त्रीपुरुषांना सर्वांना गोवण्या-

करितां सर्वाकर्षक आणि व्यापक असा कार्यक्रम आखलेला आहे.

राजकारणांतील सगुणभक्ति व परंपरा

आठ वर्षांच्या लहान मुलांपासून तों पन्नास वर्षांच्या वयस्क माणसांपर्यंत सर्व नागरिक हळूहळू नाझी मताचे कसे होतील या दृष्टीनें हिटलर पक्षानें केलेली संघटना अत्यंत मननीय आहे. मानवी मानसशास्त्राचे नियम नकळत जाणून त्यांचा व्यावहारिक उपयोग या संघटनेंत केला आहे. साधारणपणें लहान मुलांना, तरुणांना आणि पुष्कळ वयस्क माणसांनाही लष्करी पोषाखाची आणि थाटाची आवड असते. या मनोवृत्तीचा उपयोग करून नाझी पंथानें निरनिराळ्या प्रकारचे लष्करी पोषाख निरनिराळ्या वयांच्या आणि दर्जांच्या लोकांकरितां ठरवून टाकले आहेत. नाझी पक्षाची विशिष्ट सलामी ( हात पालथा करून स्वर्गाकडे नेणें ) " हाईल् हिटलर, " त्याचें स्वस्तिक चिन्हांकित निशाण, रस्त्यानें दौड करतांना म्हणण्याचीं लष्करी गाणीं इ. सर्व गोष्टी सामान्य माणसाला आवडणाऱ्या अशा आहेत. लहान मुलांपासून वयस्कांपर्यंत प्रत्येकानें राष्ट्राकरितां काय काय करावयाचें त्या गोष्टी ठरवून टाकलेल्या आहेत. त्यामुळें देशभक्ति ही निव्वळ तात्त्विक स्वरूपाची न राहतां गोरगरिबांकरितां फंड जमा करण्यापासून तों सर्व वेळ नाझी पक्षांत काम करण्यापर्यंत सर्व कार्यक्रमाचा तींत समावेश झालेला आहे. रशिया, इटली आणि जर्मनी यांनीं राजकीय मतें आणि कार्य यांचे प्रसाराच्या दृष्टीनें केलेल्या सामाजिक संघटना एकाच प्रकारच्या असून त्यापासून हिंदुस्थानलाहि स्वतःची विधायक घटना करण्यास उपयुक्त चालना मिळू शकेल. कोणत्याही चळवळीचीं अंतिम ध्येयें कितीही चांगलीं असलीं तरी तीं सामान्य जनांच्या बुद्धीच्या टप्प्याबाहेर असतात. लोकांना सगुणभक्ति पाहिजे

असते. त्याकरितां मूर्त स्वरूपांतील प्रतीकें तयार करणें आणि प्रत्येक व्यक्तीला तिच्या दर्जाप्रमाणें निश्चित कार्य आंखून देणें जरूर असतें. या योगानें राजकीय तत्त्वज्ञानाची आणि कार्याची परंपरा वयस्क पिढीपासून तरुण पिढीपर्यंत अव्याहत राहते.

आपल्या तत्त्वांना समाजशासनांत मूर्त स्वरूप देण्याकरितां नाझी पक्षानें कायदा आपल्या हातांत घेतला असून स्वतःच्या मताप्रमाणें त्यांत फेरबदल केला आहे, किंवा करण्याचें काम चालू आहे. हे सर्व कायदे विशेषतः ज्यू आणि कम्यूनिस्ट लोकांविरुद्ध आहेत हें सांगण्याची जरूरी नाहीं. या लोकांना सरकारी नोकऱ्या मिळणें शक्य नाहीं किंवा वकील डॉक्टरी इ. धंदा चालवितां येणार नाहीं. वंशशुद्धीच्या दृष्टीनें दोनतीन नवीन कायदे झाले आहेत. त्या कायद्यान्वयें जर्मन लोकांना आपल्या वंशाव्यतिरिक्त ( Race ) इतरांशीं विवाह करितां येणार नाहीं.

नवीन कायदे

जर्मन लोक आपल्या संस्कृतिबद्दल इतके प्रसिद्ध असतां ते या आकुंचित पायाच्या चळवळीला कसे सामील झाले असा प्रश्न उत्पन्न होतो. जर्मन शिक्षणपद्धतीनें विद्वान् लोक निर्माण होतात हें खरें, परंतु ही विद्वत्ता एका क्षेत्रापुरती मर्यादित असल्यानें सामाजिक आणि राजकीय दृष्टीनें स्वतंत्र विचार करणारे लोक कमी. या पंडितांची वृत्ति नेहमीं प्रचलित सत्तेपुढें मान वाकविणें आणि येईल त्या राजसत्तेचें अभीष्ट चिंतणें अशी राहते. त्यांतून जे स्वतंत्र विचाराचे होते त्यांनीं देशांतर केलें अथवा आज बोलण्याची वेळ नाहीं असें म्हणून ते मूग गिळून स्वस्थ बसले. शाळा, कॉलेजें आणि ग्रंथालयें यांच्या शांत वातावरणांत बनलेलें ठिसूळ तत्त्वज्ञान व्यवहाराच्या

पंडित आणि सामान्य जन यांतील वृत्ति

कणखर वातावरणांत टिकाव धरूं शकत नाहीं. विद्या आणि व्यवहार यांची याप्रमाणें फारकत झालेली असल्याकारणानें हिटलसारखे पुढारी पुढें येतात आणि विद्वानांच्या डोळ्यांदेखत राष्ट्राचा कान धरून त्याला मन मानेल तिकडे नेतात. ही झाली सुसंस्कृत लोकांची गोष्ट. सामान्य जनवृत्तीचा वर उल्लेख केलाच आहे. "हिटलर आला आहे, काय करतो तें पाहूं या तर खरें; संधी द्यायला हरकत नाहीं." अशा उदासीन वृत्तीचे सामान्य लोक आहेत. महायुद्धापर्यंत दोन शतकें जर्मन लोक लष्करी वातावरणांत शिस्तींत आणि हुकमतींत वाढलेले; व्यक्तिस्वातंत्र्य आणि मतभेद यांतून मार्ग काढण्यापेक्षां हुकमानें चालण्याची संवय त्यांना अधिक. युद्धानंतर सुटलेला हा लष्करी शिस्तीचा धागा हिटलरनें सांधून दिला. त्याकारणानें जर्मन लोकांना आपले पूर्वींचे सुवर्णदिन आल्यासारखे वाटतात. सारांश, जर्मनीचें राष्ट्रीयत्व आणि लष्करी तेजारोपण या दोन गोष्टी लोकांना प्रमुखपणें पटणाऱ्या; बाकीच्या गोष्टी नाइलाज म्हणून त्यांनीं मुकाट्यानें स्वीकारल्या आहेत.

हिटलर स्वतःला नॅशनल सोशालिस्ट म्हणवतो, परंतु सोशालिझमचे दृष्टीनें विधायक असा त्याचा कार्यक्रम बाहेर पडलेला नाहीं किंवा तसा कांहीं आहे असें त्याच्या अनुयायांच्या बोलण्यावरून दिसत नाहीं. जर्मनीच्या चळवळीकडे चिकित्सक दृष्टीनें पाहिलें म्हणजे त्यांतील कांहीं ध्येयांबद्दल सहानुभूति वाटते, परंतु नाझी पक्षानें स्वीकारलेल्या साधनांकडे आणि आकुंचित तत्त्वांकडे पाहिलें म्हणजे त्याबद्दल तिटकारा वाटतो. युद्धोत्तर झालेल्या परिस्थितींतून वर येऊन जर्मन राष्ट्र इतर प्रमुख राष्ट्रांच्या तोडीस येऊन बसावें आणि जर्मन संस्कृतीचें वैशिष्टय कायम राहून ती वाढीस लागावी, या ध्येयाबद्दल कोणालाहि आदर

नाझी चळवळीवर आक्षेप

वाटेल, परंतु या ध्येयाच्या सिद्धीप्रीत्यर्थ वर्णभेदाचें आणि सुलतानी वृत्तीचें धोरण स्वीकारणें अवश्य होतें कीं काय असा प्रश्न मनांत उत्पन्न होतो. विरुद्ध पक्षाचे लोकांना दडपून टाकण्याकरितां नाझी पक्षानें स्वीकारलेले मार्ग सुसंस्कृत समाजास शोभणारे नाहींत. आणि ज्यू लोकांविरुद्ध स्वीकारलेलें धोरण फाजील आत्मप्रौढीचें आणि अन्यायाचें आहे. शतकानुशतकें आणि पिढयानुपिढया जे यहुदी लोक जर्मनींत राहिले आहेत त्यांचा जर्मनींत राहून जीवनक्रम कंठण्याचा हक्क इतर जर्मन लोकांइतकाच आहे. स्वार्थी आणि देशद्रोही लोकां-बरोबर कांहीं यहुदी लोकांना शासन करणें निराळें आणि केवळ यहुदी लोकांना अचूक निवडून काढून त्यांच्यावर कहर उठवून देणें निराळें. वर्णभेदाच्या या वृत्तीच्या समर्थनार्थ आर्यन् आणि नॉर्डिक वंश-श्रेष्ठतेचें शोधून काढलेलें तत्त्वज्ञान इतिहासाच्या आणि समाज-शास्त्राच्या दृष्टीनें हास्यास्पद आहे. संशोधनाचें आगर असलेल्या जर्मनींत या तत्त्वाचा उदोउदो करणारे पंडित मिळावेत हें दुर्दैव आहे. श्वेतवर्णीय श्रेष्ठतेच्या तत्त्वज्ञानांत जर जर्मनीची पुढील पिढी वाढविली गेली आणि हाच कित्ता इतर राष्ट्रांनीं गिरविला तर हिंदुस्थानांतील वर्णभेद जागतिक प्रमाणावर स्थापन केल्याचें श्रेय जर्मनीला मिळून लवकरच श्वेत-कृष्ण, पीत-ताम्र अशा मानव वंशामध्यें कलह सुरू होतील.

**नाझींचें हिंदुस्थान-विषयीं धोरण**

हिंदुस्थानचे दृष्टीनें पाहतां नाझी पक्षाची वृत्ति मोठी अनुकूल राहील असें सांगवत नाहीं. एका भाषणांत हिटलरनें उद्गार काढले होते कीं "पौर्वात्य राष्टांना यंत्रसामग्री किंवा यांत्रिक तज्ञ पाठवूं नयेत; तसें केल्यास युरोपियन राष्ट्रांनीं आपण होऊन आपला व्यापार गमावल्यासारखें होईल." चीन, हिंदुस्थानला कायमचे शेत-

करी ठेवून तेथें उद्योगधंदे वाढू न देण्याचे दृष्टीनें यापुढें जर्मन सरकारी धोरण राहिल्यास त्याला इंग्लंडचीही विशेष आडकाठी येणार नाहीं. सध्यां जर्मनीला इंग्लंडच्या मैत्रीची जरूरी आहे, त्यामुळें त्याला खूष ठेवण्याकरितां हिंदुस्थानविषयीं प्रतिकूल अथवा उदासीन धोरण जर्मनीला ठेवावें लागेल. महायुद्धांत हिंदुस्थान जर्मनीविरुद्ध लढल्यामुळें हिटलरच्या मनांत स्वाभाविकच दंश राहणें शक्य आहे. हिंदुस्थानचें स्वातंत्र्य जर्मनीवर अथवा इंग्लंडवर अवलंबून नसल्यामुळें या गोष्टीची चिंता करण्याची आज जरूरी नाहीं. जर्मनीच्या उदाहरणावरून हिंदुस्थानला आपल्या साधनांच्या दृष्टीनें कदाचित् बोध मिळेल. हिंदुस्थानला युरोपमधील पाश्चात्य राष्ट्रांशीं प्रसंग आहे, जर्मनीलाही तोच प्रसंग आहे. हिंदुस्थाननें आपल्या झगड्यांत शांतता, प्रेम, अध्यात्म यांची भाषा वापरून पाहिली परंतु ही भाषा पाश्चात्य वृत्तीला समजली नाहीं. हिटलरनें त्याच परिस्थितींत पाशवी सामर्थ्याची भाषा वापरली, तिचा परिणाम असा झाला कीं, युरोपियन राष्ट्रें खडबडून जागीं झालीं असून आज हिटलरच्या शब्दाला चढती किंमत आली; कारण त्याचे शब्दामागें सामर्थ्य आणि बळ आहे. पाश्चात्य वृत्तीला पाशवी सामर्थ्याची भाषा कळते, प्रेमाची भाषा कळत नाहीं, हें या दोन देशांच्या उदाहरणांवरून सिद्ध झालें आहे. यापुढें हिंदुस्थानपुढें प्रश्न असा आहे कीं, स्वतःचें आत्मिक सामर्थ्य कायम ठेवून त्याला क्षात्र सामर्थ्याची जोड कशी द्यावी;

अग्रतश्चतुरो वेदान् पृष्ठतः सशरं धनुः ।
इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि ॥

या न्यायानें आत्मिक सामर्थ्याला भौतिक सामर्थ्याची जोड मिळाल्यास हिंदुस्थानचें वैशिष्ट्य कायम राहून जगांतील व्यावहारिक संबंधांतही सुकरता येईल.

---

प्रकरण अठरावें

# जर्मन स्वभावांतील रहस्य

जर्मन राष्ट्राबद्दल व लोकांबद्दल एक प्रकारचा खानदानीपणा वाटतो. जर्मन समाजांतून व शहरांतून फिरत असतां या देशांतील संस्कृतीला कांहीं स्थिरता आली आहे असा संस्कार प्रेक्षकाचे मनावर होतो. जर्मन शहरांत प्रवेश केल्याबरोबर त्यांतील रस्त्यांचा, वाहनांचा, आणि घरांचा रुबाब नजरेंत भरतो. लांब, रुंद रस्ते, कांहीं ठिकाणीं रस्त्याचे मध्यभागीं बाग व झाडें लावून आणलेली शोभा, जुन्या व नव्या प्रकारच्या शिल्पकलेनें विभूषित असलेले वाडे, दुकानांची मांडणी, सर्वत्र आरशासारखी स्वच्छता व शांत गंभीर वृत्तीनें वावरणारा जर्मन समाज पाहिला म्हणजे मनाला समाधान होतें.

जर्मनीचा खानदानीपणा

जर्मन शहरांतून अनेक वर्षांची ऐतिहासिक परंपरा उभी आहे. प्रत्येक ठिकाणीं कांहीं ना कांहीं इतिहासाचे अवशेष आहेत. कांहीं ठिकाणीं अगदीं जुने किल्ले पाहावयास मिळतील, कोठें जुने राजवाडे दिसतील तर मधूनच प्रसिद्ध पुरुषांचीं व वीरांचीं स्मारकें चमकतील. या सर्व गोष्टी नागरिकांच्या व प्रवाशांच्या नजरेस आणून आपल्या संस्कृतीची छाप त्यांच्या मनावर पाडण्याचा जर्मन लोकांचा नेहमीं प्रयत्न असतो. संस्कृतीचे अवशेष अस्तित्वांत असणें निराळें, आणि देश व संस्कृतीबद्दल अभिमान उत्पन्न करून देण्याकरितां त्यांचा उपयोग करून घेणें निराळें. हिंदुस्थानांत पुष्कळ ऐतिहासिक अवशेष आहेत. परंतु जर्मनी आपल्या पुराण ठेवीचा

पुराण संस्कृतीची छाया

जसा विद्यमान काळाकरितां उपयोग करून घेत आहे तसा प्रयत्न हिंदुस्थानांत होत नाहीं.

शिल्पकलेप्रमाणेंच इतर कलाही जर्मन लोकांनीं अनेक वर्षे वाढविल्या असून अद्याप त्यांना उत्तेजन दिलें जात आहे. अमेरिकेसारख्या देशांत यांत्रिक सुधारणेमुळें हस्तकला नामशेष झाल्या आहेत तशी स्थिति जर्मनींत नाहीं. आपल्या जुन्या कलांचें संगोपन करून त्यांत सुधारणा व्हावी म्हणून मोठमोठ्या शहरांतून कला शिक्षणाचीं विद्यालयें (Kunstgewerb Schule) आहेत. जर्मन भाषा जुनी असून तिच्यांत प्रगल्भ वाङ्मय निर्माण झालेलें आहे. या वाङ्मयांत जगप्रसिद्ध कवि, नाटककार, तत्त्ववेत्ते, शास्त्रकार यांचें लेखन झालेलें असल्यामुळें त्याचा परिणाम सर्व जगांतील वाङ्मयावर झालेला आहे. या जुन्या वाङ्मयाचे अध्ययनामुळें पूर्व संस्कृतीचा प्रवाह तरुण पिढीचे मनावरून एकसारखा वाहात राहातो. सारांश, भौतिक, आध्यात्मिक आणि मानसिक दृष्टींनीं जर्मन राष्ट्र सुसंस्कृत झालेलें असून या संस्कृतीचीं प्रत्यक्ष बाह्य चिन्हें सामान्य दृष्टीलाही दिसतात.

इतर देशांमध्यें समाजांत खालचा वर्ग व वरचा वर्ग यांच्यांत संस्कृतीचे दृष्टीनें जें महदंतर दिसतें तें जर्मनींत तितक्या प्रमाणांत नाहीं. अगदीं सुशिक्षित व अगदीं अशिक्षित अशा दोन्ही टोकांचे लोक या समाजांत नाहींत. इतर देशांतील मजूर वर्ग हा त्याचे पोषाखावरून व मुखचर्येवरून तेव्हांच ओळखूं येतो. जर्मन मजूर व कामकरी वर्गाचा मनुष्य ओळखणें तिऱ्हाईत माणसाला तितकें सोपें नाहीं. जर्मन कामकरी वर्ग हा शिकलेला, व्यवस्थित राहणारा व जागरूक असा आहे. संस्कृतीचे व शिक्षणाचे दृष्टीनें जर्मन

सुसंस्कृत सुविद्य समाज

कामकरी वर्ग हा जगांत श्रेष्ठ समजला जातो. मध्यम वर्गाचे लोक हेही आपल्या शिक्षणामुळें सुविद्य व सदभिरुचीचे असे झालेले असतात. सामान्यपणें प्रत्येकाला आपल्या भाषेव्यतिरिक्त एकदोन अर्वाचीन भाषा येत असतात, त्यामुळें प्रवाशाला रस्त्यांत कोणाशींही इंग्रजी बोलतां येतें, व जर्मन भाषा येत नसली तरी काम भागतें.

मध्यम वर्गांतील विद्वान् वर्ग घेतला तर जर्मन पंडितांचा विद्वत्तेंत हात धरणारा प्रतिस्पर्धी मिळणें कठीण ! भाषा, तत्त्वज्ञान, भौतिकशास्त्र इ. सर्व क्षेत्रांत जर्मन पंडित अग्रेसर आहेत. एका सामान्य हायस्कूलमध्यें मला एक शिक्षक भेटला. या विद्वानाला संस्कृत, प्राकृत व बंगाली भाषा येत होत्या आणि मराठीचा त्यानें थोडा अभ्यास करून 'नवनीत'ही वाचलें होतें असें त्यानें मला सांगितलें ! मराठीवर यूरोप-मध्यें कोठें काय ग्रंथ लिहिले जातात याचीही त्याला माहिती ! त्यानें मला सांगितलें कीं पॅरिसमध्यें ज्यूल्स् ब्लॉक् नांवाच्या एका फ्रेंच पंडितानें Formation de la lange Marathi 'मराठी भाषेची घटना' या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. ही त्याची माहिती ऐकून मी थक्कच झालों. माझ्या भाषेबद्दल मला जी माहिती नाहीं ती या जर्मन पंडितानें मला सांगितली ! जर्मन विद्वत्तेचा हा एक नमुना झाला. असे पंडित जर्मनीच्या शाळांतून, कॉलेजांतून, विश्वविद्या-लयांतून, आणि संशोधन संस्थांतून पसरलेले आहेत. बरेचसें लेखन व संशोधन झालेलें असेल तरच विद्वान् अध्यापकाला अगदीं प्रौढ वयांत प्रोफेसर ही पदवी दिली जाते. एका शिक्षण संस्थेंत माझ्या बरोबरीच्या बाईनीं माझा 'प्रोफेसर' म्हणून दुसऱ्या इसमाशीं परिचय करून दिल्याबरोबर तो म्हणाला, "आपलें वय किती ? आपणांस या वयांत प्रोफेसर कसें होतां आलें ? आश्चर्य आहे !" प्रोफेसर

पांडित्याचा मासला

आणि पंडित इत्यादि पदव्या मिळविण्याला जर्मनींत बौद्धिक तपश्चर्या करावी लागते.

जर्मन लोकांना तात्त्विक विचारांची आवड जास्त. कोणत्याही गोष्टीचा खोल बुद्धीनें विचार करण्याची त्यांची प्रवृत्ति असते.

बुद्धिप्रधान मनोवृत्ति

त्यामुळें शेक्सपियरसारख्या कवीची ओळख खुद्द इंग्लिश लोकांना जर्मनीच्या मार्फत झाली. संस्कृत वाङ्मय जगाचे निदर्शनास जर्मन पंडितांनीं आणलें. तत्त्वज्ञान, वाङ्मय, शिक्षणशास्त्र, अर्थशास्त्र, इ. क्षेत्रांत नवीन तत्त्वें प्रतिपादन करणारे पुरुष जर्मनींत उदयास आले. या परंपरेमुळें जर्मन स्वभाव बुद्धिप्रधान झालेला आहे.

विद्वत्तेचा व पांडित्याचा जर्मनीला फायदा झाला तसा तोटाही झाला आहे. कारण हे पंडित आपल्या क्षेत्रांत इतके गढून

संथ स्वभावांत तडफ कमी

गेलेले असतात कीं त्या व्यतिरिक्त अन्य क्षेत्रांत काय घडामोडी चाललेल्या आहेत याचा विचार करण्यास त्यांना वेळ व अभिरुचि नसते. त्या कारणानें व्यवहारावर परिणाम करणाऱ्या ज्या आर्थिक, राजकीय व सामाजिक घडामोडी असतात त्यांविषयीं हे लोक फारसे उत्साही नसतात. जर्मनींत १९१८ पर्यंत एकतंत्री राजसत्ता होती, लोकशाहीचा उदय झालेला नव्हता. सामान्य माणसाला राजकारणाविषयीं फारशी आस्था नसे. हीच परंपरा पुढें चालत आली असावी. हिटलरसारख्या पुढाऱ्यानें अर्धवट तत्त्वज्ञानाचे जोरावर राज्यक्रांति घडवून आणली याचें कारण हेंच असलें पाहिजे. एका विशिष्ट विचारांत व वातावरणांत वाढलेल्या जर्मन लोकांत स्वतंत्र विचार व तडफदार क्रिया या गोष्टी आढळत नाहींत. त्या कारणानें एकादा प्रश्न विचारल्यावर त्याचें तडका-

फडकीं उत्तर न देतां ते डोकें खाजवून " Ach So ! " असें काय ? म्हणून विचार करीत बसतील. जर्मन मनुष्य आपल्या जबाबदारीवर एकाद्या प्रश्नाचें उत्तर न देतां इतर दोन तीन जणांना विचारून पुष्कळ वेळ विचार करून मग त्याचें उत्तर देईल. या विचारी वृत्तीमुळें जर्मन माणसाचा स्वभाव शांत, गंभीर व संथ असा झालेला आहे. अमेरिका, इंग्लंड या देशांत दिसणारी तडफ जर्मनींत दिसणार नाहीं. प्रत्येक राष्ट्राला त्याचें स्वभाववैशिष्ट्य असतें; त्याचीं मुळें त्या देशाच्या इतिहासांत व राजकारणांत खोल गेलेलीं असतात.

जर्मन लोक शिस्तीचे अत्यंत भोक्ते आहेत. गेलीं शंभर वर्षें जर्मन बादशहांनीं त्यांना हें वळण लावलेलें असल्यामुळें तें त्यांच्या रक्तांत खेळून राहिलें आहे. लोकशाहींत उत्पन्न होणारी बजबजपुरी व विस्कळितपणा त्यांना आवडत नाहीं. एकाच्या हुकुमानें व पद्धतीनें सर्व शिस्तवार व वक्तशीर चालावें असें त्यांना वाटतें. त्यामुळें युद्धानंतर १९१८ ते १९३३ पर्यंत त्यांनीं लोकशाहीचा प्रयोग करून पाहिला, आणि पुन्हां पूर्वीप्रमाणें एकतंत्री सत्ता मान्य केली व हिटलरसारख्या हुकूमशहाच्या प्रत्येक शब्दाला "Ja" "होयबा" म्हणण्यास सुरुवात केली. स्टेशनवर पोंचविण्यास आलेला एक प्रोफेसर मला म्हणाला, " पूर्वीच्या सोशल–डिमॉक्रसींत सर्व अनियंत्रित व अव्यवस्थित होतें. आतां सगळीकडे शिस्त, पद्धत, आणि वक्तशीरपणा आहे. रेल्वेच्या गाडया देखील आतां नियमित सुटतात. " लोकशाहीच्या धकाधकीपेक्षां एकतंत्री अंमलांतील शिस्त चांगली अशी जर्मन मनोवृत्ति आहे.

लोकशाहीपेक्षां हुकूमशाही बरी

**स्वच्छतेचा आदर्श पाहावयाचा असेल तर जर्मनींत जावें.**

रस्त्यांत एक कागदाचें चिटोरें पडलेलें दिसणार नाहीं. ट्रामवे, अंडर-ग्राऊंड, ( जमिनीखालून जाणारी गाडी ) हॉटेलें, सार्वजनिक उद्यानें, शाळा इ. ठिकाणीं जर्मनींत दिसणारी स्वच्छता यूरोप, अमेरिकेंतील इतर कोणत्याच देशांत सहसा दिसत नाहीं. देशांत जितकी लोकशाही तितकें लोकांना व्यक्तिस्वातंत्र्य; त्या प्रमाणांत स्वच्छतेचें मान कमी. लोकांवर अंमल चालविण्याची पोलीसलाही भीति वाटते. जर्मनींतील लोक तीनचार पिढया कैसर बादशहाचे अंमलाखालीं वाढले. या काळांत त्यांना शिस्त, पद्धति, स्वच्छता, इ. गोष्टींचें चांगलें शिक्षण दिलें गेलें. तीच परंपरा समाजांत पडून गेली आहे. मध्यवर्ती सत्ता एकतंत्री असली तरी ती देशाभिमानानें प्रेरित झाली असेल तर समाजाची सार्वांगिक प्रगति कशी करूं शकते याचें जर्मनी हें एक उदाहरण आहे. समाजांतील स्वच्छतेचें मान हें त्या समाजाची संस्कृति मोजण्याचें प्रमाण आहे. मानसिक दृष्टया समाज जसजसा उन्नतावस्थेला जातो तसतसा तो आपल्या भोंवतालची भौतिक परिस्थितीही अधिक आरोग्यानुकूल आणि अभिरुचिपूर्ण अशी करीत असतो.

आरशासारखी स्वच्छता

जर्मन स्वभावांतील महत्त्वाचा विशेष म्हणजे त्याचा राष्ट्राभिमान हा आहे. हा अभिमान वरवरचा, दिखाऊ, आणि उथळ असा नसून त्याचीं मुळें जर्मन संस्कृतींत खोलवर गेलेलीं आहेत. प्रत्येक जर्मन माणसाला आपल्या संस्कृतीबद्दल आदर व प्रेम वाटतें. इतिहास, वाङ्मय, थोर विभूति, कला, आणि समाजाची विशिष्ट विचारसरणी या सर्वांना जर्मन संस्कृति (Deuchtum) असें समुदायवाचक नांव आहे. राष्ट्राभिमान हा केवळ राजकीय स्वरूपाचा नसून सांस्कृतिक स्वरूपाचा आहे. जर्मन मनुष्य देशाकरितां

संस्कृतिमूलक राष्ट्राभिमान

लढतो तेव्हां आपल्या विशाल संस्कृतीचें रक्षण करण्याकरितां आपण लढतों अशी भावना त्याचे मनांत असते. प्रत्येक जर्मन नागरिकाच्या अंतःकरणांत सुप्तपणें वास करीत असलेल्या या राष्ट्राभिमानाचे भावनेचे जोरावरच पराजित झालेला जर्मनी अवघ्या पंधरा वर्षांत पुनः आपल्या पायावर उभा राहिला असून अपयशाचें परिमार्जन करण्यास सिद्ध झालेला आहे. जर्मनीची यात्रा करून जर कांहीं शिकावयाचें असेल तर हा जर्मन लोकांचा राष्ट्राभिमान. संस्कृतीच्या संपूर्ण ज्ञानावर आरूढ झालेल्या या राष्ट्राभिमानाचें हिंदुस्थाननें अनुकरण केलें तर त्यालाही जगांत जर्मनीइतकेंच महत्त्व प्राप्त होईल.

---

प्रकरण एकोणिसावें

## साम्राज्य-राजधानीचें प्रथमदर्शन

जगाच्या इतिहासांत आजपर्यंत अनेक साम्राज्यें उदयास येऊन धुळीस मिळालीं आहेत. हीं साम्राज्यें अस्तित्वांत असतांना तीं चिरंजीव आहेत असें त्यांच्या मालकांना वाटत असे. ॲलेक्झांडरनें हिंदुस्थानपर्यंत आपली सीमा भिडविली, रोमन लोकांनीं एक वेळ इंग्लंडवर राजसत्ता गाजविली, तुर्क लोकांनीं युरोपवर आपला सार्वभौमत्वाचा दरारा बसविला, आणि पर्शियांतील लोकांनींही एक वेळ साम्राज्यसत्ता गाजविली, पण हीं सर्व साम्राज्यें आज इतिहासशेष झालीं आहेत. त्यांचे इतिहास वाचले म्हणजे त्यांच्या उदयाची आणि नाशाची कारणमीमांसा करितां येते, परंतु आपल्या डोळ्यांपुढें साम्राज्यें बांधलीं जात असतांना आणि नाश पावत असतांना त्यांची ती प्रक्रिया

कालचीं व आजचीं साम्राज्यें

चटकन् लक्षांत येत नाहीं. घडत असलेल्या इतिहासाच्या पर्यवसानाची कल्पना करणें कठीण आहे. आज जगांत इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका आणि जपान यांचीं साम्राज्यें पसरलेलीं आहेत. एकाद्या साम्राज्यावर सूर्य मावळत नाहीं असें कोणी म्हणाला किंवा दुसऱ्या एकाद्या साम्राज्यांतील बर्फ वितळत नाहीं असें कोणी लिहिलें तरी काळानें कोणाला अमरपट्टा दिलेला नाहीं, ही गोष्ट विसरतां कामा नये. विद्यमान साम्राज्यांच्या वर्तमान प्रवृत्तींच्या पोटांत त्यांचा भविष्यकाल जन्म घेत आहे. या भविष्यकाळाचे धागेदोरे आज लंडन, पॅरीस, बर्लिन, मॉस्को, वॉशिंग्टन आणि टोकिओ यांतील घडामोडींत एकवटलेले आहेत. त्या ठिकाणीं काय चालू आहे यावर साम्राज्यांचें भवितव्य अवलंबून आहे.

Dear Old London चें स्वरूप

"इंग्लंडची राजधानी लंडन टेम्स नदीवर आहे" असें भूगोलांत घोकून आणि क्रमिक पुस्तकांतून वर्णनें वाचून लंडनविषयीं जी रम्यतेची आणि भव्यतेची कल्पना झालेली असते ती त्याच्या प्रथमदर्शनानें एकदम कोसळून पडते. मुंबईहून येणाऱ्याला लंडनमध्यें कांहीं विशेष नाविन्य न सांपडल्यामुळें निराशा वाटते, तर यूरोप-अमेरिकन राजधान्यांतून लंडनमध्यें येणाऱ्याला विरोधामुळें एकदम खेडेगांवांत आल्यासारखें वाटतें! या विधानांत अर्थातच अतिशयोक्ति आहे. तिचें कारण कल्पना आणि वस्तुस्थिति यांत दिसून येणाऱ्या विरोधांत आहे. मुंबईंत फोर्टमध्यें अक्षय्य फिरणाऱ्यानें ते मोठमोठे रस्ते, त्या दगडी इमारती, ते विजेचे दिवे आणि त्या ट्रामगाड्या पाहिल्यामुळें लंडनमध्यें सकृद्दर्शनीं नवीन ठिकाणीं आल्यासारखें वाटत नाहीं. बर्लिन, व्हिएन्ना, पॅरिस किंवा न्यूयॉर्कहून येणाऱ्याला लंडनमध्यें इमारतींची भव्यता आणि शहराचा डौल न

दिसल्याकारणानें चुकल्याचुकल्यासारखें वाटतें. अत्यंत जुनाट असल्या-कारणानें लंडनची वाढ यदृच्छेनें होईल तशी झाली आहे. इतर ठिकाणीं दिसून येणारी पूर्वयोजना आणि बुद्धिपुरस्सर ठेवण येथें आढळून येत नाहीं.तरी पण इंग्लिश रहिवाश्याला तें Dear Old London वाटतें, याचें कारण भावनाबद्धता. पुण्यांत किंवा मुंबईंत राहाणाऱ्याला ज्याप्रमाणें या ठिकाणाव्यतिरिक्त गेल्यास जमिनीवरील माशाप्रमाणें वाटतें, तद्वतच इंग्लिश माणसाची गोष्ट आहे.

गरीब श्रीमंतांच्या स्वतंत्र वसाहती

साठ लाख वस्तीच्या या शहरांत पुष्कळ विविधता आणि विरोध आहे. एका बाजूस मोठमोठे राजवाडे, राजमार्ग आणि उद्यानें आहेत, तर दुसऱ्या बाजूस पुण्याच्या कसब्यांतील बोळांना लाजविणारे लहान बोळ आणि गोरगरिबांचीं जुनाट घरें आहेत. शहरांतील लोकवस्तीची विभागणी श्रीमंती गरीबीच्या तत्त्वावर झाली आहे. कांहीं भागांत फक्त एकजात कामकरी वर्गाची आणि गरीब लोकांची खिचडी झालेली आहे, तर कांहीं भागांत फक्त श्रीमंत सरदारांची वस्ती आहे. तेथील गरीबांच्या वस्तींत एक विशेष आहे. घरें कितीही जुनाट आणि दाट वस्तीचीं असलीं तरी तीं बाहेरून अत्यंत स्वच्छ ठेवण्याचा वहिवाटदार प्रयत्न करतात. सकाळीं किंवा दुपारीं पाहिलें कीं, गुडघ्यावर वांकून घरापुढील फरशी किंवा अंगण साफ करतांना अनेक बाया दिसतात. हिंदी शहरांतील वस्तीची विभागणी साधारणपणें जातितत्त्वावर झालेली असते. इंग्लिश शहरांतील वस्तीची विभागणी आर्थिक वर्गभेदावर झालेली दिसते. वर्णभेदाच्या भावनेची छापही पुष्कळ ठिकाणीं दिसते. हिंदी मनुष्याला वाटेल तेथें राहाण्यास घर मिळत नाहीं, तर कांहीं ठराविक भागांतूनच त्यांना राहण्याला जागा मिळतात. त्यामुळें लंडनमध्यें

असलेले शेंकडों हिंदी विद्यार्थी बहुतेक एकाच प्रांतांत आढळून येतात.

गरीबीचें चित्र व सुधारणेचें थडगें

इंग्लंडचें साम्राज्य आज दोन तीन शतकें असल्यानें स्वाभाविकच असें वाटतें कीं, जगांतून धुवून आणलेली संपत्ति येथें पाहावयास सांपडेल आणि सर्व लोक संपन्नतेंत, निदान सुखांत राहात असतील. बंदरांत उतरल्याबरोबर तेथें काम करणाऱ्या बिगाऱ्यांच्या फाटक्यातुटक्या पोषाखाकडे पाहिलें म्हणजे वरील कल्पना मावळून जाते. वसाहतीमधून ब्रिटिश लोकांनीं जी संपत्ति आणिली ती येथील गरीब लोकांच्या वाटयाला आली नाहीं. ते बिचारे गरीब आणि कंगाल स्थितींतच आहेत. हिंदुस्थानांत नोकऱ्या करून इंग्लंडमध्यें पेन्शन खाणारे आणि व्यापार करून यशस्वी झालेले लोक व्यक्तिशः श्रीमंत झाले आणि पूर्वींच्या पिढीजाद चालत आलेल्या उमराव वर्गांत त्यांची गणना झाली. सामान्य जनतेला या श्रीमंतीचा फायदा फार थोडा आणि अप्रत्यक्ष असा झाला. या बाबतींत हिंदुस्थानांतील आणि इंग्लंडमधील लोक सारखेच पापाचे वांटेकरी आहेत. लंडनमध्यें कामकरी वर्गाच्या जीवनाची अत्यंत दैन्यावस्था आहे. तीन चार माणसांचें कुटुम्ब एका लहान खोलींत राहातें. अशा स्थितींत प्रत्येकाला स्वतंत्र अंथरूण पांघरूण अथवा शाळेंत जाणाऱ्या मुलांना अभ्यासाला एकांत मिळणें अशक्य होतें. कामकरी वर्गाच्या या Slums सुधारण्याची चळवळ सध्यां प्रिन्स ऑफ वेल्सच्या आश्रयाखालीं चालू आहे. परंतु त्यास पुष्कळ वेळीं घरमालकांचा विरोध येतो. ही झाली घरांतील गरीबी. सध्यांच्या व्यापारी मंदीमुळें हें दारिद्र्य रस्त्यावरहि दिसूं लागलें आहे. चहाकॉफीकरितां पैसा द्या म्हणून हात पुढें पसरणारे भिकारी रोज एक दोन तरी भेटतात.

कांहीं अधिक स्वाभिमानानें आणि प्रतिष्ठितपणें भिक्षा मागतात. बेकार झालेले गवय्ये, बजवय्ये रस्त्यानें गात आणि वाजवीत याचना करतात. चितारी रस्त्याच्या बाजूला आपलीं पेंटिंग्ज ठेवतात किंवा फरशीवर रोज नवीन नवीन चित्रें काढतात आणि कौतुक करून पैसा अधेला देणाऱ्या दात्यांची मार्गप्रतीक्षा करीत बसतात. या मार्गामुळें मदत न होऊन वैतागून गेलेल्या एका चिताऱ्यानें दगडावर एका थडग्याचें चित्र रंगवून त्याच्या खालीं असें लिहिलें होतें:— "Tombstone of Modern Civilization" (आधुनिक सुधारणेचें थडगें). रावणासारखें साम्राज्य हातांत असतांना, क्षणांत हजारों जीवनोपयोगी वस्तू प्रसवणारी यंत्रसामग्री जवळ असतांना, आणि आजपर्यंत भल्याबुऱ्या मार्गांनीं पृथ्वीवरील संपत्ति साठविलेले कुबेर देशांत असतांना, धडधाकट आणि कुलवान् माणसांना ज्या देशांत भीक मागण्याचा प्रसंग येतो त्या देशांतील समाज सात्त्विक वैभवापासून च्युत होऊं लागला आहे असें वाटल्यावांचून राहात नाहीं.

इंग्लंडच्या जमिनीवर पाय ठेवल्याबरोबर प्रवासी आजूबाजूला पाहूं लागला म्हणजे आपण एका विशिष्ट वातावरणांत आहों असें त्याला वाटूं लागतें. साम्राज्यनिष्ठा आणि देशाभिमान या मुख्य भावना या वातावरणांत असल्यामुळें तेथें राहणाऱ्या नागरिकाच्या मनावर जन्मापासून मरेपर्यंत अबोधपूर्वक एक प्रकारचा संस्कार होत असतो. दुकानांवरील जाहिराती पाहिल्या म्हणजे "इंपीरियल, ब्रिटिश आणि इंग्लिश" इत्यादि शब्द त्यांत असल्याशिवाय त्यांची पूर्तता होत नाहीं. एकादा जिन्नस खरेदी केला तर त्यावर ठळक अक्षरांत 'ब्रिटिश मेक्' असा शिक्का आढळून येईल. लंडनमध्यें जागजागीं 'वुलवर्थ आणि कं.' नांवाच्या अमेरिकन

इम्पीरियल, ब्रिटिश व इंग्लिश वातावरण

कम्पनीचीं भांडारें आहेत. कम्पनी अमेरिकन असली तरी या स्वदेशनिष्ठ समाजांत आपला अमेरिकन माल खपणार नाहीं अशी तिची खात्री असल्याकारणानें बहुतेक सर्व माल इंग्लंडमध्यें तयार झालेला असाच ठेविला आहे. वर्तमानपत्रें चाळलीं तरी त्यांत ब्रिटिश मालाच्या विक्रींत चढउतार कसा होत आहे हें डोळयांत तेल घालून पाहिलें जातें असें दिसून येतें. या बाबतींत व्यापारी स्वार्थवृत्तीचा मजेशीर विरोध पाहून तिऱ्हाइकाला हसूं येतें. अमेरिकन फिल्म्सनीं आजपर्यंत इंग्लिश थिएटरें काबीज केलीं होतीं, परंतु ब्रिटिश चित्रपटांना अमेरिकन थिएटरमध्यें थारा मिळत नसे. एका वर्षी इंग्लिश फिल्मसच्या अमेरिकेंतील खपाचें प्रमाण वाढल्याबरोबर वर्तमानपत्रांनीं आनंद प्रदर्शित केला. स्वतःच्या देशांत परदेशाचा माल खपूं नये असें ज्यांना वाटतें त्यांनीं आपला माल दुसऱ्यांच्या देशावर लादावा आणि त्यांत आनंद मानावा या भावनेच्या मुळाशीं जी स्वार्थी वृत्ति आहे तिची कींव आल्यावांचून राहात नाहीं. जपानी किंवा रशियन माल देशांत अधिक येऊं लागल्याबरोबर ब्रिटिश लोक ओरड करूं लागतात. परंतु अनेक मार्गांनीं आपला माल हिंदुस्थानवर लादण्यांत त्यांना हरकत वाटत नाहीं. स्वतःच्या देशांत स्वदेशीचा पुरस्कार करणारांनीं इतर देशांतील स्वदेशी प्रवृत्तीचाही गौरव करावा. परंतु इतकी उदार प्रवृत्ति व्यापारी स्वार्थांत दिसून येणें कठीण आहे. इंग्लंडच्या अगदीं उलट प्रवृत्ति अमेरिकेंत आढळते. इंग्लंड मध्यें 'ब्रिटिशमेड' म्हटल्याबरोबर माल खपतो, तर अमेरिकेंत 'इंपोर्टेड' (आयात) मालाला मागणी असते. मध्यंतरीं व्यापार-मंदीच्या दिवसांत "बाय अमेरिकन्" अशी चळवळ कांहीं पक्षांनीं सुरू केली होती. परंतु बहुजन समाजाकडून तीस पाठिंबा न मिळतां तिचा तिरस्कार करण्यांत आला. अमेरिकन सुज्ञ माणसांना अशी

जाणीव आहे कीं, आपला माल जर परदेशांत खपावयाचा असेल तर परदेशी मालही त्या प्रमाणांत आपल्या देशांत येऊं दिला पाहिजे. औद्योगिक दृष्टीनें पुढारलेल्या देशांनीं हें धोरण स्वीकारणें योग्य आहे. परंतु यांत्रिक उद्योगधंद्याच्या बाल्यावस्थेंत असणाऱ्या हिंदुस्थानसारख्या देशांनीं स्वदेशीचा आणि 'बाय इन्डियन'चाच पुरस्कार केला पाहिजे. परंतु याच तत्त्वाचा इंग्लंडसारख्या राष्ट्रांनीं पुरस्कार करणें म्हणजे साठ वर्षांच्या म्हाताऱ्यानें सहा महिन्यांच्या अर्भकाची कुंची घालण्याप्रमाणें आहे! कांहीं असलें तरी इंग्लिशांच्या या स्वदेशीनिष्ठेचें उदाहरण हिंदी लोकांनीं अनुकरण करण्यासारखें आहे यांत शंका नाहीं.

---

## प्रकरण विसावें

# समाजाचें वैशिष्टय व विरोधी परंपरा

कोणत्याही राष्ट्रांत बऱ्यावाईट अशा मिश्र परंपरा असतात. त्यांना जतन करण्याचा बुद्धिपुरःसर प्रयत्न त्या सर्वांकडून केला जातो. परंतु स्वतःच्या परंपरांचा गौरव करून आणि इतर समाजांच्या परंपरांचा उपहास करून स्वतःला श्रेष्ठ समजण्याची प्रत्येक समाजाची प्रवृत्ति असते.

राष्ट्राला परंपरा तारक कीं मारक?

परंपराप्रियतेच्या दृष्टीनें हिंदुस्थान, इंग्लंड आणि अमेरिका यांची परस्पर–प्रवृत्ति मोठी मनोरंजक आहे. हिंदुस्थानसंबंधीं बोलतांना इंग्लिश लोक स्वतःला प्रगतिशील आणि हिंदु लोकांना परंपराबद्ध असें समजतात. परंतु हेच इंग्लिश लोक अमेरिकन लोकांशीं किंवा अमेरिकेंत राहून आलेल्या प्रवाशांशीं बोलूं लागले म्हणजे "आम्हीं परंपराप्रिय ऊर्फ कॉन्झरव्हेटिव्ह

आहोंत' असा अभिमान मिरवीत असतात, आणि परंपराहीन अमेरिकन लोकांना मात्र तुच्छ समजतात. परंपराप्रिय हिंदी लोकांना आणि नवीन संस्कृतीच्या पायरीवर पाय ठेवणाऱ्या अमेरिकन लोकांना तुच्छ मानण्यांत इंग्लिश लोकांची प्रवृत्ति केवळ आत्मप्रौढीपर आणि वस्तुस्थितीचें समर्थन करणारी अशी आहे. कोणत्याही नव्या–जुन्या समाजांत बऱ्यावाईट दोन्ही प्रकारच्या परंपरा असतात. या परंपरा लाथाडण्यांत मोठें भूषण नाहीं किंवा त्या आपल्या म्हणून जतन करण्यांत मोठें पुण्य नाहीं. परंपरा आणि सांप्रदाय हीं समाजाचीं साधनें आहेत. त्यांचें अंधपणें संरक्षण करणें हें ध्येय नव्हे. प्रत्येक समाजानें आपलें अंतिम ध्येय निश्चित करावयाचें असतें आणि त्या ध्येयांना अनुकूल अशा जुन्या परंपरा टिकवून नवीन सांप्रदाय निर्माण करावयाचे असतात. उलट, उद्दिष्ट ध्येयांना मारक अशा परंपरांचा त्याग केला पाहिजे. अशा चिकित्सक दृष्टीनें आणि विचारपूर्वक धोरणानें एकाद्या समाजानें आपल्या परंपरा टिकविल्या तर त्याबद्दल इतरांनींही आदर बाळगिला पाहिजे.

दोन विरोधी परंपरांचें रक्षण

इंग्लंडनें ज्या परंपरा टिकविल्या आहेत त्यांत दोन परस्पर-विरोधी ध्येयें आहेत. पूर्वीच्या इंग्लिश राजांपासून जनतेनें जें स्वातंत्र्य आणि राजकीय हक्क मिळविले त्यांचें संरक्षण करणें हा एक उद्देश. इंग्लिश लोकांनीं जगावर चढाई करून आणि जरूर तेथें आपलें रक्त सांडून जें साम्राज्य स्थापन केलें, त्या साम्राज्याचें स्वाभिमान-पूर्वक नवीन पिढीकडून संरक्षण करविणें हा दुसरा उद्देश. स्वतःचें स्वातंत्र्य टिकविणें आणि इतर समाजांवर व देशांवर बसविलेलें साम्राज्य कायम ठेवणें, अशीं दोन विरोधी ध्येयें इंग्लंडच्या परंपरा-संरक्षणांत दिसून येतात. एका ध्येयाबद्दल जो आदर वाटतो त्याला

दुसऱ्या ध्येयाबद्दल वाटणाऱ्या तुच्छतेनें संक्षेप दिला जातो.' लंडन-मधील प्रमुख ठिकाणीं इंग्लिश स्वातंत्र्यवीरांचीं स्मारकें आहेत. पार्लेमेंट हौसच्या भिंतीवर निरनिराळे देखावे काढून पूर्वीच्या वाडवडिलांनीं लोकस्वातंत्र्याकरितां किती शौर्य दाखविलें आणि स्वार्थत्याग केला त्याचीं मूर्तिमंत चित्रें रंगविलीं आहेत. हीं चित्रें पाहाणाऱ्या इंग्लिश तरुणाला स्वाभाविकच स्वातंत्र्याचें शिक्षण मिळतें. वेस्टमिन्स्टर ॲबे आणि सेंट पॉल्स् कॅथिड्रल या ठिकाणीं इंग्लिश वीरांचीं स्मारकें आणि थडगीं आहेत. तीं पाहून जनतेच्या अंतःकरणांत पूर्व शतकांतील स्वातंत्र्यप्रेम जागृत होऊन या स्वातंत्र्याच्या आणि देशभक्तीच्या परंपरांबद्दल आदर उत्पन्न होतो. इंग्लंडमधील प्रसिद्ध पब्लिक् स्कूल्स्-मध्यें देखील पूर्व शतकांतील परंपरा मूर्तिमंत स्वरूपांत कायम ठेवल्या आहेत आणि या वातावरणांत तरुण पिढीचें शिक्षण होत असतें. वरील सर्व ठिकाणीं या स्वातंत्र्यपरंपरेबरोबर साम्राज्यपरंपरेचीं स्मारकें स्थापन केलेलीं आहेत. ईस्ट इंडिया कंपनीच्या स्थापनेपासून तों आजपर्यंत अनेक संग्रामांत भाग घेऊन हिंदुस्थान आपल्या सत्ते-खालीं ठेवणाऱ्या सर्व इंग्लिश वीरांचे पुतळे या ठिकाणीं उभे केले आहेत. आपलें स्वातंत्र्य हरण केल्याबद्दल वॉरन हेस्टिंग्ज्सारख्या पुरुषांबद्दल हिंदी लोकांच्या मनांत तेढ असेल, पण हे सर्व पुरुष इंग्लिश लोकांचे आदर्श वीर असून त्यांचे पुतळे व त्यांचीं स्मारकें मोठ्या आदरानें राष्ट्राच्या देवळांमध्यें स्थापन केलेलीं आहेत. सेंट पीटर्स कॅथिड्रल हें वास्तविक देऊळ आणि शुद्ध धर्माचें स्थान; परंतु राजकारणी इंग्लिश मनोवृत्तीला राजकारण व साम्राज्यभावना यां-पासून विभक्त असलेल्या शुद्ध अध्यात्माची जाणीव नाहीं. त्यांनीं या देवळांमधूनही परकीयांचें स्वातंत्र्य हरण करून तेथें आपलें साम्राज्य स्थापन करणाऱ्या पुरुषांचीं स्मारकें स्थापन केलीं आहेत. स्वातंत्र्य-

भावनेची आणि धर्माची ही थट्टा पाहून त्रयस्थ प्रेक्षकाला मनांत हसूं येतें. परंतु आज परंपरांच्या जोरावर इंग्लिश लोकांनीं आपलें स्वातंत्र्य टिकवून साम्राज्यसंरक्षण केलें आहे; आणि हीं स्मारकें व या परंपरा यांच्या वातावरणांत जोंपर्यंत तरुण पिढीचें शिक्षण होत आहे तोंपर्यन्त पुढें अनेक शतकें इंग्लिश लोक आपण होऊन या साम्राज्यभावनेचा त्याग करतील आणि पादाक्रांत केलेल्या गुलाम राष्ट्रांना स्वातंत्र्य देतील ही आशा करणें केवळ व्यर्थ आहे, असें वाटूं लागतें.

**परंपरा व देशाभिमान याचें संगोपन**

फ्रान्स, जर्मनी, रशिया, अमेरिका, जपान, इटली, इत्यादि देशांत देशभक्तीचें शिक्षण अभ्यासक्रमांतून पद्धतशीर रीतीनें दिलें जातें. इंग्लंडमध्यें लोक या भानगडींत पडत नाहींत. आठवडयांतून दोन तीन तास शिक्षण देण्यापेक्षां चोवीस तास मुलांभोवतीं असलेलें वातावरण देशभक्तिपूर्ण करण्याकडे इंग्लिश लोक अधिक लक्ष देतात. घराबाहेर पडलें कीं जेथें तेथें 'ब्रिटिश, इंपीरियल व इंग्लिश' या शब्दांचा घोष कानावर आदळतो. नाटक—सिनेमासारख्या करमणुकीच्या ठिकाणीं कार्यक्रमाचे शेवटीं "गॉड सेव्ह दि किंग" म्हटल्याशिवाय कार्यक्रमाची पूर्तता होत नाहीं. प्रत्येक चित्रपट दाखविण्यापूर्वीं It speaks British अशी त्याची भावनाप्रधान जाहिरात असते. लंडनमध्यें आठ पंधरा दिवस राहणाराला इंग्लिश परंपरांचीं अनेक चमत्कारिक दृश्यें दिसतात. शतकानुशतकें चालत आलेल्या अवजड आणि बोजड पोशाखांतील शिपाई ऊर्फ गार्डस् हे लंडनचें भूषण मानले जातात आणि त्यांची दैनिक मिरवणूक पाहाण्यास लोक रस्त्याच्या दुतर्फा गर्दी करून उभे राहतात. लंडनच्या मेयरची मिरवणूक असली कीं, तो जुन्या चारचाकी चार घोडयांच्या

गाडींतून जातो आणि कोचमन सोळाव्या शतकांतील पोषाखांत गाडी हांकीत असतो !

परंपरा आणि सांप्रदाय यांचा सामान्य जनतेच्या मनावर अधिक पगडा बसलेला असतो हें इंग्लिश पुढारी जाणून असतात, आणि जनतेच्या मनोदौर्बल्याचा ते बऱ्या-वाईट गोष्टींकडे पूर्ण उपयोग करून घेतात. इंग्लंड देश स्वत:ला डेमोक्रॅटिक म्हणजे सामान्यजनसत्ताक म्हणवितो, पण उमराव आणि श्रीमंत वर्गाचें प्राबल्य आणि सत्ता या देशांत पुष्कळ आहे. लोकांना एकादी गोष्ट करावयास लावावयाची असली म्हणजे ती कां करावी हें सांगण्यापेक्षां मोठमोठ्या नांवांचा उपयोग करून लोकांचें मन वळविण्याकडे पुढाऱ्यांची प्रवृत्ति दिसते. प्रिन्स ऑफ वेल्स म्हणतात कीं, ' देशांतील Slums महारवाडे नाहींसे करा ' या चालीवर सर्व चळवळी चालतात. एकाद्या लॉर्डचें किंवा अर्लचें नांव असल्याशिवाय चळवळीला भारदस्तपणा येत नाहीं. वारंवार राजघराण्यांतील पुरुष हिंदुस्थानांत आणून हिंदी लोकांचीं मनें भारण्याचा ज्याप्रमाणें इंग्लिश पुढारी प्रयत्न करितात त्याच तत्त्वावर खुद्द इंग्लंडमधील सामान्य जनतेच्या मनावरही या जादूनें पगडा बसविण्याचा त्यांचा यत्न असतो. अज्ञानांत ठेविलेली सामान्य जनता सर्व देशांत सारखीच असावयाची. तिच्या अज्ञानाचा आणि मनोदौर्बल्याचा उपयोग इष्ट किंवा अनिष्ट गोष्टींकडे करून घेणें हें पुढाऱ्यांच्या ठिकाणीं असलेल्या उदात्त अथवा स्वार्थी ध्येयावर अवलंबून राहातें.

मोठ्या नांवांतील जादू व सामान्य जन

हिंदुस्थानप्रमाणें इंग्लंडमध्येंही जातिभेद आहेत. हिंदुस्थानांत शेंकडों जाती आहेत, आणि इंग्लंडमध्यें फक्त दोन जाती आहेत. हिंदी जातिभेद जन्मावर अवलम्बून आहे, तर इंग्लिश जातिभेद

संपत्तीवर अवलंबून आहे. आर्थिक तत्त्वावर स्थापन झालेला हा वर्गभेद लंडनमध्यें ठिकठिकाणीं पाहावयास सांपडतो. हौस ऑफ

इंग्लंड मधील जातिभेद

पार्लमेंटमध्यें लॉर्ड्सकरितां जें मंदिर आहे तें सोनेरी थाटांत शृंगारलेलें असून इंग्लंडचें सर्व आर्थिक वैभव तेथें एकवटलें आहे. त्याच्या शेजारींच असलेल्या कॉमन्सच्या मंदिरांत गेल्याबरोबर एकदम गरिबीची आणि साधेपणाची जाणीव होते. पार्लमेंट हौसमधील लॉर्ड्स् आणि कॉमन्स यांच्या मंदिरांच्या रचनेंतील फरक हा एकंदर इंग्लिश समाजाच्या रचनेचा निदर्शक आहे. इंग्लंडमध्यें श्रीमंत आणि गरीब अशा दोन जाती आहेत. श्रीमंत लोकांच्या मुलांकरितां शाळा निराळ्या आहेत. तेथें गरिबांच्या मुलांना बृहस्पतीसारखी बुद्धि असली तरी प्रवेश मिळणार नाहीं. आमचे शिक्षणपुढारी ज्या पब्लिक स्कूलचें अनुकरण करूं पाहतात त्या शाळा श्रीमंत सरदारांच्या मुलांकरितां राखीव असून त्यांच्या मांडवाखालून गेल्याखेरीज मोठमोठ्या नोकऱ्या मिळणें अशक्य असतें. इंग्लंडवर राज्य करणारी आणि हिंदुस्थानांत आपल्यावर राज्य करणारी नोकरशाही या ठिकाणीं तयार केली जाते. या शाळांत सामान्य गरीब विद्यार्थ्यांना प्रवेश मिळत नाहीं. त्यांच्याकरितां निराळीं हायस्कुलें आहेत. असें एक हायस्कूल पाहण्यास मी गेलों असतां तेथील एका शिक्षकानें उघडपणें सांगितलें, ' तुमच्या हिंदुस्थानांत जातिभेद आहे असें आम्हीं म्हणतों; पण आमच्या या देशांतही त्याच प्रकारचा अन्याय्य जातिभेद आहे. या शाळेंतील गरीब हुशार विद्यार्थी एकादे वेळीं ऑक्सफर्ड केंब्रिजमधील विश्वविद्यालयांतून बाहेर पडला तरी त्याला सिव्हिल सर्व्हिसमध्यें शिरण्याची संधि नाहीं. गरीब लोकांच्या या शाळेंतुन त्यांचें शिक्षण झालें आहे ही एकच गोष्ट जन्मभर त्यांच्या भवितव्याला

बाधक होणारी आहे.' फार काय, थिएटरसारख्या सार्वजनिक ठिकाणीं पाहिलें म्हणजेही हा आर्थिक जातिभेद दिसून येतो. गरीब लोकांना शेवटच्या दराच्या दोनतीनशें जागा असतात, परंतु त्या मिळविण्याकरितां बिचारे दोनदोन तीनतीन तास आधीं थिएटरच्या दाराशीं रांगा लावून उभे असतात, आणि आंत गेल्यावर कांहींना जागा मिळते, इतरांना कार्यक्रम संपेपर्यंत उभें राहावें लागतें. खुर्ची नसल्यास साध्या पायरीवरही बसण्याची बंदी असते; कारण थिएटरच्या श्रीमंतीचा अपमान होतो. उभें राहण्यानें अपमान होत नाहीं !

हिंदी जातिभेदापेक्षां इंग्लिश जातिभेद थोडा लवचीक आहे ही गोष्ट खरी असली तरी हा लवचीकपणा फार मर्यादित आहे.

**इंग्लिश समाजरचनेचें वैशिष्टय**

समाजाच्या खालच्या थरांतून कांहीं व्यक्ती वरच्या थरांत जाऊं शकतात, परन्तु असें करण्याला फार थोडी संधि आहे. वरिष्ठ समाजांत सामील होण्याचें एक मुख्य साधन म्हटलें म्हणजे शिक्षण, परन्तु इंग्लिश शिक्षणपद्धतींत तिच्या आर्थिक समाजरचनेचें प्रतिबिंब पडलेलें आहे. त्यामुळें शिक्षणद्वारा वरिष्ठ समाजांत प्रवेश करणें मर्यादित होतें. त्यांतूनही मार्ग काढून कांहीं लोक वैयक्तिक कर्तबगारीच्या जोरावर मोठेपणा अथवा श्रीमंती मिळवून वरिष्ठ समाजांत सामील होतात. परंतु अशा रीतीनें केवळ बुद्धिमान आणि कर्तबगार व्यक्ति या कनिष्ठ जातींतून वरिष्ठ जातींत गेल्यानंतर त्या वरिष्ठ जातींत, Aristocracy त, उमरावलोकांमध्यें विलीन होऊन जातात. त्यांच्या मोठेपणाचा आणि पुढारीपणाचा फायदा सामान्य जनतेला मिळत नाहीं. मुख्य प्रधान मि. रॅम्से मॅक्डोनल्ड यांचें अशा प्रकारचें उदाहरण आहे. कामकरी वर्गाचा या पुरुषावर पुढारी या नात्यानें विश्वास राहिलेला नाहीं. एक इंग्लिश गृहस्थ म्हणाला, "मॅक्डोनल्ड

सरदारवर्गांत सामील झाला आहे. त्याच्या मुलामुलींचें आतां कल्याण झालें आहे. तो सामान्य जनतेची फिकीर कशाला करील?" सारांश, वेंचक, बुद्धिमान् आणि कर्तबगार लोक वरिष्ठ वर्गांत सामील करून घेऊन कनिष्ठ वर्गांतील पुढारीपण नाहींसें करणें, आणि त्यांतील असंतोषाचें बीज याप्रमाणें नष्ट करून कनिष्ठ समाज सतत कनिष्ठ दर्जावर ठेवणें हा इंग्लिश समाजरचनेचा स्वभाव आहे. सामान्य वर्गांतील बहुजनसमाजाला अधिक शिक्षणसंधि आणि संस्कृतीचें शिक्षण देऊन अखिल कनिष्ठ समाजाची सुधारणा करून त्याला उन्नतावस्थेला नेणें हें ध्येय या समाजरचनेंत नाहीं. शिक्षणाच्या प्रगतीला आजपर्यंत श्रीमंत लोकांचा विरोध झालेला आहे, आणि आजही होत आहे. याचें ताजें उदाहरण म्हणजे सक्तीच्या शिक्षणाची वयोमर्यादा चवदाची पंधरा करण्याचा कॉमन्स सभेनें पास केलेला कायदा लॉर्डांच्या सभेंत फेटाळला गेला, कारण या कायद्याचा फायदा फक्त गरीब वर्गाच्या मुलांना व्हावयाचा होता. श्रीमंतांच्या मुलांच्या शिक्षणाची सोय आधींच झालेली असल्याकारणानें त्यांना या कायद्यापासून तादृश फायदा न होतां त्यांच्या खिशाला मात्र चाट बसली असती.

कोणत्याही समाजरचनेंत वर्गीकरण हें अपरिहार्य आहे. वर्गहीन समाजाची कल्पना केवळ स्वप्नसाध्य आहे. परंतु महत्त्वाचा प्रश्न हा आहे कीं, वर्गीकरण कोणत्या तत्त्वावर झालें आहे आणि वर्गयोजनेंत लवचीकपणा किती आहे. हिंदी समाजरचना जन्मतत्त्वावर विभागली गेली आहे, तर इंग्लंडमधील समाज आर्थिक तत्त्वावर विभक्त झाला आहे, व रशियांतील नवीन समाज कर्मतत्त्वावर स्थापन झाला आहे. तिन्ही प्रकारच्या समाजांत केवळ जन्म, संपत्ति किंवा

इष्ट व अनिष्ट वर्गभेद

कर्म यांना वरिष्ठ दर्जा देऊन त्यांची उन्नति होणार नाहीं. वरिष्ठ मानल्या गेलेल्या समाजवर्गांत चारित्र्य, शील, स्वार्थत्याग आणि समाजाच्या कल्याणाची भावना नसेल तर तो नेहेमीं कनिष्ठ मानल्या गेलेल्या समाजावर चरत राहून आपला स्वार्थ साधील. उलट पक्षीं चारित्र्यवान् अणि लोककल्याणदक्ष समाज हा नेहेमीं वरिष्ठ मानला गेला तर तो समाजाच्या कल्याणाच्या दृष्टीनें आपल्या पुढारीपणाचा उपयोग करील. दुसरी गोष्ट अशी कीं, वर्गसंक्रमणाच्या दृष्टीनें व्यक्तीची प्रगति होण्याला वाव राहील इतका लवचीकपणा समाज-रचनेंत पाहिजे. अभेद्य वर्गभेदाच्या रचनेमुळें गोठून गेलेल्या समाजांत व्यक्तींच्या यथाशक्य प्रगतीला मोकळीक मिळत नाहीं. चारित्र्य-वान् वर्गाची वरिष्ठता आणि व्यक्तिविकासाला अनुकूल असा लवचीकपणा असलेला आदर्श समाज जोंपर्यंत निर्माण केला नाहीं तोंपर्यंत इंग्लिश आणि हिंदी लोकांनीं एकमेकांच्या समाजपद्धतीला नांवें ठेवण्यापेक्षां आपापल्या समाजरचनेचीं ध्येयें पारखून त्यांत सुधारणा करण्यांत वेळ खर्च केल्यास त्यांत उभय समाजांचें आणि त्यांतील कनिष्ठ मानल्या गेलेल्या बहुजनसमाजांचें कल्याण आहे.

---

## प्रकरण एकविसावें

# इंग्लंडमधील 'इंडिया'

" इंडिया " हा शब्द इतर देशांत कोठेंही पाहिला म्हणजे हिंदी माणसाला आनंद होतो. कारण, साधारणतः कोठेंहि असा उल्लेख आला तर तो आपल्या देशाला गौरवपूर्ण असा असतो. परंतु 'इंडिया' शब्दाचा सूचितार्थ इंग्लडमध्यें व इतर देशांत अतिशय भिन्न आहे. जर्मनी, अमेरिका, फ्रान्स इ. देशांत 'इंडिया' म्हटल्याबरोबर तेथील लोकांना हिंदू लोकांची संस्कृति, त्यांच्या कला, धर्म, गूढवाद इ. गोष्टी सूचित होतात. परंतु इंग्लंडमध्यें " इंडिया "शब्द उच्चारल्याबरोबर तेथील लोकांच्या मनांत, साम्राज्याची वसाहत, सिव्हिल सर्व्हिसेस, गोल्फ, मिशन्स, व्यापार, मजा, इ. भावना उत्पन्न होतात. हिंदी लोक आणि त्यांची संस्कृति याबद्दल फारसा विचार त्यांच्या मनांत येत नाहीं. दुष्यंताला जो चंद्र काव्यपूर्ण वाटतो तोच विदूषकाला मोदकाप्रमाणें वाटतो. चंद्राचा सूचितार्थ उभयतांना निराळा ! अशीच 'इंडिया' शब्दाची परदेशांत स्थिति आहे. लंडनमध्यें रस्त्यांत एका जाहिरातींत हिंदुस्थानचा उल्लेख होता तो असा:—'मेक इंडियाज् मिलियन्स यूअर बायर्स'—" हिंदुस्थानांतील कोटयवधि लोकांची गिऱ्हाइकी मिळवा. " हिंदुस्थान म्हणजे एक बाजारपेठ, तेथें जावें, आपला माल विकावा, भांडवल घालून उद्योगधंदे उभारावेत, आणि सम्पत्ति मिळवावी, तेथें विलायती भांडवलावर स्थापन झालेल्या कम्पन्यांतून शेअर खरेदी करावेत, सिव्हिल सर्व्हिसमध्यें किंवा सैन्यांत आपलीं पोरेंबाळें घालावींत, अशा प्रकारच्या आर्थिक प्रवृत्तीच्या भावना इंग्लिश लोकांच्या मनांत 'इंडिया' शब्दानें जागृत होतात. सारांश इंग्लिश लोकांना इंडिया शब्दानें 'अर्थ'

इंडिया शब्दानें सुचणारे दोन अर्थ

असा अर्थबोध मुख्यतः होतो. वेस्ट–मिन्स्टर ॲबेमध्यें एक महा-युद्धाचें स्मारक आहे, त्यांत सर्व वसाहतींचा उल्लेख केला असून हिंदुस्थानचें नांव शिरोभागीं आहे. हा हिंदुस्थानचा गौरव आहे कीं 'हिंदुस्थान आमच्या साम्राज्यांत आहे ' या भावनेचा गौरव आहे तें प्रेक्षकांनीं व वाचकांनींच ठरवावें.

सामान्य व सुशिक्षित माणसांचे ग्रह

सामान्य माणसांचें हिंदुस्थानविषयीं मत दैनिक वृत्तपत्रांचे वाचनावरून बनलेलें असतें. तो 'टाईम्स' आणि 'मॉर्निंग पोस्ट' वाचीत असला तर साम्राज्यवादी, नाहीं तर एरवीं तटस्थ किंवा उदासीन प्रवृत्तीचा असतो. स्वतंत्र वाचनानें आणि अभ्यासानें आपलें मत बनविणारीं माणसें फार थोडीं! एका चांभाराशीं हिंदुस्थानविषयीं वाद घालतांना तो म्हणाला, 'हिंदी लोकांना इंग्रजांचें राज्य पाहिजे आहे. येथें तुमचे संस्थानिक आणि राजे आले होते. त्या सर्वांचें मत असें होतें कीं, इंग्रजांचें राज्य बरें! आम्हीं हिंदुस्थान जिंकलें आहे तें विनाकारण सोडून कां द्यावें?' दुसऱ्या एका फळ-विक्याशीं याच विषयावर बोलतांना तो म्हणाला, 'आम्ही आज हिंदुस्थानांतून बाहेर पडलों तर रशिया, जपान किंवा जर्मनी कोणी तरी येऊन तेथें बसेलच! मग आम्ही बरे नाहीं कां? हिंदुस्थान स्वतःचें रक्षण करूं शकत नाहीं म्हणून आम्हांला तें केलें पाहिजे. आमचें राज्य एवढें शांततेचें आहे म्हणून सर्व लोक सुरक्षिततेकरितां आमच्या राज्यांत येतात.' ही झाली सामान्य माणसांच्या अभिप्रायाची गोष्ट. आतां सुशिक्षित लोकांचा हिंदुस्थानाविषयीं काय समज आहे तो पाहा. एका ऑक्सफर्ड ग्रॅज्युएटशीं बोलतांना तो म्हणाला, 'आम्ही जर हिंदुस्थानांतून बाहेर पडलों तर हिंदू आणि मुसलमान लोक एकमेकांच्या उरावर बसतील आणि अंतस्थ कलह माजतील.' सारांश, साम्राज्य-

वादी वृत्तपत्रें, मिशनरी लोक आणि हिंदुस्थानांत व वसाहतींत सिव्हिल किंवा मिलिटरी सर्व्हिस करून परत आलेल्या लोकांच्याकडून मिळालेल्या माहितीच्या आधारावर सामान्य जनांचें हिंदुस्थानविषयीं मत झालेलें असतें. तें हिंदुस्थानला अनुकूल झालें तर ती केवळ एक आश्चर्याची गोष्ट ! दोन शतकांच्या इंग्लिश राज्यानंतर हिंदुस्थानांत राहिलेली शेंकडा नव्वद निरक्षरता, नष्ट झालेले उद्योगधंदे, आणि लोकांची गरीबी यांची येथील लोकांना मुळींच जाणीव नसते आणि स्वत:ला असलेली अपुरी माहिती आणि अर्धवट परिचय त्यांना पुरेसा वाटतो. इंग्लंड-मध्यें असलेल्या ३,००० हिंदी विद्यार्थ्यांपैकीं किती जणांना एकाद्या सभेंत हिंदुस्थानविषयीं बोलण्याचा प्रसंग येत असेल याची शंका आहे. अमेरिकेंत हिंदी विद्यार्थी असला म्हणजे निदान चारपांच सभांत तरी तो हिंदुस्थानविषयीं बोलल्याशिवाय परत जाऊं शकत नाहीं. या दृष्टीनें, इंग्लंडमधील ३,००० विद्यार्थी म्हणजे केवढें महत्त्वाचें साधन आहे. परन्तु इंग्लिश लोकांची उदासीनता आणि विद्यार्थ्यांचा भिडस्तपणा यांचेमुळें मतपरिवर्तनाचे दृष्टीनें या विद्यार्थ्यांच्या इंग्लंडमधील राहणीचा हिंदुस्थानला फारसा उपयोग होऊं शकत नाहीं.

लंडनमधील विशिष्ट परिस्थितीमुळें हिंदी विद्यार्थ्यांना इंग्लिश समाजांत राहण्याचा किंवा त्यांत मिसळण्याचा प्रसंग येत नाहीं.

**लंडनमधील हिंदी वसाहत**

हिंदी विद्यार्थ्याला कुलीन घराण्याच्या वस्तींत अथवा वाड्यांत जागा मिळणें कठीण जातें. अशा एकाद्या घरमालकिणीकडे विद्यार्थी जागा मागण्यास गेला तर उघड ‘नाहीं’ म्हणून न सांगतां ती वीस शिलिंगां-ऐवजीं वीस गिनी भाडें सांगते आणि लगेच दणकन् दार आपटून

लावून घेते! त्यांतून एकाद्या मालकानें धिटाईनें एकादी खोली हिंदी विद्यार्थ्याला दिली कीं लगेच इतर स्थानिक भाडेकरी तो वाडा सोडून देतात, जागेचें भाडें कमी होतें आणि लौकरच तेथें हिंदी विद्यार्थी येऊन राहूं लागतात. अशा या वृत्तीमुळें हिंदी विद्यार्थ्यांची वस्ती कांहीं एका विवक्षित भागांत अधिक झाली असून त्या भागाला इंग्लिश लोक उपहासानें 'इंडियन झू' अशी संज्ञा देतात, असें तेथील कांहीं लोकांनीं सांगितलें. अशा स्थितींत हिंदी विद्यार्थी तेथें महिनेच्या महिने राहिला तरी समान दर्जावर स्थानिक लोकांचा खाजगी रीतीनें परिचय येऊं शकत नाहीं. कॉलेज आणि सार्वजनिक संस्था या ठिकाणीं येईल तेवढाच संबंध. या नियमाला कांहीं अपवाद असतील, पण त्यामुळें सामान्य सिद्धांताला बाध येत नाहीं.

सुधारलेली अस्पृश्यता

प्रत्येक समाजांत त्या समाजाचे कांहीं अस्पृश्य भाग असतात. हिंदुस्थानांतील अस्पृश्यतेच्या जातींची अस्पृश्यता आज विसाव्या शतकांत प्रगतीची घमेंड मारणाऱ्या राष्ट्रांत असावी हें दुर्भाग्य आहे. अमेरिकेंत नीग्रो लोक अस्पृश्य, इंग्लंडमध्यें हिंदी लोक अस्पृश्य, आणि आतां जर्मनींत यहुदी लोकांची नवीन स्थापन झालेली अस्पृश्यता—या सर्व गोष्टी पाहिल्या म्हणजे असें वाटतें कीं, हिंदुस्थानांत स्पृश्यास्पृश्यांचा लढा जो लहान प्रमाणांत चालू आहे तो कालांतरानें जगाचे राजकारणांत दिसूं लागेल. आजपर्यंतचीं महायुद्धें राज्यांच्या सीमा वाढविण्याकरितां झालीं. यापुढें एकादें महायुद्ध कदाचित् गोरे आणि काळे या लोकांतील श्रेष्ठता—कनिष्ठता प्रस्थापित होण्याकरितां होईल. अमेरिकन, इंग्लिश आणि जर्मन लोकांनीं बहुतेक सर्व पौर्वात्यांना ते काळे म्हणून आपल्याशीं सहवास करून राहण्यास नालायक ठरविलें आहे. हिंदी आणि चिनी लोक दुबळे आहेत आणि आफ्रि-

करून समाज अद्याप बाल्यावस्थेंत आहे, तोंपर्यंत हा सामाजिक उपमर्द सहन केला जाईल. परंतु एकदां हे समाज बलवान् झाले म्हणजे श्वेत—कृष्ण या प्रश्नाची शहानिशा केवळ ग्रंथांतरीं आणि कायद्यांत न होतां समरांगणावर होईल असें वाटतें. परंतु वर्तमान परिस्थितीचे दृष्टीनें तो लांबचा प्रश्न आहे.

हिंदुस्थानला बोध

इंग्लंडमधील एकंदर परिस्थिति आणि वातावरण यांपासून हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या दृष्टीनें एक महत्त्वाचा बोध घेण्यासारखा आहे. साम्राज्य स्थापन करणाऱ्या आणि त्याप्रीत्यर्थ परदेशांत आपलें रक्त सांडून देह ठेविलेल्या वीरांचीं स्मारकें इंग्लंडमध्यें जागजागीं आहेत. ईस्ट इंडिया कंपनीपासून आजपर्यंत, क्लाईव्हपासून जनरल डायरपर्यंत, जीं कमीअधिक महत्त्वाचीं माणसें हिंदुस्थानांत साम्राज्याकरतां काम करून गेलीं आहेत, त्यांचीं थडगीं व स्मारकें इंग्लंडमध्यें आहेत, आणि त्यांचे नातेवाईक तेथें आहेत. त्यांचें स्मरण जोंपर्यंत इंग्लिश लोकांना आहे तोंपर्यंत त्यांच्या हिंदुस्थान-विषयक कल्पनांत फारसा फरक होईल असें वाटत नाहीं. साम्राज्य मिळविण्याकरितां इंग्लंडनें जो स्वार्थत्याग केला तितका त्याग केल्या-खेरीज हिंदुस्थानला आपलें स्वातंत्र्य मिळणें शक्य नाहीं. नोकऱ्यांचे दृष्टीनें कित्येकांचे स्वार्थ हिंदुस्थानशीं निगडित झालेले आहेत, कित्येकांचीं मुलेंबाळें सिव्हिल, मेडिकल आणि मिलिटरी सर्व्हिसच्या दृष्टीनें तयारी करीत आहेत, कित्येकांचें व्यापारी भांडवल हिंदु-स्थानांत गुंतलें आहे. अशा रीतीनें हजारों लोकांचें जीवन हिंदुस्थानवर अवलंबून आहे आणि त्याच्या चारपांच पट लोक या लोकांवर अव-लंबून आहेत. अशा परिस्थितींत इंग्लिश मनुष्य कितीही उदार असला तरी स्वतःचा चरितार्थ ज्यावर अवलंबून आहे असें मुख्य

आर्थिक साधन सोडून देण्यास तयार होणार नाहीं. या सर्व गोष्टी जमेस धरून दुसऱ्यावर किती विश्वास टाकावयाचा आणि स्व-सामर्थ्यावर किती अवलंबून राहावयाचें याचा विचार करून हिंदुस्थाननें आपला पुढचा मार्ग आंखला पाहिजे.

---

## प्रकरण बाविसावें

# इंग्लिश स्वभावांतील विशेष

इंग्लिश स्वभावाचे दोन प्रकार

हिंदुस्थानांत अथवा आफ्रिकेंत नोकरी करून आलेल्या इंग्लिश माणसाचे मनांत पौर्वात्यांविषयीं हीनभाव असतो आणि स्वतःचा दर्जा त्यांचेपेक्षां मोठा असून तो कायम ठेवला पाहिजे ही त्याचे ठिकाणीं जाणीव असते. वास्तविक पाहातां हिंदुस्थानांत नोकरी करून, तेथील अन्न खाऊन इस्टेट करून परत इंग्लंडमध्यें आलेल्या माणसाचे ठिकाणीं हिंदुस्थानाबद्दल कृतज्ञता आणि आलेल्या हिंदी माणसांना अगत्यानें वागवून त्यांना हरएक प्रकारें सहाय्य करण्याची प्रवृत्ति असावी अशी हिंदी माणसाची अपेक्षा असते. परंतु इंग्लंडमध्यें राहिलेल्या हिंदी विद्यार्थ्यांचा एकंदर अनुभव जमेस धरतां वरील अपेक्षेला पुष्टिकारक असा पुरावा मिळत नाहीं. कदाचित् हिंदुस्थानच्या अन्नाचा हा गुण असावा. स्वदेशाबाहेर शिकत असलेले हिंदी विद्यार्थी अंदाजें पांच हजार आहेत. त्यांतील चार ते साडेचार हजार विद्यार्थी एका ग्रेट-ब्रिटनमध्यें आहेत. अमेरिकेंत अंदाजें तीनशें विद्यार्थी असून त्यांतील शेंकडा पन्नाससाठ विद्यार्थी कॉलेजमध्यें शिष्यवृत्ति, नादारी व अर्धनादारीच्या मदतीनें शिकत आहेत. जर्मनीमध्यें दरवर्षी शिष्यवृत्तीवर कांहीं हिंदी विद्यार्थी येतात. परंतु अशा प्रकारें

मदत मिळवून शिकत असलेल्या इंग्लंडमधील हिंदी विद्यार्थ्यांची संख्या बोटांवर मोजण्याइतकी देखील नसेल. हिंदुस्थानच्या संपत्तीवर श्रीमंत झालेल्या इंग्लिश राष्ट्राकडून हिंदी विद्यार्थ्यांकरतां यापेक्षां अधिक सहाय्य व्हावयास पाहिजे.

काळा–गोरा ही भावना इंग्लंडमध्यें प्रबळ आहे. आणि निमित्तानिमित्तानें ती वृत्तपत्रांकडून जागृत ठेविली जाते. मध्यंतरीं आफ्रिकेंत एका काळ्या संस्थानिकानें नैतिक अपराधाबद्दल एका गोऱ्या अधिकाऱ्यास गैरकायदा झोडपलें होतें. त्याची बातमी देतांना वृत्तपत्रांनीं वर्णद्वेषाच्या भावनेवरच अधिक भर दिला. बातमीवर मथळे देतांना 'White Man Flogged' ( गोऱ्या माणसास फटके मारले ) असें वाक्य घातलें व श्वेतवर्णावर मुख्य जोर देऊन गुन्हेगाराच्या अपराधाला गौणत्व दिलें.

सारांश, वसाहतींत जाऊन आलेल्या माणसाला आपलें साम्राज्य काय याची मूर्तिमंत जाणीव असते, कारण त्यानें इतर लोकांवर साम्राज्यवृत्ति गाजविलेली असते. त्यामुळें पांढऱ्या माणसाचा दर्जा कायम ठेवून काळ्या माणसांवर हुकमत आणि वचक ठेविला पाहिजे याची जाणीव त्यास असते, आणि हिंदी माणसांशीं वर्तन करतांना त्याचे ठिकाणीं मनमोकळेपणा, आदर आणि स्वाभाविक मानवी वृत्ति हे अपेक्षित गुण तितक्या प्रमाणांत दिसत नाहींत.

वरील प्रकारचे राजकीय आणि वर्णविषयक संबंध सोडून दिले तर इंग्रज मनुष्य अत्यंत सभ्यपणानें आणि अगत्यानें वागतो.

**अस्सल इंग्लिशमन्**

लंडनमध्यें तुम्हीं रस्ता चुकलां आणि एकाद्यास तुम्हीं मार्ग विचारला तर तो आपलीं दोन मिनिटें खर्च करून तुम्हांस मार्गाला लावून देईल आणि मग आपल्या कामाला जाईल. अर्थात् ही वृत्ति

केवळ लंडनमध्येंच नसून युरोपमध्यें कोणत्याहि समाजांत आढळून येते. इंग्लिश मनुष्य अधिक औपचारिक रीतीनें आणि शिष्टपणाच्या सांप्रदायिक कल्पनांना अनुसरून वागत असतो. त्यामुळें त्याची ओळख होण्यास प्रथम वेळ लागतो, आणि बराचसा संबंध आल्याशिवाय आपलेपणाचे अगत्याचे संबंध जडत नाहींत. याचे अगदीं उलट अमेरिकन स्वभाव आहे. अमेरिकन मनुष्य भेटल्याबरोबर आपण होऊन हस्तांदोलन करून स्वतःचें नांवगांव सांगून देईल आणि औपचारिक शिष्टाचाराच्या कल्पनांचे भरीस न पडतां निकट मैत्रीचें नातें जोडील. पहिल्या भेटींतच अमेरिकन मित्र तुम्हांला भोजनास किंवा चहास बोलावील. परंतु इंग्रज मनुष्य प्रथम तुमच्या घरीं येऊन तुमची पूर्ण माहिती झाल्याशिवाय स्वतःचे घरीं बोलाविणार नाहीं, परंतु एकदां बोलाविल्यावर मात्र स्वतःचे कुटुम्बांतील माणसाप्रमाणें अगत्यानें वागवील.

हिंदुस्थानांतील शहरांमधून जो शेजारधर्म दिसतो तो इंग्लंडमधील शहरांत नाहीं. सायंकाळीं भोजन झाल्यावर इंग्लिश कुटुंब आपल्या घरीं बसेल, अथवा फार तर थिएटरमध्यें करमणुकीस जाईल. परंतु शेजाऱ्यानें बोलाविल्याशिवाय 'कसें काय आहे, आज भाजी काय केली होती, आणि अमक्याची प्रकृति कशी काय आहे?' अशा शिळोप्याच्या गप्पा मारण्यास जाणार नाहीं. घरांत आई एकटी असली आणि तिला बाहेर जावयाचें असेल तर मूल शेजाऱ्याचे स्वाधीन करून जाण्याची आपल्याकडे पद्धत आहे. पण तशा प्रकारचा शेजारधर्म इंग्लंडमध्यें दिसत नाहीं. इंग्लिश मनोवृत्ति अधिक व्यक्तिनिष्ठ आहे.

घरांतील राहाणी व कुटुंब

मध्यम प्रतीचे इंग्लिश कुटुम्बांत साधारणपणें पांचसहा

खोल्या असून घरांत रेडिओ, पियानो, आणि क्वचित् टेलिफोन असतो. बहुतेक लोक आठवडयांतून एकदां तरी सिनेमा, नाटक अथवा संगीतश्रवणास जातात. या गोष्टी मनाची सुसंस्कृतता वाढविण्यास अगत्य आहेत असें समजलें जातें. इंग्लंडमधील जन्मसंख्या कमी होऊं लागली आहे असें शाळाखात्याचे रिपोर्टावरून समजतें. लंडन शेजारील एका गांवांत पांचसहा कुटुम्बांपैकीं फक्त एका कुटुम्बांत दोन लहान मुलें होतीं. इतरांनीं अनेक कारणांस्तव स्वतःस संततिनिबंध घालून घेतला होता. जपाननें या प्रवृत्तीचें अनुकरण केलें तर लोकसंख्येच्या वाढीमुळें शेजार राष्ट्राशीं युद्ध करण्याचा प्रसंग त्याचेवर येणार नाहीं!

**इंग्लिश तें सर्व उत्कृष्टच**

इंग्लिश लोकांचे ठिकाणीं आत्मविश्वास आहे. क्वचित् काळीं त्याचें आत्मप्रौढींत आणि गर्वांत रूपांतर होतें. आपली राज्यपद्धति जगांत उत्कृष्ट आहे, आपलें शिक्षण आणि शाळांचा दर्जा इतरांचेपेक्षां श्रेष्ठ आहे, आपली संस्कृति सर्वांत उत्तम आहे अशा प्रकारची ह्यांची भावना असते. अर्थात् स्वतःचें उत्कृष्ट असल्यावर इतरांचें कनिष्ठ असलेंच पाहिजे. इंग्लिश लोकांविषयीं आदराचे उद्गार मी पुष्कळ अमेरिकनांचे तोंडून ऐकले, परंतु अमेरिकन लोकांविषयीं गौरवपर शब्द एकाही इंग्रज माणसाचे तोंडून ऐकले नाहींत. इंग्लिश लोकांना स्वतःच्या शीलमत्तेविषयीं फार अभिमान आहे. इतर राष्ट्रांचे शिक्षणपद्धतींतही चारित्र्यशिक्षणाचा भाग असेल अशी कल्पना त्यांस होत नाहीं. सारांश आपलें तेंच सर्व श्रेष्ठ ही भावना स्वाभिमानाचे दृष्टीनें चांगली असली तरी तिला चिकित्सक वृत्तीची आणि परसहिष्णुतेची जोड नसली तर तिचें आत्मप्रौढींत रूपांतर होतें, व त्यामुळें समाजाचे ठिकाणीं एक प्रकारची आत्म-

संतुष्टता आणि अहंभाव वाढून त्याची विकासक्षमता नाहींशी होते.

सामान्यतः इंग्लिश माणसांचा स्वभाव संस्कृतिप्रिय आहे. रविवारीं आणि सुट्टीचे दिवशीं लोक चित्रकलेचीं प्रदर्शनें अथवा म्यूझियम्स पाहण्यास जातात. उत्कृष्ट दर्जाच्या नाटकास आणि चित्रपटास लोकांची गर्दी होते आणि त्याकरतां तासतास थंडींत उभें राहाण्याची त्यांची तयारी असते. शनिवारीं आणि रविवारीं थिएटरें असलेल्या प्रांतांतून इतकी गर्दी असते कीं, चालण्यास रस्ता मिळत नाहीं. लोक आठवडाभर सपाटून काम करतात आणि शेवटचे दिवशीं सर्व दिवस करमणुकींत आणि विश्रांतींत घालवितात.

संस्कृतीची आवड

---

प्रकरण तेविसावें

## इतिहासांतून जन्मलेला इटली

इटली हें पाश्चात्य प्रवाशांच्या यात्रेचें स्थान आहे. अमेरिका, इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी वगैरे सर्व देशांहून रोम, मिलान, व्हेनिस, फ्लॉरेन्स, नेपल्स इत्यादि शहरें पाहण्याकरितां उन्हाळ्यामध्यें प्रेक्षकांच्या झुंडी येत असतात. नाशिक, पंढरपूर, बनारस वगैरे ठिकाणीं यात्रेकरूंच्या गरजा भागवून त्यांवर निर्वाह करणारा मोठा समाज असतो तशीच इटलीच्या कांहीं शहरांची स्थिति आहे. इटलींत येणारे हे प्रवासी केवळ धार्मिक निमित्तानें येत नाहींत, असें असलें तरी रोमला जाऊन 'पापाचें' म्हणजे पोपचें दर्शन घेतल्याशिवाय जात नाहींत. रोम हें कॅथॉलिक ख्रिस्ती लोकांच्या धर्मगुरूचें स्थान आहे. त्याकारणानें सर्व जगांतून अस्सल आणि बाटलेले ख्रिस्ती लोक आचार्यांचे दर्शनाला येत असतात. परंतु या धर्मक्षेत्रापेक्षां कला व

पाश्चात्यांचें बनारस

इतिहास यांचें क्षेत्र म्हणून इटलीची प्रसिद्धि अधिक आहे. उत्कृष्ट चित्रकला, स्वर्गीय संगीत, जगप्रसिद्ध मूर्तिशिल्पकला (Sculpture) आणि इतिहासप्रसिद्ध इमारती व अवशेष यांचें वैपुल्य इटलीमध्यें इतकें आहे कीं या कलांच्या जिज्ञासूंचा व अभ्यासकांचा प्रवाह इटलीमध्यें सारखा वाहात असतो.

रसिकांचें यात्रास्थान

फ्लॉरेन्समध्यें अतिशय जुन्या रंगचित्रांचे (Paintings) नमुने तेथील जगप्रसिद्ध आर्ट गॅलरींत असल्यानें कलातज्ञ त्या ठिकाणीं जात असतात. मिलानमध्यें उत्कृष्ट शिल्पकला पहावयास सांपडते. व्हेनिस व रोम हीं शहरें ऐतिहासिक अवशेष या दृष्टीनें प्रसिद्ध आहेत. नेपल्स शेजारीं पॉंपी हें शहर दोन हजार वर्षांपूर्वी ज्वालामुखीच्या राखे-खालीं पुरलें गेलें. तें सध्यां मोकळें केलेलें असल्यामुळें जुनी संस्कृति व समाज–पद्धति काय होती या गोष्टी तर्कावर अवलंबून न ठेवतां प्रत्यक्ष स्वरूपांत तेथें पाहावयास सांपडतात. रोमची तुलना दिल्लीशीं करितां येईल. दिल्लीच्या भोंवतालीं अनेक मैल जुन्या सात राज-धान्यांचे अवशेष आहेत त्याचप्रमाणें रोमच्या भोंवतालीं दोन अडीच हजार वर्षांचे ऐतिहासिक अवशेष आहेत. यूरोपचें स्वामित्व ज्यावेळीं रोमन लोकांकडे होतें त्या वेळेचे साम्राज्यसूचक अवशेष अद्याप रोमच्या भोंवतालीं दृष्टीस पडतात.

स्फूर्ति देणारा इतिहास

अशा या ऐतिहासिक परंपरेमधून आज इटली वर आलेला आहे. 'ज्या राष्ट्राला इतिहास नाहीं त्याला उज्वल भविष्यकालही नाहीं' ही म्हण कदाचित् खरी नसली तरी 'ज्या राष्ट्रानें आपल्या इतिहासाचा उपयोग करून घेतला आहे त्याला दिव्य असा भविष्यकाल निश्चित आहे' ही गोष्ट मात्र सत्य आहे. मुसोलिनीनें अधिकारसूत्रें हातांत

घेतल्यानंतर पहिली महत्त्वाची गोष्ट केली ती अशी कीं, सर्व ऐतिहासिक अवशेषांचा पुनरुद्धार करण्याकरितां त्यानें एक खातें काढून त्याचेवर मुबलक पैसा खर्च केला. सुस्त झालेल्या इटालियन लोकांना जागें करावयाचें असेल तर त्यांचा वैभवशाली इतिहास त्यांचे नजरेपुढें मूर्तिमंत स्वरूपांत उभा पाहिजे हें तत्त्व त्यानें ओळखलें. आतांपर्यंत उत्खननाचें काम परकीय देशांचे खर्चानें होत असे पण आतां इटलीनें हें काम स्वाभिमानानें स्वतःचे अंगावर घेतलें आहे. आजचा इटली काय आहे हें समजून घ्यावयाचें असेल तर इटालियन लोकांचे नजरेपुढें असलेला पूर्वीच्या साम्राज्यांचा मूर्तिमंत इतिहास लक्षांत घेतला पाहिजे. या इतिहासांतून इटलीच्या राष्ट्रीय मनाची घडण झालेली आहे. ज्या रोमनें एकवेळीं युरोपभर साम्राज्य गाजविलें, ज्या रोमन लोकांनीं इंग्लंडवर राज्य केलें, ज्या रोमन बादशहांनीं पूर्वेस आशियापर्यंत व दक्षिणेस अफ्रिकेपर्यंत आपलें साम्राज्य पसरलें, त्याचे आपण वंशज आहोंत. जी गोष्ट आपण पूर्वी केली ती आपण पुढेंही करूं शकूं. एकवेळीं रोमला जगांत जो मान होता, तो पुनः मिळाला पाहिजे. अशा प्रकारची मनोवृत्ति, महत्त्वाकांक्षी इटालियन लोकांची झालेली आहे. या वृत्तीचा परिणाम जगाचे राजकारणावर झाल्याशिवाय राहाणार नाहीं.

सुस्त समाजाला धक्का

प्रत्येक समाजाला बाल्य, तारुण्य व वार्धक्य अशा अवस्था येत असतात आणि त्यांचीच पुनरावृत्ति होत असते. इटलीचेंही तसेंच झालें. कांहीं काळ इटली पारतंत्र्यांत होता. वृद्धावस्था आलेल्या समाजाला बाहेरून जोराचे धक्के बसले म्हणजे तो पुनः जागा होऊन त्याला पुनर्जन्म प्राप्त होतो तसें इटलीचें झालें. ऑस्ट्रियाचे सत्तेखालीं गुलाम झालेल्या इटलींत काव्हूर, मॅझिनी, गॅरिबाल्डी-

सारखे देशभक्त निर्माण झाले आणि त्यांनीं आपला देश स्वतंत्र्य केला. परंतु अनेक वर्षें पारतंत्र्यांत असलेला देश स्वतंत्र झाला तरी एकदम वैभव शिखरावर चढूं शकत नाहीं. विधायक कार्यक्रम आंखून तो लोकांवर लादून करून घेणारे पुढारी उदयास यावे लागतात. इटली स्वतंत्र झालेला होता तरी बहुजन समाजाचे वृत्तींत फारसा फरक पडला नाहीं. स्वातंत्र्याकरितां राज्यक्रांति झाली पण ती समाजाच्या खालच्या तळापर्यंत जाऊन पोंचली नाहीं. म्हणून मुसोलिनीनें पुन: अशा प्रकारची फासिस्ट राज्यक्रांति घडवून आणली कीं जिच्यामुळें सर्व इटली राष्ट्र गदगदा हालविलें गेलें. राजकीय क्रांतीबरोबर सामाजिक आणि आर्थिक क्रांति झाली तर त्या समाजांत कांहीं फरक पडतो, नाहीं तर फ्रेंच राज्यक्रांतीनंतर झालें त्याप्रमाणें समाज आपल्या पूर्वीच्या वळणावर पुन: जावयास लागतो.

मागासलेला समाज

इटलीमध्यें, विशेषत: दक्षिण भागांत प्रवास करणाराला हिंदुस्थानचीच आठवण होते. पूर्व यूरोपमधील इतर देश आणि इटली यांचे राहाणींत व संस्कृतींत एकदम फरक वाटतो. या इटालियन लोकांची एकंदर राहणी व स्वभाव पाहिला म्हणजे मुसोलिनीसारखा मनुष्य तेथें कां उदयाला आला व त्याची काय जरूर आहे तें लक्षांत येतें. इटालियन लोक गरीब आहेत; त्यांचा राहाणीचा दर्जा पूर्व यूरोपचे मानानें बराच खालच्या दर्जाचा आहे. त्यांच्यांत आतांपर्यंत शिक्षण बेताबाताचेंच होतें. मुख्यत: शेतीवर राहणारा हा देश परंतु अलीकडे यांत्रिक उद्योगधंदे वाढलेले आहेत. रेल्वेच्या तिसऱ्या वर्गांतून प्रवास केला म्हणजे इटलीच्या सामान्य जनसमाजाची ओळख होते. स्वच्छता, पद्धतशीरपणा, शिष्टाचाराच्या विशिष्ट पद्धति यांचा प्रसार समाजाच्या खालच्या थरापर्यंत झालेला नाहीं. शहरांची मांडणी, रस्ते,

दुकानें, कोपऱ्या कोपऱ्यावरील लहान देवळें इत्यादि बाह्य स्वरूप पाहिलें म्हणजे भौतिक दृष्ट्या हा समाज अद्याप मागासलेला आहे ही गोष्ट प्रत्ययास येते. लोकांच्या अंगावरील पोषाख सामान्य प्रतीचाच गरीबीचाच दिसतो. रस्त्यांमधून पावसाळ्यांत चिखल होतो. त्यामुळें फारशी स्वच्छता राहूं शकत नाहीं. दुकानांतून व स्टोअर्समधून ठेविलेला माल पाहिला म्हणजे त्यांत इटलीमध्यें केलेला माल फार थोडा आहे असें दिसून येतें. अमेरिका–जर्मनीमधील स्टोअर्समध्यें दिसणारें वैभव तेथें दिसत नाहीं. अशा या समाजाला यूरोपमधील उत्कृष्ट राष्ट्राचे तोडीस नेऊन बसविण्याची मुसोलिनीची महत्त्वाकांक्षा आहे.

**समाजांत शिस्त व चारित्र्य पाहिजे**

राजकीय दृष्ट्या जशी फॅसिस्ट राज्यक्रांति केली तशी हळुहळू समाजाच्या जीवनांत क्रांति करावी असा मुसोलिनीचा प्रयत्न चाललेला आहे. इटालियन लोकांना नवीन युगांत आणून बसविण्याची व त्याकरितां योग्य तें शिक्षण देण्याची त्याची खटपट चाललेली दिसून येते. रस्त्यावरून नागरिकांची रहदारी कशी चालावी याकरितां पोलीस रस्त्यांत उभे राहून नागरिकांना शिक्षण देत असतात. देशांतील गुन्हे कमी करून समाजाला चारित्र्याचें शिक्षण द्यावें असा प्रयत्न चाललेला आहे. रोममध्यें रस्त्यांतून फिरतांना एकदोन तरी पोलीस सहज भेटतील. या रक्षकांची समाजावर सगळीकडे सारखी नजर असल्यामुळें गुन्ह्यांची संख्या पूर्वीपेक्षां कमी झाली आहे असें सांगतात. अशा रीतीनें समाजाचे स्वभावांत क्रांति घडवून आणणें किती जरूर आहे तें इटलींत फिरून येणाऱ्या प्रवाशाला चांगलें कळतें. कारण इटालियन शहरांतील लोकांशीं संबंध आल्यानंतर त्यांचे स्वभावाबद्दल सौम्य भाषेंत कां होईना तक्रार केली नाहीं असा मनुष्य

सांपडणे कठीण. हॉटेलवाला स्टेशनवर ठरवील एक दर आणि प्रत्यक्ष घरीं गेल्यावर निराळाच दर सांगेल. स्टेशनवर चिरीमिरी मिळण्याकरितां कोणी तरी अधिकारी लगेज् अडवून धरील, आणि हातावर कांहीं पडल्यावर सोडून देईल. अशा या समाजामध्यें स्वाभिमान, महत्त्वाकांक्षा, राष्ट्रीयत्व आणि लष्करी शिस्त उत्पन्न करण्याचें काम फॅसिस्ट लोकांनीं चालविलेलें आहे. इटलीमध्यें एकतंत्री अंमल आहे ही गोष्ट खरी आहे. परंतु इटालियन लोकांचा स्वभाव लक्षांत घेतां कांहीं काळपर्यंत, इटलीला जगांत मान्यतेचें स्थान मिळेपर्यंत व परचक्रापासून आत्मरक्षण करण्याचें सामर्थ्य देशांत येईपर्यंत, एकतंत्री अंमलाखालीं लोकांना शिस्त, चारित्र्य व सुसंस्कृत जीवनपद्धति शिकविणें किती जरूर आहे हें प्रत्यक्ष तो समाज पाहिला म्हणजे समजतें. कैसर बादशहांच्या अंमलाखालीं विस्कळीत असलेला जर्मनी जसा सामर्थ्यवान् झाला तसें इटलीला करावें असें तेथील पुढाऱ्यांना वाटतें. ही गोष्ट जर थोडक्या कालांत, द्रव्याच्या, मनुष्यबळाच्या व वेळेच्या काटकसरीनें घडवून आणावयाची असेल तर आपद्धर्म म्हणून एकतंत्री अंमल असणें जरूर आहे. ही नैमित्तिक जरूर असली तरी नित्याची स्थिति असावी कां काय हा मात्र वादग्रस्त प्रश्न आहे.



## प्रकरण चोविसावें

# फॅसिझम्– आपद्धर्मांतील राजकीय वेदांत

रोममध्यें आज दोन प्रकारचे युनिफॉर्म दिसतात. एक लष्करी आणि दुसरा धार्मिक. हे दोन युनिफॉर्म म्हणजे दोन मन:प्रवृत्ती आहेत. इटलीला जडवादी समाजसत्तावाद कां मानवला नाहीं, तें समाजाची धार्मिक परंपरा लक्षांत घेतली असतां समजेल. पोपचें धर्मपीठ तेथें असल्यानें काळा, पांढरा, व तांबडा वेश घेतलेले संन्यासी व धर्मोपाध्याय सर्व शहरांतून दिसतात. त्याचप्रमाणें लष्करी पद्धतीचे निरनिराळ्या प्रकारचे पोषाख घातलेले सैनिक व बॅलिल्ला चळवळींतील बालसैनिक हेही रस्त्यांतून नेहेमीं दृष्टीस पडतात. लोकांच्या धर्मबुद्धीला धक्का न लावतां त्यांच्यांत लष्करी सामर्थ्य व राष्ट्रीय वृत्ति निर्माण करण्याचें धोरण मुसोलिनीनें ठेविलें. त्या कारणानें धार्मिक बाजूकडून त्याला होणारा विरोध कमी झाला. आज इटलींतील प्रत्येक शाळेमध्यें मुसोलिनी आणि पोप यांच्या तसबिरी शेजारीं शेजारीं लाविलेल्या असतात, त्यावरून फॅसिझमनें धर्माची आणि राजकारणाची सांगड कशी घातली आहे तें ध्यानांत येतें.

धर्म व राजकारण यांचें सख्य

महायुद्धांतून ज्या अनेक क्रांत्या निघाल्या व जे अनेक राजकीय वेदांत निर्माण झाले त्यांत इटलींतील फॅसिस्ट राज्यक्रांति आणि तिला आधारभूत असलेला फॅसिझम यांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. जर्मनींत झालेली नॅशनल सोशालिस्ट राज्यक्रांति ही फॅसिझमचेंच एक स्वरूप आहे. फॅसिझम् आणि सोशालिझम् यांत कांहीं राजकीय व आर्थिक भूमिका समान आहेत. परंतु दोघांचीं आत्यंतिक ध्येयें

फॅसिझमची जन्मकथा

भिन्न आहेत. मुसोलिनी स्वतः एकवेळीं सोशालिस्ट मताचा प्रचारक होता. इटलींत लोकशाही स्थापन झाली होती, परंतु लोकशाही पद्धतीचा इटालियन लोकांना अनुभव नसल्याकारणानें देशांत सर्व बजबजपुरी माजली, पक्षोपपक्ष निर्माण झाले, लांचलुचपतीचे प्रकार वाढले आणि राजकीय सत्ता दुर्बल झाली. अशा वेळीं मुसोलिनीनें मनांत आणलें असतें तर सोशालिझम् किंवा फॅसिझम् यांपैकीं कोणतीही राज्यपद्धति तो स्थापन करूं शकला असता. परंतु एकंदर परिस्थितीचा व इटालियन मनोवृत्तीचा विचार करितां सोशालिझमचीं तत्त्वें–वर्गयुद्ध, जडवादी जीवन, आंतरराष्ट्रीय धोरण, खाजगी मालमत्तेचा सरकारी ताबा–समाजाला त्यावेळीं पचतील असें त्याला वाटेना, म्हणून त्यानें समाजवादाला प्रतिस्पर्धी परंतु इटलीला त्या परिस्थितींत मानवणारें असें राजकीय तत्त्वज्ञान निर्माण केलें. वर्गयुद्धाचे ऐवजीं राष्ट्राचे हिताकरितां सर्व वर्गांचें ऐक्य पाहिजे; जडवादी जीवनाचे ऐवजीं मनुष्याच्या उच्चतर अशा आध्यात्मिक जीवनाचें पोषण केलें पाहिजे; आंतरराष्ट्रीय हिताचे आधीं राष्ट्रीय हिताकडे पाहिलें पाहिजे; खाजगी मालमत्ता नष्ट न करितां तिच्यावर योग्य असें सरकारी नियंत्रण पाहिजे–अशा प्रकारची विचारप्रणाली निर्माण करून तिला फॅसिझम् असें नांव त्यानें दिलें. फॅसिझम्चा मूळ धात्वर्थ एकी असा आहे. त्याचें प्रतीक मुसोलिनीनें जुन्या इतिहासांतून घेतलेलें आहे. एकत्र बांधलेल्या काठ्या आणि परशु असें फॅसिझम्चें प्रतीक आहे, त्याचा साधा अर्थ एकी आणि क्षात्रतेज असा आहे.

फॅसिझम्चे तत्त्वज्ञानाचा पूर्णपणें विचार करून मग मुसोलिनीनें राज्यक्रांति घडवून आणली अशी परिस्थिति नसून राज्यक्रांति घडव-तांना आणि नंतर अनुभव घेतघेत त्यानें आपली भूमिका निश्चित

केली. कामकरी वर्गाविषयीं फॅसिझम्चें जें धोरण आहे त्यामुळें तो वर्ग संतुष्ट असल्याचें दिसत नाहीं. परंतु तसें स्पष्ट कोणी बोलत नाहीं. इटलींतील खरी माहिती केवळ संभाषणानें मिळविणें अशक्य झालें आहे. कारण प्रत्येकाला भीति वाटते कीं, भिंतीला कान आहेत, कशाला उगीच बोला ! कोणालाही एकादा प्रश्न विचारला कीं खांदे उडवून व चमत्कारिक तोंड करून तो निश्चित उत्तर देण्याचें टाळतो. त्यामुळें एकीकडे देशांतील परिस्थिति सुधारलेली दिसली तरी सामान्य जनतेंत समाधान किती आहे हें समजण्याला मार्ग नाहीं. एवढी गोष्ट खरी कीं, परिस्थितीप्रमाणें व अनुभवानें फॅसिझम्चें तत्त्वज्ञान हळूहळू निश्चित होत आहे. पण आज तरी स्थिति अशी आहे कीं मुसोलिनी सांगेल तोच फॅसिझम्. त्यामुळें या पंथांत आणखी काय फेरबदल होणार आहेत तें सांगणें कठिण आहे.

आपद्धर्मांतील वेदांत

त्रयस्थ भूमिकेवर उभें राहून विचार केला म्हणजे असें वाटतें कीं फॅसिझम् हा आपद्धर्माचा राजकीय मार्ग आहे. परकीय शत्रूशीं तोंड देण्याकरितां थोडक्या वेळांत राष्ट्रीय ऐक्य घडवून आणून समाजाला कार्यप्रवृत्त करावयाचें असेल तर फॅसिझम् तत्त्व चांगलें आहे. त्यामुळें जरूर तेवढ्या आर्थिक व राजकीय क्षेत्रांवर नियंत्रण ठेवून बाकीच्या क्षेत्रांत समाजाला त्याच्या परंपरेप्रमाणें राहण्याला मोकळीक मिळते, व समाजांत ऐक्याची भूमिका लौकर निर्माण होते. त्यामुळें वादाचे व मतभेदाचे मुद्दे कमी होतात व मुख्य राजकीय आणि आर्थिक घडामोडींवर लक्ष देतां येतें. परंतु अशा रीतीनें सत्ता, सुबत्ता आणि सुरक्षितता मिळाल्यावर या परिस्थितीचा उपयोग कोणत्या उच्चतर ध्येयाकरितां करावयाचा

या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर फॅसिझमनें दिलेलें नाहीं. प्रत्येक राष्ट्राला आपापल्या मनोवृत्तीप्रमाणें या प्रश्नाचें उत्तर देतां येईल.

हिंदुस्थानसारख्या एकाद्या राष्ट्राला विशिष्ट परिस्थितींतील आपद्धर्म म्हणून फॅसिझमचा स्वीकार करावा लागला तरी

आमचा राजकीय वेदांत

त्यांतील सर्वच इष्ट व अनिष्ट तत्त्वांचा अंगीकार त्यानें केला पाहिजे असें नाहीं. राष्ट्रीय ऐक्य, राष्ट्रीयत्वाकरितां सर्व वर्गांचा स्वार्थत्याग, समाजांतील सर्व वर्ग, पक्ष व जाती यांची सहकारिता, राष्ट्रहिताचे दृष्टीनें आर्थिक क्षेत्रावर नियंत्रण इत्यादि मुख्य तत्त्वांचा स्वीकार करून त्यांना आपल्या परिस्थितीप्रमाणें आवश्यक अशा इतर तत्त्वांची जोड दिली तर त्यांतून हिंदुस्थानचें राजकीय तत्त्वज्ञान निर्माण होऊं शकेल. इटलींत व जर्मनींत ज्याप्रमाणें नॅशनॅलिझम् व सोशालिझम् यांचा झगडा झाला व त्यांतून शेवटीं फॅसिझम् व नाझीझम् यांचा जन्म झाला, तशाच प्रकारची परिस्थिति पुढील दहा पंधरा वर्षांमध्यें हिंदुस्थानांत येईल. येथेंही राष्ट्रीयत्ववाद व समाजवाद यांच्यामध्यें झगडा सुरू व्हावयाचा आहे. त्यांतून शेवटीं समाजवादांतील आर्थिक नियंत्रण आणि कामगार वर्गाला त्याच्या श्रमाबद्दल वाजवी व न्याय्य मोबदला या तत्त्वांचा राष्ट्रीयत्वांत समावेश होऊन या दोहोंतून जर्मनीप्रमाणें राष्ट्रीय–समाजवाद निर्माण होईल असें वाटतें. या तात्त्विक वादाबद्दल देशांत अद्याप फारसा विचार झालेला नाहीं. यापुढचे राजकारणांत तो विचार लागणार असल्यानें जो प्रांत त्यांत आज पुढाकार घेईल तो हिंदुस्थानच्या भावी राजकारणांत पुढें आल्यावाचून राहणार नाहीं. एवढी गोष्ट मात्र निश्चित कीं पुढच्या दोनतीन पिढ्यांत तरी राष्ट्रीय–समाजवाद हाच हिंदुस्थानचा राजकीय वेदांत होणार आहे.

---

विभाग चौथा

# जग व हिंदुस्थान : आजचे विचारप्रवाह

प्रकरण पंचविसावें

## जगाचे विचारप्रवाहांत हिंदुस्थान

पुण्याचे एक विद्वान् स्नेही व मी इंग्रजी वर्षप्रतिपदेच्या रात्रीं न्यूयॉर्कच्या टाईम्स स्क्वेअरमध्यें होतों. या प्रसंगीं नवीन वर्षाचें स्वागत करण्याकरितां येथें लाखों स्त्रीपुरुष जमतात आणि खूप दंगल उडवून देतात. सणावाराचे दिवशीं आनंदोत्सव आणि मजा करण्याचे बाबतींत पाश्चात्य लोक फार हौशी असतात. या दिवशीं वरील ठिकाणीं लोकांची इतकी गर्दी झाली होती कीं, आम्ही त्या दंगलींत पार जिरून गेलों. आम्हांला स्वतःची दिशा आणि पाय राहिले नाहींत. गर्दीचा लोंढा जिकडे येईल तिकडे आम्ही हेलकावे खात होतों. माझे मनांत असा विचार आला कीं, आपल्या हिंदुस्थानची स्थितीही अशीच झाली आहे. जगामध्यें नवीन विचारांची गर्दी आज इतकी झाली आहे कीं, स्वतःचे स्थिर आसनाचे अभावीं आम्ही या जागतिक प्रवाहांत परवश होऊन वाहात जात आहोंत. आम्हांला स्वतःचे पाय व दिशा राहिलेली नाहीं.

विचारांचा लोंढा

पूर्वीच्या ऋषींप्रमाणें पांचसहा वर्षें समाधि—अवस्थेंत तपश्चर्या करून मग हिंदी समाजांत परत येणाऱ्या व्यक्तीला असें आढळून येईल कीं, या समाजांत न कळत क्रांति होत चालली आहे. कोठून तरी या देशांत वस्तूंचा आणि विचारांचा इतका वर्षाव होत आहे कीं कालांतरानें या समाजाचें मूळरूप पार बदलून

नकळत क्रांति

जाईल. आज आमचें बाह्य स्वरूप तर बदललेलें आहेच. आतां हे संस्कार हळुहळू आपल्या वैचारिक जीवनावर वर्चस्व गाजवूं लागले आहेत.

वस्तू–वळण–विचारांची आयात

पाश्चात्य व परक्या देशांतून आज वस्तू, विचार आणि वळण (फॅशन) या तीन गोष्टींची आयात मोठ्या प्रमाणावर होत आहे. बाजारांतील दुकानें आणि आपल्या घरांतील हरएक वस्तु पाहिली तर असें दिसून येईल कीं आपल्यावर या बाबतींत पाश्चात्यांनीं पूर्ण आक्रमण केलें आहे. स्त्रियांच्या लुगड्या–पातळांकरितां स्वदेशी सूत मिळण्याची मारामार झाली, इतकी आमच्या उद्योगधंद्यांची नालायकी वाढलेली आहे. घरांचे रंग, खिशांतील घड्याळें, फाऊंटनपेन, छत्र्या, दिवे, कांचा हरएक जिनसा आयातीच्या आहेत. या वस्तूंमुळें आमच्या राहणीच्या वळणावरही पाश्चात्यांचे संस्कार होऊं लागले आहेत. आज पुण्यामुंबईंतील सुशिक्षितांच्या घरांतील मुलामुलींचे, पुरुषांचे व स्त्रियांचे पोषाख पाहिले म्हणजे ही गोष्ट चटकन् लक्षांत येईल. आमच्या पारतंत्र्याची निशाणी जी साहेबाची टोपी ती देखील आज खादीची तयार होऊं लागली आहे. अर्थात् या सर्वच गोष्टींत मोठी हानि आहे असें नाहीं. जाणीव ठेवून बुद्धिपुरःसर या गोष्टींचा स्वीकार केल्यास त्यांत कांहींच वाईट नाहीं. जीवनाच्या बाह्य स्वरूपाच्या व कमी महत्त्वाच्या अशा या बाबी आहेत.

वस्तू आणि वळण यांबरोबर पाश्चात्य विचारही अत्यंत वेगानें या समाजांत येत आहेत. त्यांचा स्वीकारही आपण पूर्वी-इतक्याच अप्रबुद्धपणें व अविचारानें केला तर मात्र आपल्या समाजाचें, संस्कृतीचें, व तत्त्वज्ञानाचें वैशिष्टय नाहींसें होऊन जाईल.

गेलीं शंभर वर्षें हे विचार येत आहेत. परंतु अलीकडे या विचार-प्रचारांचीं साधनें वाढल्यामुळें व विचारांची पैदास मुबलक होत असल्यामुळें त्यांचा हिंदुस्थानवर परिणाम मोठ्या प्रमाणावर होत राहील.

नवीन विचारांचा वाढता वेग

अशा परिस्थितींत हे विचार काय आहेत त्याची चिकित्सापूर्वक जाणीव आमच्या सुशिक्षितांनीं ठेविली पाहिजे. यांतील त्याज्य कोणते आणि संस्कारोत्तर ग्राह्य कोणते याचा विचार आपण केला पाहिजे, आणि विचारांचा स्वीकार- प्रतिकार- संस्कार करण्याकरितां लागणारी सामाजिक व तात्त्विक कसोटी निर्माण केली पाहिजे. गेलीं तीस वर्षें आम्ही व्यावहारिक घडामोडींतच इतके गुंतून गेलों आहोंत कीं, समाजाचें तत्त्वज्ञान आणि ध्येय या दृष्टीनें विचार करण्यास आम्हांस वेळ मिळालेला नाहीं. आतां स्थिति अशी आली आहे कीं, असा विचार केल्याशिवाय यापुढें येणाऱ्या सामाजिक, राजकीय, आर्थिक आणि नीतिविषयक प्रश्नांचीं उत्तरें देतां येणार नाहींत. नवीन कालाला उचित व निश्चित अशा वेदांताचे अभावीं आपला समाज आज दोन टोंकाला ओढला जात आहे. पाश्चात्य विचार हेच प्रमाण व आदर्श म्हणून मानणारा एक पक्ष उत्पन्न झाल्याबरोबर दुसऱ्या टोंकाला पूर्वीची संस्कृति हीच आदर्श म्हणून उलट तोंड फिरविणारा दुसरा पक्ष आपली संघटना करूं लागला आहे. बहुजन वर्ग व व्यावहारिक लोक तात्कालिक गोष्टींवर नजर देऊन आजची वेळ मारून नेण्याचा प्रयत्न करीत आहेत.

स्वीकार, प्रतिकार कीं संस्कार ?

पाश्चात्य देशांतून इकडे येणारे विचार त्या त्या देशांतील औद्योगिक, आर्थिक, सामाजिक व राजकीय परिस्थितींतून जन्म पावलेले आहेत. हिंदुस्थानांतील परिस्थिति जसजशी इतर देशांशीं

समान होत जाईल, तसतसे तिकडील विचारही या देशांत जास्त प्रभावी होऊं लागतील. पाश्चात्य देशांतील अस्वस्थतेच्या व खळवळीच्या मुळाशीं कांहीं विशिष्ट कारणें आहेत.

नवीन युग. जुनी वृत्ति

औद्योगिक प्रगतीमुळें दळणवळणाचीं व परस्पर संबंधाचीं विपुल साधनें वाढलीं. विविध समाज व राष्ट्रें हीं भौतिक दृष्टीनें परस्परांचे अगदीं जवळ जवळ आलीं, त्यांचे संबंध अधिक निगडित झाले. एकाच समाजांतील विविध जातींचे व वर्गांचे परस्पर संबंध अधिक आले, राष्ट्रांचे परस्परसंबंधहि अधिक वाढले. परंतु या ऐहिक संबंधांत एक प्रकारची स्वार्थी दृष्टि होती व आहे. शरीरें जितकीं जवळ आलीं तितकीं अंतःकरणें जवळ आलीं नाहींत. त्यामुळें या निकटतेचा फायदा श्रेष्ठांनीं कनिष्ठाला, समर्थांनीं दुर्बलांना आणि श्रीमंतांनीं गरीबांना पिळून काढण्याकडे करून घेतला. सारांश, समाजांतील परस्पर संबंध वाढले पण त्यांत अनुकूल अशी नवीन मनोवृत्ति, धर्म, अथवा तत्त्वज्ञान निर्माण झालें नाहीं. यामुळें ज्यांच्यावर आजपर्यंत जुलूम झाले त्या समाजांनीं व त्या समाजवर्गांनीं आपली मुक्तता करून घेण्याकरितां चळवळ सुरू केली. या चळवळींना बौद्धिक अधिष्ठान म्हणून त्यांनी आपलीं एक विचारप्रणाली अथवा तत्त्वज्ञान निर्माण केलें.

ज्ञानामुळें संदेह

गेल्या पंचवीस वर्षांत शास्त्रीय ज्ञानांत जितकी भर पडली तितकी पूर्वीच्या हजार वर्षांत पडली नाहीं, असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं. या भौतिक शास्त्रांचा परिणाम सामाजिक जीवनावर झालेला आहे. भौतिक शास्त्रें वाढलीं त्याप्रमाणें समाजशास्त्राचीहि वाढ गेल्या पाव शतकांत पुष्कळच झाली आहे. रानटी स्थितींतील निरनिराळ्या

समाजांचे शोध लागले. अनेक संस्कृतींचा अभ्यास होऊन तद्विषयक ज्ञान वाढलें. समाजशास्त्र, राजकारण, अर्थशास्त्र व तत्त्वज्ञान या क्षेत्रांत अधिक विचार होऊन त्यांत नवीन पंथ अथवा दर्शनें अस्तित्वांत आलीं. धर्म या व्यापक नांवाखालीं येणाऱ्या संस्थेचें चिकित्सक परीक्षण होऊन त्यांतील शाश्वत आणि विनाशी स्वरूपांची छाननी झाली. या सर्व ज्ञानसमुच्चयाचा परिणाम असा झाला कीं, पूर्वीचा धर्म, समाजरचना, आर्थिक रचना आणि संस्कृति इत्यादि गोष्टींबद्दल लोकांच्या मनांत संदेहवृत्ति उत्पन्न झाली. आहे तेंच चांगलें व अखेरचें ही वृत्ति नाहींशी होऊन नवीन आणि इष्ट अशा समाजपद्धती शोधून काढणें शक्य आहे असा आत्मविश्वास समाजाला वाटूं लागला. त्यामुळें पूर्वीच्या समाजपद्धती मोडून अथवा दुरुस्त होऊन सामाजिक पुनर्घटनेची विचारपरंपरा निर्माण झाली.

आम्हीच कनिष्ठ कां ?

फ्रेंच राज्यक्रांतीमध्यें जें समतेचें तत्त्व उदयास आलें त्याला औद्योगिक युगांत नवीन फळें आलीं. यांत्रिक प्रगतीमुळें कामकरी वर्ग वाढला. या वर्गाला शिक्षण मिळाल्याबरोबर त्याच्यांत समतेची जाणीव उत्पन्न झाली. किंबहुना जगांत जो जो वर्ग आतांपर्यंत कनिष्ठ म्हणून समजला जात असे त्यामध्यें आत्मविश्वासाची जाणीव उत्पन्न झाली. सामाजिक श्रेष्ठता कनिष्ठता ही परमेश्वरानें निर्माण केलेली नसून मानवानें निर्माण केलेली आहे ही भावना उत्पन्न झाली, त्याबरोबर सर्व मानीव कनिष्ठ वर्गांना आपल्यावर झालेल्या अन्यायाची जाणीव होऊं लागली. आजपर्यंत स्त्रिया कनिष्ठ मानल्या गेल्या होत्या, त्या पुरुषांबरोबर येऊं लागल्या. कामकरी वर्ग हा कनिष्ठ म्हणून सत्ता-संपत्ति-सौख्यापासून अलिप्त ठेविला गेला होता. तो पुरुषार्थत्रयीची मागणी करूं लागला. नीग्रोसारखे कांहीं वर्ण अस्पृष्ट म्हणून

समजले गेले होते, त्यांचे ठिकाणीं स्वाभिमान व समत्वभाव उत्पन्न झाला. आणि हिंदुस्थान–चीन–जपान यांसारख्या पौर्वात्य राष्ट्रांना आजपर्यंत कनिष्ठ व मागासलेले लोक म्हणून संबोधलें जात असे, ते पाश्चात्यांबरोबर आपलें श्रेष्ठत्व सांगूं लागले. सारांश, जो जो वर्ग कनिष्ठ म्हणून मानला गेला होता त्या त्या वर्गानें श्रेष्ठ समाजाविरुद्ध बंड पुकारलें. नैसर्गिक विषमतेच्या मर्यादा सांभाळून सामाजिक विषमता नाहींशी करावी व श्रेष्ठपदा-पर्यन्त पोंचण्याचा आपणालाही हक्क असावा असें सर्वांना वाटूं लागलें आहे.

त्रयस्थाची भूमिका नको

भौतिक व समाजशास्त्रांची प्रगति, यांत्रिक प्रगतीमुळें आलेले समाजाचे निकट संबंध, आणि मानीव कनिष्ठ वर्गांत झालेली समते-ची जाणीव, या गोष्टींमुळें आज पाश्चात्य समाजांत खळबळ उडाली आहे आणि तिचेच तुषार हिंदुस्थानपर्यंत येऊन पोंहोंचलेही आहेत. त्यामुळें आज जीवनांतील प्रत्येक क्षेत्रांत नवीन विचार आलेले आहेत. या बाबतींत आपण यापुढें निवळ त्रयस्थाची भूमिका घेऊन चालणार नाहीं. कारण नवीन विचारांचा परिणाम आपल्या समाजा-वर होऊं लागलेला आहे आणि यापुढें अधिक प्रमाणावर होईल. नवीन परिस्थिति निर्माण होण्यापूर्वींच तिच्याविषयीं विचारयोजना केली तर त्यांत दूरदर्शीपणा आहे.

---

## प्रकरण सत्तेविसावें

# लोकशाही असावी कीं हुकूमशाही?

सर्व जगाला आग लावून देणाऱ्या महायुद्धांत दोस्त राष्ट्रें पडलीं त्या वेळीं त्यांनीं अशी घोषणा केली कीं, "जगांत लोकशाही राज्यपद्धति सुरक्षित राहावी याकरितां आम्ही लढत आहोंत" या त्यांच्या मंत्राला भुलूनच प्रेसिडेंट विल्सननें अमेरिकेलाहि युद्धामध्यें लोटलें आणि दोस्त राष्ट्रांना विजय मिळवून दिला. जर्मनीची एकतंत्री राज्यसत्ता नष्ट झाली आणि त्या ठिकाणीं सोशल डिमॉक्रसी (समाजवादी लोकशाही) स्थापन झाली. परंतु तिला सुमुहूर्त लागला नसल्यानें एका तपाच्या आंतच ती नष्ट झाली आणि तेथें हिटलरची हुकूमशाही सुरू झाली.

जर्मनीचीच अशी स्थिति झाली असें नाहीं, तर पूर्व युरोपमधील बहुतेक राष्ट्रांत कोणत्या ना कोणत्या प्रकारची डिक्टेटरशिप सुरू झाली आणि पश्चिम युरोपांतील इंग्लंडसारख्या राष्ट्रांतील व अमेरिकेंतील लोकशाहीवर पुष्कळसें नियंत्रण पडलें.

आज जगापुढें असा प्रश्न उपस्थित झाला आहे कीं, समाजशासनाची आदर्श पद्धति कोणती—लोकशाही, हुकूमशाही, कीं तिसरीच एखादी शाही? हिंदुस्थानपुढें हा प्रश्न येण्यास जरा अवधि लागेल. आमच्या राज्यकर्त्यांचें जें तत्त्व तेंच आमचें तत्त्व असें आम्ही धरून चाललों आहोंत आणि तें अपरिहार्यही आहे. परंतु असें असलें तरी

**हिंदी विचारवंतांपुढील प्रश्न**

वर मागावयास सांगितला तर किंवा स्वतःचे हातीं सत्ता आल्यानंतर नैपुण्यपक्ष म्हणून आपण कोणत्या पद्धतीचा अंगिकार करूं याचा विचार आमच्यांतील बुद्धिमान् लोकांनीं केला पाहिजे. कोणतीही पद्धति अस्तित्वांत येण्यापूर्वी अनेक वर्षें तिचा सर्वांगानें विचार

व्हावा लागतो. सोशालिझम व कम्यूनिझमची कल्पना देणारा कार्ल मार्क्स होऊन गेल्यावर किती तरी काळानें त्याच्या विचाराला मूर्त स्वरूप येऊं लागलें. कोणतीही समाजपद्धति व राज्यपद्धति अस्तित्वांत येण्यापूर्वी अनेक वर्षे तो विचार समाजांत मुरावा लागतो व अनुकूल भूमिका तयार व्हावी लागते.

लॉर्ड ब्राईस नांवाच्या इंग्लिश ग्रंथकारानें डिमॉक्रसीवर दोन ग्रंथ लिहिले आहेत. सर्व जगांतील लोकशाहीचें निरीक्षण करून हिंदुस्थानसारख्या देशाविषयीं तो म्हणतो कीं, या लोकांना लोकशाही मानवणार नाहीं. या राज्यपद्धतीला लागणारें शिक्षण, राजकीय मनोवृत्ति व जबाबदारी घेण्याची हौस हिंदी लोकांत नाहीं.

आपणांस लोकशाही मानवेल कां?

ब्राइसचें म्हणणें खरें असेल किंवा खोटें असेल. त्याचे मुळाशीं एक सत्य असें आहे कीं सर्व समाजांना एकच प्रकारची पद्धति मानवत नाहीं. प्रत्येक समाजाची विशेष मनोवृत्ति व परिस्थिति असते. तिला जुळणारी राज्यपद्धति असेल तर ती टिकते नाहीं तर मरते. शिस्त आणि आज्ञापालन या गुणांची जोपासना करणाऱ्या जर्मन लोकांना लोकशाहीतत्त्व मानवलें नाहीं. त्यांना कोणीतरी हुकूम करणारा पाहिजे होता व तो त्यांना मिळाला. या दृष्टीनें हिंदी मनोवृत्तीला कोणती पद्धति मानवेल याचा विचार आपण आजपासून करावयास पाहिजे. आपणांवर लादली जाणारी लोकशाही ही समाजाची संक्रमणावस्था आहे असें मानावें.

महायुद्धाचे कालापर्यंत सर्व पुढारलेल्या राष्ट्रांची अशी भावना होती कीं, लोकशाही हीच सर्वोत्कृष्ट राज्यपद्धति आणि तिचाच सर्व जगानें अंगीकार करावा. जगांतील समाजानें राज्य पद्धतीबाबत एकतंत्री राज्यपद्धतीपासून अनेक प्रयोग केले, व त्यांचा

शेवटीं असा निष्कर्ष काढला कीं, (Government of the people, by the people, and for the people) जनतेनें स्वतःच्या हिताकरितां स्वतः चालविलेली शासनपद्धति हीच उत्तम आहे. प्रत्येक प्रौढ व्यक्तीला मतदानाचा हक्क असावा म्हणजे बहुजन समाजाचें मत काय आहे तें कळेल. बहुमताला राज्यकारभार चालविण्याची परवानगी असावी म्हणजे बहुजनांच्या संमतीनें व त्यांच्या हिताकरितां कारभार चालविला जाईल. या तत्त्वानुसार मतदानपद्धति व बहुमतवाल्या पक्षाचा कारभार अशी पद्धति अस्तित्वांत आली आणि समाजशास्त्र्यांना असें वाटलें कीं, आतां लवकरच सुवर्णयुग अथवा सत्ययुग सुरू होईल.

उत्कृष्ट पद्धति कोणती ?

अनुभव असा झाला कीं, सर्वांना मत देण्याचा हक्क प्राप्त झाला, पण मत कोणाला द्यावें याची अक्कल उगवली नाहीं. अमक्याला मत द्यावें असें कांहीं जणांना पुढें शिक्षणानें कळूं लागलें. परंतु लायक उमेदवार आणि आपणाला लांच देणारा उमेदवार यांतून कोणाला मत द्यावें याचा विचार करितां बहुजन समाजानें स्वार्थालाच अधिक मान देण्यास सुरुवात केली. याचा परिणाम असा झाला कीं लायक माणसें मागें पडलीं आणि पैशाच्या थैल्या घेऊन लांचलुचपत करणारे जे लोक पुढें आले त्यांनाच बहुजनांचीं मतें पडूं लागलीं. लायक उमेदवाराऐवजीं धनिक उमेदवार निवडून येऊं लागले. चारित्र्य व लोकसेवा या गुणांचा भाव उतरला आणि श्रीमंती व स्वार्थ या गुणांना तेजी चढली. पैशाच्या जोरावर निवडून आलेला वर्ग आपल्या स्वार्थाच्या दृष्टीनें कारभार पाहूं लागला आणि बहुजन समाजाचें हित बाजूलाच राहिलें. जी सत्ता पूर्वी एका राजाच्या

परंतु अनुभव काय आला ?

अथवा त्याच्या सरदारांच्या हातांत होती ती आतां धनिक वर्गाच्या हातांत आली.

अमेरिका, इंग्लंड आणि फ्रान्स हीं राष्ट्रें लोकशाहीचा उदोउदो करणारीं आहेत. परंतु या देशांतील बहुजनांची स्थिति पाहिली म्हणजे असें वाटतें कीं या देशाच्या राज्यपद्धतीमुळें अद्याप जनतेचा विशेष फायदा झालेला नाहीं. इंग्लिश मजूर वर्गाच्या अंगावरील दैन्यनिदर्शक फाटके तुटके कपडे, फ्रान्समधील दरिद्री लोकांचीं खोपटीं, आणि अमेरिकेंतील स्लम्स ऊर्फ महारवाडे, या गोष्टी पाहिल्या म्हणजे अशी खात्री होते कीं, बहुजनांना कल्याणकारक अशा राज्य-पद्धतीचा अद्याप शोध लागावयाचा आहे.

बहुजनांचा फायदा झाला नाहीं

सार्वजनिक जबाबदारीच्या जागीं संपत्तीचे जोरावर निवडून येण्यापूर्वी आणि नंतर, लोकशाहींतील पुढारी किती स्वार्थी वृत्तीनें आणि जनहिताविषयीं बेपर्वाईनें वागतात त्याची चुणूक आज हिंदुस्थानला दिसूं लागली आहेच. न्यूयॉर्क हें जगांतील मोठें आणि श्रीमंत शहर. त्याच्या कारभारावर नगराध्यक्ष म्हणून जेम्स वॉकर नांवाचा लोकप्रिय उमेदवार निवडून आला होता. परंतु त्याच्या कारकीर्दीतच लांच-लुचपत, पैसे खाणें आणि अव्यवस्था या गोष्टी इतक्या माजल्या कीं शहरांतील लोकांना त्याची लाज वाटूं लागली. पुढारलेल्या देशांतील मोठमोठ्या शहरीं ही स्थिति. इतर देशांतील लोकशाहीची अवस्था प्रसिद्धच आहे. चार धनिक लोकांनीं पैशाच्या जोरावर वृत्तपत्रें चालवावींत, या पत्रांच्या जोरावर लोकमत अनुकूल करून विशिष्ट व्यक्तींना निवडून आणावें व त्यांच्या हातांत राज्यसत्ता द्यावी असें चाललें आहे. त्यामुळें जगांतील बहुजन वर्ग हा राज्यसत्तेपासून

लोकशाहींतील अंधेरनगरी

अद्याप दूर असून त्याच्या पूर्वीच्या स्थितींत फारसा फरक झालेला नाहीं. थोडा फरक झालेला आहे पण अपेक्षेप्रमाणें या राज्यपद्धतीला फळ आलेलें नाहीं.

बाह्यत: बहुजनमतानुवर्ती, परंतु व्यवहारांत अल्पसंख्यांक समर्थ व्यक्तींच्या मताप्रमाणें चालणाऱ्या लोकशाही पद्धतीचे दोष उघड उघड दिसत असल्यामुळें, महायुद्धानंतर पूर्व-यूरोपांतील राष्ट्रें दुसऱ्या टोंकाला गेलीं. मत-भेद आणि पक्षभेद यांवर आधारलेली पद्धति सोडून देऊन त्यांनीं एकमत आणि एक पक्ष या तत्त्वांचा पुरस्कार करणारी हुकूमशाही स्थापन केली. आजकाल रशियांतील स्टॅलिन, जर्मनींतील हिटलर आणि इटलींतील मुसोलिनी हीं नांवें सर्वांच्या परिचयाचीं आहेत.

यूरोपमध्यें प्रतिक्रिया

हुकूमशाही आणि लोकशाही या पद्धतींच्या मुळाशीं समाज-विषयक दोन भिन्न कल्पना आहेत. लोकशाहीचें आधारभूत तत्त्व असें आहे कीं, प्रयेक व्यक्तीला स्वतंत्र अस्तित्व, मत, व समाजापेक्षां निराळा असा स्वत:चा फायदा आहे. अशा एकमताच्या अनेक व्यक्तींनीं राज्य चालविलें म्हणजे जास्तींत जास्त व्यक्तींचा स्वार्थ साधेल. उलट, विद्यमान हुकूमशाहीच्या मुळाशीं एक निराळें तत्त्व आहे. समाज हा एक आहे, व्यक्तींना असें स्वतंत्र मत नाहीं, व निराळा स्वार्थ नाहीं. समाजाचा जो फायदा तोच व्यक्तीचा फायदा. या दोहोंत विरोध नाहीं. या समाजाचें मत राष्ट्रांतील एका अलौकिक विभूतीच्या मुखानें प्रकट केलें जातें, तेथें पक्षोपपक्ष व मतामतांचा गलबला नाहीं. जर्मनींत जेव्हां मत घेण्याची पाळी येते त्या वेळीं जिकडे तिकडे जाहिराती लागतात कीं—एक पुढारी, एक जनता आणि एकमतानें " होय म्हणा, "

दोन विरोधी तत्त्वें

आज रशियांत कम्यूनिस्ट पक्षाची एकतंत्री सत्ता असून स्टॅलिन तिचें मुख आहे. जर्मनींत हळुहळू हिटलरनें पूर्वीच्या लोकशाही तंत्राला रजा देऊन सर्व कारभार हातीं घेतला आहे, आणि इटलींत सर्वसत्ताधारी मुसोलिनी उघडपणें असें सांगतो कीं लोकशाही केवळ थोतांड आहे. या तिन्ही देशांत आज एकच पक्ष आणि एकच मत आहे. विरोधी पक्ष आणि मतें नाहींत असें नाहीं, परंतु त्यांनीं वर डोकें काढल्याबरोबर तें ठेचलें जाईल अशी त्यांना खात्री आहे. विरोधी मताच्या लोकांना देशांतराला किंवा तुरुंगांत पाठविलें जातें. कम्यूनिस्ट पुढारी ट्रॉट्स्की मतभेदामुळें आज देशोधडीला लागल्याचें प्रसिद्धच आहे. जर्मनींतील हत्याकांडाची बातमी वारंवार येतेच. मुसोलिनीच्या पहिल्या अमदानींत त्याचेवर खुनाचे किती प्रयत्न झाले त्यावरून विरोधी मताविषयीं त्याचें धोरण दिसून येतें.

आजचे हुकूमशहा

जगांत हुकूमशाहीला व एकतंत्री सत्तेलाही किंमत आहे, पण ती कांहीं मर्यादित कालपर्यंतच आहे. एखाद्या देशांत नवीन राज्यसत्ता स्थापन झाल्यानंतर ती दृढ व चिरंजीव होईपर्यंत तिला कोणाचाही विरोध असूं नये हें इष्ट आहे. त्या दृष्टीनें आजच्या रशियांतील व इटलींतील एकतंत्रशाही ठीक आहे. मतस्वातंत्र्याचा पुरस्कार करणारे इंग्रज आणि अमेरिकन लोकही आपल्या राज्यपद्धतीच्या स्थैर्याकरतां क्रांतिकारक कम्यूनिस्टांची मुस्कटदाबी करतात तें सर्वश्रुत आहेच. सारांश, आत्मसंरक्षणाचे दृष्टीनें कोणतीही राज्यपद्धति विरोधी मताचा नायनाट करते. हुकूमशाहींत या तत्त्वाचा अतिरेक होतो एवढेंच.

कांहीं मर्यादेपर्यंत क्षम्य

लोकशाहींत जसे दोष आहेत तसे हुकूमशाहींतही आहेत.

एका प्रबळ व्यक्तीच्या व पक्षाच्या हातांत सत्ता गेल्यानंतर राज्य-कारभार जनतेचे हिताकरितां चालत नाहीं असें आढळून आलें, तर राज्यपद्धति बदलण्याचें साधन समाजाचे हातांत राहात नाहीं. स्टॅलिन मुसोलिनी सारख्या पुढाऱ्यांची परंपरा कायम राहीलच असें नाहीं. त्यांचेनंतर जुलमी आणि स्वार्थी सत्ताधारी गादीवर येणें संभवनीय आहे. असें झालें असतां निमूटपणें जुलूम सोसल्याशिवाय समाजाला गत्यंतर नाहीं. लोकशाही पद्धतींत समाजास विचार करण्याची, जबाबदारी घेण्याची, व पुढारीपण स्वीकारण्याची संवय असते, तीही एकतंत्री पद्धतींत नाहींशी होते. सारांश, मुसोलिनी–स्टॅलिन-सारखे पुढारी समाजास आज हितकारक वाटतात तरी त्यांची परंपरा राहाण्याची शक्यता नाहीं.

परंपरा रहाणें कठीण

लोकशाही आणि हुकूमशाही या दोन्ही सदोष असल्यामुळें स्वीकारणीय पद्धत कोणती आणि कमींत कमी दोष कोणत्या पद्धतींत आहेत असा प्रश्न हिंदुस्थानपुढें उभा राहातो. मतस्वातंत्र्याला वाव, राज्यपद्धति बद-लण्याची शक्यता, व जुलुमाविरुद्ध ओरड कर-ण्याची मोकळीक या दृष्टींनीं हुकूमशाहीपेक्षां लोकशाहीच अधिक इष्ट आहे. परंतु पुढारी निवडण्याचें व मतदानपद्धतींचें जें तंत्र अथवा यंत्र लोकशाही पद्धतीनें शोधून काढलें आहे तें सदोष आहे. त्यांत सुधारणा झाली पाहिजे. या यंत्राची आज रचना अशी आहे कीं स्वार्थी लोक व पुढारी उमेदवार म्हणून उभे राहातात, मतदार वर्ग आपल्या स्वार्थाप्रमाणें त्यांना मत देतो, आणि शेवटीं सर्व राज्य-कारभारांत स्वार्थ माजतो. निःस्वार्थी, जनहिताकडे पाहून वागणारे, उच्च ध्येयाचे आणि तज्ञ असेच पुढारी निवडले जातील, आणि

ध्येय चांगलें पण तंत्र चुकतें

पुढारी निवडण्याची पात्रता व अक्कल असणारेच लोक मतें देतील, अशाप्रकारचें लोकशाहीचें तंत्र (technique) आपण शोधून काढल्यास पाश्चात्य दोषांची आवृत्ति येथें होणार नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्य आणि बहुजनसमाजाचें हित या गोष्टी लोकशाहींत मुख्य आहेत, त्या कायम ठेविल्या पाहिजेत. सध्यांची मतदानाची पद्धति व पुढारी निवडण्याची पद्धत गौण आहे ती बदलली पाहिजे, म्हणजे लोकशाही पद्धतीही यशस्वी होऊं शकेल. आपद्धर्म म्हणून कांहीं काळ हुकूमशाही इष्ट असली तरी नेहमींची शासनपद्धति या दृष्टीनें नवीन तंत्रावर आधारलेली लोकशाहीच इष्ट आहे.

---

## प्रकरण सत्ताविसावें

# शांतता व युद्ध यांची शक्याशक्यता

अमेरिकेंत हिंदुस्थानवर व्याख्यानें देत असतां लोक मला विचारीत, 'म. गांधींचे शांतता मार्गानें लोक अखेरपर्यंत जातील काय आणि त्यांना या मार्गानें स्वातंत्र्य मिळेल काय?' मी त्यांना उत्तर देत असे, 'आम्हीं शांतता मार्गानें जाऊं किंवा हिंसा मार्गानें जाऊं ही गोष्ट आमचेवर अवलंबून नसून पाश्चात्य लोकांवर अवलंबून आहे. पाश्चात्यांना कोणती भाषा समजते तें पाहून त्या भाषेंत आम्हीं बोललों पाहिजे, नाहीं तर त्यांना समजणार नाहीं. आज बारा वर्षे आम्हीं अहिंसावादानें ब्रिटिश व पाश्चात्य लोकांशीं बोलत आहोंत परंतु या भाषेचा त्यांना अर्थ कळत नाहीं व तिचा त्यांचेवर परिणामही होत नाहीं. उलट आमच्याच स्थितींत असलेल्या पराजित व निःशस्त्र अशा जर्मनीची भाषा तुम्हांला चटकन समजते. तेव्हां

हिंदुस्थानला प्रश्न

तुम्हांला समजेल अशाच भाषेंत बोलण्याचा प्रयत्न हिंदी लोक कदाचित् करतील.[१]

महायुद्ध झालें तेव्हां सर्वांचे तोंडांत अशी भाषा होती कीं, युद्धाचा शेवट करण्याकरितां हें युद्ध आहे. युद्धानंतर कांहीं वर्षें

खरी शांतता कोणाला पाहिजे?

युरोपियन लोकांना युद्धाचा वीट आला. त्यावेळच्या हालअपेष्टा, उपासमार, बिनवारशी कुटुंबें आणि हत्या या गोष्टी त्यांच्या डोळ्यांसमोर उभ्या राहात. जगांत शांतता नांदावी या दृष्टीनें अनेक संस्था काढल्या गेल्या, राष्ट्रसंघ व शस्त्रसंन्यास परिषद् यांनीं आपले आटोकाट प्रयत्न केले व ख्रिश्चन चर्चच्या उदारमतवादी पुढाऱ्यांनीं शांततेला अनुकूल असें लोकमत तयार करण्याला सुरुवात केली. आज युरोप अमेरिकेंत अशी स्थिति आहे कीं, बहुजन समाजाला युद्ध नको आहे. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं युद्ध करणें अथवा न करणें ही बाब बहुजनांचे हातीं नसून प्रत्येक देशांतील कळसूत्रधारी अशा मूठभर मुत्सद्यांच्या हातांत ती आहे. त्यांना शांतता नको आहे असें नाहीं, परंतु स्वतःचा तोटा न होतां व स्वतः चालविलेल्या अन्यायांना आळा न बसतां साधेल तितकी शांतता पाहिजे आहे. स्वार्थ व सत्ता याकरितां ते शस्त्र उपसण्यास कधींच माघार घेणार नाहींत.

आज यूरोपमध्यें तीन प्रकारचीं राष्ट्रें आहेत. इंग्लंड व फ्रान्ससारखीं साम्राज्यवादी राष्ट्रें हीं स्वतः होऊन युद्ध उकरून

तीन प्रकारचीं राष्ट्रें

काढणार नाहींत. कारण आज त्यांचीं साम्राज्यें जगावर पसरलीं असल्यामुळें युद्धांत त्यांना नवीन मिळण्यासारखें कांहीं नाहीं; उलट पराजय झाल्यास हातीं असलेलें जाणार म्हणून हीं राष्ट्रें युद्ध सुरू

करणार नाहींत. पण प्रसंग आल्यास आपल्या वसाहती ताब्यांत ठेवण्याकरितां अखेरपर्यंत लढतील. दुसरा गट इटली व जर्मनी या सारख्या राष्ट्रांचा. यांना इंग्लंड—फ्रान्स प्रमाणें स्वतःला साम्राज्यें पाहिजे आहेत. इटालीला पूर्वीच्या रोमन् साम्राज्याप्रमाणें वैभव मिळवावयाचें आहे, आणि जर्मनीला आपल्या देशाची हद्द रशियाचे पोटांत घुसवावयाची आहे. केव्हां ना केव्हां तरी युद्ध उकरून काढल्याशिवाय हीं राष्ट्रें राहाणार नाहींत. त्यांची स्वतःची जय्यत तयारी होईपर्यंतच जगांत शांतता राहील. स्वित्झर्लंड, बेल्जम, डेन्मार्क यासारखीं लहान राष्ट्रें आहेत त्यांना मात्र मनापासून शांतता पाहिजे आहे. मँच्युरिया प्रकरणांत जपानच्या आक्रमण प्रवृत्तीला राष्ट्रसंघांत याच चिमुकल्या राष्ट्रांनीं विरोध केला, इंग्लंड फ्रान्सनें केला नाहीं. परंतु समर्थांच्या धकाधकींत या लहान राष्ट्रांना विचारतो कोण अशी स्थिति आहे.

सारांश, जगाचा नकाशा बदलला नाहीं तोंपर्यंत शांतता नांदणें शक्य नाहीं. फ्रान्स इंग्लंडसारखीं राष्ट्रें जोंपर्यंत मोठमोठ्या वसाहती बाळगून आहेत, तोंपर्यंत तीच महत्त्वाकांक्षा जर्मनी, इटली, व जपानसारख्या राष्ट्रांना राहील व युद्धाचें अग्निहोत्र कायमचें धुमसत ठेविलें जाईल; साम्राज्य ही संस्था नेहमी युद्धाचें कारण राहील. स्वतःचें साम्राज्य आहे तोंपर्यंत इंग्लंड—फ्रान्ससारखीं राष्ट्रें जपान-जर्मनी सारख्या राष्ट्रांच्या महत्त्वाकांक्षेस आळा घालूं शकत नाहींत. त्यामुळें या देशांची साम्राज्यतृष्णा वाढत जाणार व जगांत कलहाचें बीज कायम राहाणार.

युरोपमध्यें सध्यां प्रवास करणाराला शांततेपेक्षां युद्धाचीच तयारी अधिक दिसते. शाळा कॉलेजमधून सक्तीचें लष्करी शिक्षण चालू असून तरुणांची मनोवृत्ति युद्धाला अनुकूल अशी केली जात आहे.

विमानांचा हल्ला आला तर लोकांनीं आपलें संरक्षण कसें करावें,याचें शिक्षण त्यांना दिलें जात आहे. सैन्य, आरमार विमानें यांच्या रंगीत तालमी सुरू आहेत. प्रत्येक राष्ट्र आपापली युद्धसामग्री वाढवीत आहे. प्रयोगशाळांमधून विद्वान्(?) प्रोफेसर प्राणसंहारक वायू व किरण तयार करीत आहेत. मुसोलिनी-हिट्लर सारखे पुढारी आपल्या जनतेची मनोभूमि युद्धाला अनुकूल अशी तयार करीत आहेत.दारुगोळा व शस्त्रसामग्री करणारे खाजगी कारखाने गिऱ्हाईक मिळवून आपली तुंबडी भरण्याच्या मार्गे लागले आहेत.अशा या परिस्थितींतून महायुद्धाशिवाय निराळें असें काय निर्माण होणार आहे ? परंतु या नवीन युद्धाचे प्रसंगीं मुत्सद्यांना जनतेमधून विरोध होईल अशी अपेक्षा करण्यास हरकत नाहीं. प्रत्येक देशांत अनेक शांततावादी पुढारी असून युद्ध सुरू झालें असतां आपण शस्त्र धरणार नाहीं, उलट विरोध करूं असें त्यांनीं आजपासून जाहीर केलें आहे. ख्रिस्ती चर्चनें आधींपासूनच प्रतिकूल सूर लाविला असून ऐन वेळीं त्याचाही परिणाम निदान तेजोभंग करण्यापुरता होईल यात शंका नाहीं. अमेरिका, इंग्लंड व फ्रान्स या देशांत ज्या विद्यार्थ्यांच्या चळवळी चालू आहेत त्यांत भावी युद्धांत आपण भाग घेणार नाहीं असें म्हणणारांचा वर्ग वाढत चालला आहे.

युद्धाची तयारी आणि विरोधी पक्ष

या तिन्ही देशांतून सोशालिस्ट व कॅम्यूनिस्ट लोकांचा गट असून महायुद्ध सुरू झाल्यास सत्तारूढ होण्याचा प्रयत्न केल्याशिवाय तो राहाणार नाहीं. कामकरी वर्गाचा जितका पाठिंबा मिळावा तितका यापुढील युद्धांत राष्ट्रीय सरकारांना मिळणार नाहीं. किंबहुना युद्ध चालू असतां रशियांत व

सोशालिझम् व अंतस्थ क्रांति यांची शक्यता

जर्मनींत जशी सोशालिस्ट व सोशल डेमोक्रॅटिक राज्यक्रांति झाली तशी इंग्लंड फ्रान्समध्यें व इतरत्र होईल अशी पुष्कळ शक्यता आहे. मागील महायुद्धांत सोशालिस्टांचें पाऊल जें पुढें पडलें तें यापुढील युद्धांत आणखी पुढें पडेल यांत शंका नाहीं.

ज्या लोकांची मनोवृत्ति आज युद्धाला प्रतिकूल आहे ती युद्धकाळीं तशी राहीलच अशी खात्री मात्र नाहीं. कारण मनुष्य भावनाप्रधान आहे. आपलें राष्ट्र युद्धांत पडलें आहे, परकीय देशाचा अंमल आपल्यावर येण्याचा संभव आहे, अशा प्रसंगीं संयम करून स्वतःची शांतता व निष्ठा दृढ ठेवण्याइतका निग्रह फारच थोडया व्यक्तींत असतो. त्यामुळें युद्धाला सुरुवात एकमतानें झाली तरी त्याचा शेवट मात्र कांहीं देशांच्या अंतस्थ राज्यक्रांतींत होईल असें वाटतें.

आम्हीं काय करावें ?

हिंदुस्थानविषयीं विचार करतांना केवळ इंग्लंड व हिंदुस्थान यांच्याच संबंधाचा विचार करून चालणार नाहीं. कारण या दोन देशांतील कलह मिटला तरी हिंदुस्थानचे आंतरराष्ट्रीय संबंध कांहीं तुटत नाहींत. पूर्वेकडे जपान व पश्चिमेकडे जर्मनी–इटली यासारख्या साम्राज्यवादी, आक्रमणशील व महत्त्वाकांक्षी राष्ट्रांशीं हिंदुस्थानची गांठ आहे. या राष्ट्रांना आज शांततेची भाषा समजत नाहीं, आणि यापुढें एक शतकभर तरी समजणार नाहीं. अशा स्थितींत त्यांच्याशीं वागतांना शांततावाद धरून चालणार नाहीं. त्यांच्याच भाषेंत बोलावयास पाहिजे. हिंदुस्थान शांततावादी व ध्येयवादी आहे, हें आपलें वैशिष्टय ठेवूनही इतर राष्ट्रांशीं झगडण्याचें सामर्थ्य त्यानें आपल्या बाहूंत आणिलें पाहिजे. फरक एवढाच राहील कीं, इतर राष्ट्रें आपल्या शक्तीचा उपयोग दुर्बलांना चिरडण्याकडे करितात,

हिंदुस्थाननें आपल्या बलाचा उपयोग आत्मसंरक्षण आणि दुर्बलांचा कैवार घेण्याकडे करावा. तो काळ अद्याप लांब आहे ही गोष्ट खरी, पण त्या कालाकडे नजर दिली असतां आजच्या काळांतील आपला प्रश्न सुटेल. राष्ट्राचें युद्ध आणि शांतताविषयक तत्त्वज्ञान भावी काळाकडे दूरवर नजर देऊन ठरवावयाचें असतें. शांततेची तयारी करावयाची म्हणजे शक्ति आणि सामर्थ्य यांपासून अलिप्त राहा-वयाचें असें नाहीं. क्षात्रतेज आणि शांतता यांचा विरोध नाहीं. हिंदुस्थाननें आपल्या तरुणांना लष्करी शिक्षण, आरमारी शिक्षण व वैमानिक विद्या देण्यामुळें आपल्या शांततातत्त्वाला यत्किंचितही बाध येणार नाहीं. अशा रीतीनें आपल्या तरुणांमध्यें क्षात्रतेज, लष्करी वृत्ति व सामर्थ्याची जाणीव उत्पन्न करणें हें आपलें आद्य कर्तव्य आहे. परंतु त्याचबरोबर या शक्तीला कामीं लावील असें तत्त्वज्ञान आपण तरुणांना दिलें पाहिजे. नाहीं तर ध्येयविहीन सामर्थ्याचा उप-योग जगाचे संहाराकडे आज जसा होत आहे त्याचीच पुनरावृत्ति येथें होईल.

---

प्रकरण अठ्ठाविसावें

## संपत्तीवर मालकी माझी कीं समाजाची ?

श्रीरामचंद्रासारखा एवढा सात्त्विक वृत्तीचा राजा, परंतु तो देखील दिग्विजयाच्या महत्त्वाकांक्षेपासून अलिप्त राहूं शकला नाहीं.

पुरुषार्थाच्या बदलत्या कल्पना

अश्वमेध यज्ञ करून त्यानें आपला घोडा अखिल पृथ्वीवर मोकळा सोडला व जाहीर केलें कीं, मी या जगाचा एकमेव जेता आहें. अलेक्झांडरनें आपल्या कल्पनेप्रमाणें पृथ्वी पादाक्रांत केली व शेवटीं आतां जिंकण्यास कांहीं राहिलें नाहीं म्हणून निराश झाला. जग-

विजेता ही कीर्ति संपादन करण्याकरितांच केवळ आयुष्य वेंचणाऱ्या अनेक व्यक्ती इतिहासांत होऊन गेल्या. त्या वेळची पुरुषार्थाची कल्पनाच तशी होती. प्रत्येक युगामध्यें पुरुषार्थाच्या व कर्तबगारीच्या कांहीं विशेष कल्पना असतात. मानवी जीवनाच्या व मनाच्या इतिहासाकडे स्थूल दृष्टीनें पाहिलें तर असें दिसून येतें कीं, पुरुषार्थाच्या या कल्पनांमध्यें उत्क्रांति व बदल होत आहे. पराक्रम, शिपाईगिरी, व दिग्विजय या महत्त्वाकांक्षेचें एक युग होऊन गेलें. त्या नंतरच्या युगांत धर्मप्रसाराच्या महत्त्वाकांक्षेनें सारें जग भरून गेलेलें दिसतें. भूमि आक्रमण करणें व प्रदेश जिंकणें या गोष्टीइतकेंच महत्त्व, बाह्य समाज आपल्या धर्माचे साम्राज्याखालीं आणण्याचे कल्पनेला दिलें गेलें. ख्रिस्ती धर्माचा शांततेनें व अत्याचारानें प्रसार करणारे मिशनरी व राजे, तलवारीच्या जोरावर सर्व जगाला मुसलमान करावयास निघालेले महंमदानुयायी, आणि प्रेमाचे जोरावर आपल्या धर्मसाम्राज्याची सीमा वाढविणारे अशोकासारखे बुद्धानुयायी, हे सर्व एकाच युगांतील विशेष कल्पनेनें भारले गेलेले होते. धर्मप्रचार हाच पुरुषार्थ ही या युगाची कल्पना होती. केवळ कीर्तीकरितां अथवा धर्मप्रचाराकरितां दिग्विजय करणें या कल्पना आजच्या युगांत मागें पडल्या आहेत. कल्पनेनें जुन्या काळांत रहाणाऱ्या व वर्तमान युगाकडे डोळेझांक करणाऱ्या कांहीं व्यक्तींशिवाय इतरांना या कल्पनांनीं विशेष उत्साह वाटत नाहीं.

**'अर्थ' प्रधान युग.**

आजचें युग हें आर्थिक महत्त्वाकांक्षेचें आहे. पुष्कळ संपत्ति मिळवावी, व्यापार वाढवावा, कारखाने काढावेत, परदेशांत व्यापारी साम्राज्य पसरावें, परदेशीं भांडवल गुंतवावें, प्रत्येकानें श्रीमंतींत राहावें व सौख्य भोगावें, अशा पुरुषार्थाचें हें युग आहे. आज सर्व

व्यक्तींची, समाजाची व साम्राज्याची धडपड आर्थिक वर्चस्वांकरितां चाललेली आहे. तेलाच्या खाणी, कोळशाच्या खाणी, व्यापारी पेठा, यांच्याबद्दल आजचे कलह चालू आहेत. सारांश, पराक्रम आणि धर्म यांवरून मानव जात 'अर्थ' या पुरुषार्थावर आली आहे. हें युग चिरकाल राहील असें नाहीं. कांहीं शतकांनीं 'अर्थयुग' जाऊन 'संस्कृतियुग' येईल. संपत्ति मिळविणें ही गोष्ट गौण ठरून साहित्य, संगीत, कला यांची वृद्धि करून त्या कला आत्मसात् कराव्यात अशी व्यक्तींची व समाजांची पुरुषार्थाची कल्पना होईल. किंबहुना, चर्पटपंजरींतील पुरुषाची अभिरुचि बाल्य—तारुण्य—वार्द्धक्य या अवस्थांतून जशी विकास पावत जाते, तशीच मानवजातीची स्थिति आहे.

'अर्थ' हें आजच्या युगाचें वैशिष्टय आहे, हें हिंदी लोकांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. सर्व जगाची त्याकरितां धडपड आहे आणि त्यांत जो समाज मागें पडेल तो कायमचा मागें पडेल. अर्थ हेंच पुरुषार्थ--ध्येय ठेवणें हें जडवादाचें लक्षण आहे हें खरें. पण सर्व जगाबरोबर राहाण्याकरितां तें ध्येय ठेवून शिवाय स्वतःचें असें आध्यात्मविशेष ध्येय ठेवणें हें कांहीं अशक्य नाहीं. जगांत जिवंत राहाण्याकरितां कांहीं सर्वजनसामान्य आणि कांहीं व्यक्तिविशेष गुण व्यक्तींच्या व समाजाचे अंगीं लागत असतात. सामान्य गुणांचे जोरावर जगतां येतें आणि विशेष गुणांचे जोरावर व्यक्तीची व व समाजाची इतरांवर छाप पाडतां येते.

**सामान्य गुण व विशेष गुण**

अमेरिका—यूरोपमध्यें प्रवास करणाऱ्या व्यक्तीला असें दिसतें कीं, तेथें आज आर्थिक दृष्टीनेंच सर्व घडामोडी होत आहेत, देशांत असलेले निरनिराळे पक्ष आर्थिक तत्त्वावर झालेले आहेत

आणि राष्ट्रांच्या राज्यघटना या विशिष्ट आर्थिक तत्त्वांना धरून होत आहेत. प्रत्येक देशांतील अंतस्थ राजकारणांत आर्थिक तत्त्वावर समाजवादी आणि भांडवलवाले असे पक्ष पडले असून सत्तासंपादनाकरितां त्यांच्यांत झगडा चाललेला आहे.

संपत्तीच्या जुन्या कल्पना

अर्थ आणि संपत्ति यांच्या मालकीविषयीं व उपयोगाविषयीं कल्पना बदलत आलेल्या आहेत. अगदीं प्राथमिक समाजांतील कल्पना अशी होती कीं, ज्याचे हातीं जेवढी संपत्ति लागेल ती त्याच्या खाजगी मालकीची. तिचा त्यानें आपल्या इच्छेप्रमाणें वाटेल तसा उपयोग करावा. राजे लोकांनीं व सरदारांनीं आपल्या संपत्तीचा कसाही उपयोग केला तरी त्यांना विरोध करण्याची कोणाची छाती नव्हती. त्याचप्रमाणें व्यक्तीलाही आपल्या संपत्तीचा स्वत:ला उपभोग घेण्याची पूर्ण मोकळीक होती. समाजाच्या पुढच्या अवस्थेंत उच्च धर्मबुद्धीचा उदय झाला. धर्मानें असें सुचविलें व योजना घालून दिली कीं वैयक्तिक संपत्तीचा उपभोग सर्व समाजाला व्हावा. स्वत: खाऊन पिऊन योग्य उपभोग घेऊन राहिलेलें वित्त हें "शेषं कस्यापि रक्षसि" या कल्पनेनें ठेवावें, व दानधर्म करावा. उपभोग घेण्यापेक्षां त्यागांत विशेष महत्त्व आहे, असे विचार धर्मानें प्रचलित केले व सांचलेल्या संपत्तीला या मार्गानें समाजांत वाहाती केली. या दान व त्यागवृत्तीचा प्रभाव इतका झाला कीं, राजे लोकांनीं आपले खजिनेच्या खजिने दानधर्मार्थ खर्च करावेत व स्वत: निर्धन होऊन पुन: द्रव्यार्जनाला सुरुवात करावी अशी कांहीं समाजांत कांहीं काळ परंपरा पडली. अशोक राजाचें असें उदाहरण इतिहासप्रसिद्ध आहे.

दानानें व धर्मबुद्धीनें समाजांत संपत्तीचा प्रसार होत असला तरी त्याला मर्यादा असते, म्हणून त्यापुढें असें तत्त्वज्ञान निघालें कीं

आजची नवी कल्पना

संपत्ति व संपत्तीचें उत्पादन करण्याचीं साधनें यांवर व्यक्तीची मालकी नसून समाजाची सत्ता आहे. या सामाजिक संपत्तीचा उपयोग समाजांतील सर्व व्यक्तींना झाला पाहिजे. संपत्तीचा उपयोग ती सांचवून ठेवणें हा नसून समाजाला उपभोग देणें हा आहे. एकाद्या प्रांतांत आपले वाडवडील आधीं आले म्हणून तेथील जमीन त्या व्यक्तींची होत नाहीं. वडिलार्जित संपत्ति एकाद्याला मिळाली तरी तिच्यावर वैयक्तिक सत्ता नाहीं, या सर्व धनाचा उपयोग श्रम करणाऱ्या व धनोत्पादनाला सहाय्य करणाऱ्या व्यक्तींना झाला पाहिजे.

संपत्तीबद्दलच्या वर ज्या तीन कल्पना सांगितल्या, त्यांपैकीं कोणती खरी किंवा कोणती खोटी तें ठरविणें कठिण आहे. हा

खऱ्याखोट्याची कसोटी

केवळ मनाचा व मानण्याचा प्रश्न आहे. समाजांतील प्रत्येक व्यक्तीला पुरुषार्थाची महत्त्वाकांक्षा राहावी, व मानवी अंतःकरणांतील धर्म—न्याय—दया इत्यादि उच्च भावनांचा लोप होऊं नये हें समाजाचें ध्येय असावें. या ध्येयाला अनुरूप अशी जी संपत्तीची कल्पना अथवा आर्थिक तत्त्वज्ञान असेल त्याचा स्वीकार करावा.

कळीचा नारद हा पुराणांतील समाजांत भांडणें लावून देत होता. आजच्या समाजांत यंत्रानें कलह माजविले आहेत, सर्व

यंत्रानें 'कळ' लावली

आर्थिक खळबळीच्या आणि अस्वस्थतेच्या मुळाशीं यांत्रिक शोध आहेत. त्यांचा योग्य उपयोग करून घेतां न आल्यामुळें मानवी जीवनांतील स्वारस्य नष्ट झाल्यासारखें दिसत आहे, यंत्राची प्रगति जितकी झपाट्यानें झाली, तितकी मानवी मनाची झाली नाहीं, त्यामुळें आज साऱ्या जगाला आर्थिक पेंच पडलेला आहे.

यंत्राचे शोधानें हस्तव्यवसाय मागें पडले. हातानें उद्योग करणारे कारागीर गिरणींत कामाला लागले. वैयक्तिक मालकीचे लहानसहान धंदे नाहींसे होऊन मोठमोठे उद्योगधंदे वाढले व त्यांची मालकी थोडया लोकांचे हातांत गेली. मालक मजूर झाले, आणि शेतकरी कामगार झाले. ज्या थोडया लोकांच्या हातांत कारखाने गेले ते श्रीमंत झाले. इतरांच्या श्रमाचा फायदा त्यांचे पदरांत पडूं लागला. अशा रीतीनें थोडया व्यक्तींजवळ पुष्कळ संपत्ति सांचून समाजांत आर्थिक विषमता झाली. ज्या देशांत यांत्रिक प्रगति अधिक तेथें आर्थिक विषमता अधिक तीव्र असें झालें. आज अमेरिकेची अशी स्थिति आहे कीं शेंकडा दहा लोकांच्या हातांत शेंकडा नव्वद भाग संपत्ति आहे आणि बाकीच्या नव्वद लोकांमध्यें मिळून शेंकडा दहा भाग संपत्ति विभागली गेली आहे. त्यामुळें देश श्रीमंत पण व्यक्ती गरीब अशी वस्तुस्थिति आहे.

हीं यांत्रिक प्रगति आणि स्वार्थी व व्यक्तिवादी तत्त्वज्ञानाचे प्रसाराचा काळ एकदमच आला. प्रत्येकानें आपापला स्वार्थ पाहिला

स्वार्थवादी तत्त्वज्ञान

म्हणजे समाजाचा स्वार्थ आपोआप साधला जाईल, व्यक्तीला ऐहिक दृष्टीनें आपली प्रगति करण्यास पूर्ण स्वातंत्र्य असावें, समाजाचें बंधन असूं नये, अशी विचारसरणी प्रचारांत आली. याला व्यक्तिवाद Individualism असें नांव दिलें गेलें. या व्यक्तिवादाला आधुनिक यांत्रिक प्रगतीची जोड मिळाल्याबरोबर बुद्धिमान्, कर्तबगार परंतु स्वार्थी व्यक्तींनीं समाजाला पिळून संपत्तीचा मोठा हिस्सा आपल्या हातांत आणला. अशा रीतीनें भांडवलवाल्यांचा एक नवीन वर्ग निर्माण झाला. पूर्वीची धर्मबुद्धि जाऊन त्या ठिकाणीं स्वार्थी व्यक्तिवाद आल्यामुळें, आपली संपत्ति मिळवितांना आपण कोणत्या

साधनांचा उपयोग करतों व इतर मानवांना कसें वांगवितों इकडे कोणाचें लक्ष गेलें नाहीं. त्यामुळें यांत्रिक उद्योगांत अमानुष पद्धति शिरल्या व या प्रवृत्तीविरुद्ध प्रतिक्रिया म्हणून पाश्चात्य देशांत आजचा समाजसत्तावाद अस्तित्वांत आला आहे. स्वार्थ, आपमतलबीपणा, निर्घृणता, मानवी जीवनाविषयीं बेपर्वाई हे दुर्गुण आधुनिक यांत्रिक उद्योगधंद्यांत नसते तर समाजवादाला आजच्याइतका पाठिंबा मिळाला नसता. सारांश, स्वार्थी व्यक्तिवादा-विरुद्ध (Individualism )प्रतिक्रिया म्हणून समाजसत्तावाद (Socia-lism) हा अस्तित्वांत आला आहे. समाजाचा लंबक एका टोंकाला गेला होता, तो आतां दुसऱ्या टोंकाला झुकला आहे, तो मध्यें येईपर्यंत तेथें राहील.

रशियाची सावली

१९१९ सालीं रशियानें जी विराट क्रांति केली, तिची छाया पश्चिमेकडे युरोपअमेरिकेवर आणि पूर्वेकडे आशिया खंडावर पडलेली आहे. रशियानें आपल्या समाजसत्तावादी क्रांतीनें या शतकांतील जगाच्या पुढील इतिहासाला एक निराळीच दिशा लावून दिलेली आहे. समाजवाद हा आजच्या आर्थिक स्थितींतून उत्पन्न झाला आहे, हें ओळखून समाजनेत्यांनीं आपलीं पुढील धोरणें आंखलीं तर पुष्कळ अनर्थ टळतील आणि समाजाला भूकंपासारखे क्रांतीचे धक्के बसणार नाहींत.

अमेरिकायुरोपांतील प्रत्येक देशांत आज समाजवादाची थोडी फार छटा उमटूं लागली आहे. भांडवलवाल्या वर्गावर सौम्य सरकारी नियंत्रण घालण्यापासून तों सर्व जमीन, संपत्ति व कारखाने सरकारनें आपल्या हातीं घेण्यापर्यंत समाजसत्तातत्त्वाचीं अनेक स्वरूपें आहेत. ही वावटळ आपल्या देशांत आज ना उद्यां येणार म्हणून त्यांतील

आवश्यक व जरूर त्या तत्त्वांचा समावेश आपल्या राज्यपद्धतींत करण्याचा उद्योग यूरोपमधील प्रत्येक देशानें आरंभिला आहे. अमेरिका म्हणजे भांडवलशाहीचें माहेरघर व रशियाचें अगदीं उलट टोंक समजलें जातें. परंतु तेथेंही प्रेसिडेंट रुझवेल्टनें आंखलेला राष्ट्रीय कार्यक्रम (N. R. A.) हा भांडवलशाहीला नियंत्रण घालणारा असल्यामुळें समाजवादी तत्त्वावर आहे, अशी टीका त्याचेवर केली गेली. इंग्लंड व फ्रान्समध्यें सोशालिस्ट पक्षाचें सामर्थ्य वाढत असून आज ना उद्यां राष्ट्रीय घडामोडीवर त्याची छाप पडल्याशिवाय राहाणार नाहीं. जर्मनीनें आपल्या चळवळीला नॅशनल सोशालिझम् राष्ट्रीय—समाजवाद असें नांव दिलें असून संधि सांपडेल तेव्हां खाजगी उद्योगधंदे, व भांडवल यांवर नियंत्रण घालण्याची भाषा तेथेंही वापरली जात आहे. परंतु लहान शेती व लहान खाजगी मिळकती यांना हात लावण्याचें धोरण जर्मनीनें तत्त्वतः टाळलें आहे. समाजवादाची व्याप्ति फक्त मोठ्या उद्योगधंद्यापर्यंतच करण्याचा जर्मनीचा विचार आहे. भांडवलवाल्यांच्या विरोधामुळें अद्यापपर्यंत ही गोष्ट झालेली नाहीं, व होईल कीं नाहीं तें निश्चित नाहीं.

सारांश, भावी आर्थिक पुनर्घटनेंत संपत्तीवरील वैयक्तिक मालकी जाऊन त्या ठिकाणीं समाजसत्ता येण्याची प्रवृत्ति आज पाश्चात्य देशांत दिसत आहे. भांडवलवाले व उद्योगधंदे यांवर सरकारी नियंत्रण पडणें ही या चळवळीची पहिली पायरी आहे. लहान-सहान सर्वच खाजगी संपत्ति समाजाचे ताब्यांत देण्याइतक्या एका टोंकाला जग जाईल असें वाटत नाहीं. अगदीं अनियंत्रित खाजगी संपत्ति व आत्यंतिक समाजसत्ता यांचे दरम्यान कोठें तरी जग थांबेल असें दिसतें. पूर्ण स्वतंत्र अशा भांडवलशाहीच्या पद्धतींत दुर्बल,

जगाचा व्यावहारिक मार्ग

सत्ताहीन, अज्ञानी, कष्टावर जगणारा आणि अक्षय्य गरीबींत राहणारा असा कामगारवर्ग सामाजिक हक्कांना मुकतो. प्रत्येक व्यक्तीला संस्कृतीचे दृष्टीनें उच्चतम आत्मविकास करण्याची संधि मिळावयास पाहिजे. ती अशा पद्धतींत बहुजनसमाजाला मिळू शकत नाहीं, म्हणून ती कालांतरानें अनिष्ट व त्याज्य अशी समजली जाईल. भांडवलपद्धतीच्या समाजरचनेचा अनुभव घेण्याला जगाला गेलीं दोन शतकें मिळालीं; तशा तऱ्हेचा काळ अद्याप समाजसत्तावादी पद्धतीला मिळालेला नाहीं. परंतु कोणत्याहि चांगल्या पद्धतींत कालांतरानें गुणदोष उत्पन्न होऊन पुढें ती समाजाला बदलावीशी वाटते तसेंच समाजवादाचेंहि होईल. आपल्या स्वतःच्या मालकीचा एकादा जमिनीचा तुकडा, एकादें लहानसें घर व चार वस्तू असाव्यात असें प्रत्येक व्यक्तीला वाटत असतें. अमक्या क्षेत्रांत मी राजा आहें, त्याचे आंत मी वाटेल तें करीन, त्यांत समाजानें डोकावूं नये, अशी कांहीं व्यक्तींची प्रवृत्ति असते. स्वामित्वाच्या कल्पनेनें कांहीं मनोवृत्तींच्या माणसांना सुख होतें, मग हें स्वामित्वाचें क्षेत्र कितीहि लहान असलें, इतरांचे मानानें अगदीं क्षुद्र असलें तरी चालतें. समतेच्या कल्पनेपेक्षां स्वामित्वाच्या कल्पनेंत नैसर्गिक अहंकाराची तृप्ति होते, ती समाजवादी पद्धतींत लाभत नाहीं. स्वामित्वाच्या एका टोंकाला जाऊन कांहीं व्यक्तींनीं तिचा दुरुपयोग केल्यामुळें समतेच्या दुसऱ्या टोंकास समाज गेला आहे. आर्थिक दृष्टीनें समता आणि स्वामित्व या दोन टोकांचे मध्यें स्थिर होण्याकरितां तो हेलकावे खात राहील.

हिंदुस्थानांत यांत्रिक सुधारणेनें पाऊल टाकल्याबरोबर तिच्या पाठोपाठ तिच्या अपत्यानें, समाजसत्तावादानेंहि पाऊल टाकलें आहे. या देशांत पाश्चात्य देशांइतका यांत्रिक उद्योगधंद्यांचा प्रसार होण्या-

पूर्वीच भावी परिस्थितीचें आकलन करून, तिला योग्य असें आर्थिक तत्त्वज्ञान व समाजरचनेची योजना निर्माण केली तर राष्ट्राच्या वेळेची, श्रमाची, व मनुष्यबळाची पुष्कळ काटकसर होईल. माणसांचे हाल होऊन नंतर त्यांतून नवीन पद्धति निर्माण होण्याचा प्रसंग टळेल.

पाश्चात्य मनोवृत्ति व हिंदुस्थान

सांचलेली संपत्ति समाजांत पुन: वाहाण्याचे जे दोन मार्ग आहेत, त्यांचे संधिकालांत आपण उभे आहोंत. धार्मिक प्रवृत्ति व भूतदया यांचे मदतीनें पूर्वी समाजांतील गरीब आपत्तीमधील वर्गाची सोय होत असे. परंतु या भावनेचा तितकासा जोर आजच्या आपल्या समाजांत राहिलेला नाहीं. तो राहिला असता आणि वाढत्या प्रमाणांत असता, तर त्यानें भावी समाजवादाचा जोर बराच कमी झाला असता. परंतु आज धार्मिक, परोपकारी आणि भूतदयेच्या वृत्तीपेक्षां पाश्चात्य देशांतून आलेल्या स्वार्थनिष्ठ व व्यक्तिवादी तत्त्वज्ञानाचा पगडा आपल्या मनावर अधिक बसला आहे. त्या कारणानें अशा मनोवृत्तीला कामगार वर्गाकडून पाश्चात्य देशांत जी प्रतिक्रिया झाली, तीच याही देशांत होईल, असा अंदाज बांधण्यास मुळींच हरकत नाहीं. त्याचीं चिन्हें आजहि दिसूं लागलीं आहेत. मालक—मजूर यांचे झगड्यांत आपले येथेंही पाश्चात्य वर्गकलहाची पुनरावृत्ति होत आहे. अशा परिस्थितींत भांडवलवाले व मजूर यांचे संबंधांत, 'सर्वभूतांच्या ठिकाणीं आत्मभावानें' पाहणाऱ्या हिंदू वेदांताची वृत्ति राखली जात नसून वैयक्तिक स्वार्थी जडवादी दृष्टीनें पाहाण्याचीच वृत्ति दाखविली जात आहे. अशा मनोवृत्तीच्या स्थितींत आपला भावी आर्थिक वेदांत काय असा आपणापुढें प्रश्न येईल.

पाश्चात्य देशांचा अनुभव पाहातां असें स्पष्ट दिसतें कीं या

देशांतही सूक्ष्म अथवा स्थूल स्वरूपांत समाजसत्तावादाचीं तत्त्वें येणें हें अपरिहार्य आहे. आजच्या यांत्रिक युगांत खाजगी मिळकतीवर व धनोत्पादनावर नियंत्रण ठेविलें नाहीं तर गोरगरीब जनतेचे हाल होतात. तेव्हां कांहीं नियंत्रण ठेवणें हें आवश्यक आहे आणि असें नियंत्रण येऊन खाजगी नफ्याला व उत्पन्नाला आळा बसला व बहुजनसमाजाचें हित पाहाण्याची दृष्टि आली कीं येथेंही सूक्ष्म प्रमाणांत समाजवादी धोरण आलें. हेंच अगदीं कडेला न्यावयाचें झालें तर रशियाप्रमाणें घरदार, शेती, इ. सर्व मालमत्ता सरकारी म्हणजे समाजाच्या मालकीची करून टाकावी लागेल. परंतु इतकी एकांतिक वृत्ति आपल्या हिंदी मनाला पटेल असें वाटत नाहीं. कांहीं प्रमाणांत तरी मालकी व स्वामित्व यांना ज्या पद्धतींत वाव आहे मग या मालकीवर कितीही नियंत्रण असलें तरी चालेल—तीच पद्धति आपल्या मनोवृत्तीला मानवेल. लहानच कां होईना पण स्वतःचा असा जमिनीचा तुकडा व स्वतःचें असें घर असावें असें प्रत्येकाला वाटतें व वाटत राहील.

समाजसत्तेचें विविध प्रमाण

आपण पुढें किती प्रमाणांत समाजवाद स्वीकारूं हा पुढचा प्रश्न आहे. भावी परिस्थिति लक्षांत घेऊन यांत्रिक सुधारणेंतील आपत्ति टाळण्याकरितां, देशांत यापुढें जे उद्योगधंदे वाढतील त्यांना इष्ट वळण लावणें ही गोष्ट या पिढीला करणें शक्य आहे. यंत्राचा उपयोग मानवी श्रम वांचविण्याकरितां व कामाचा वेळ कमी करण्याकरितां आहे, हें तत्त्व मालक विसरल्यामुळें पाश्चात्य देशांत कामकरी वर्गाची दुःस्थिति झाली. हिंदुस्थानांत यापुढें वाढणाऱ्या यांत्रिक उद्योगधंद्यांत वरील तत्त्वाचें परिपालन झालें तर कामकरी

आजची गरज व सावधगिरी

वर्गावर येणाऱ्या आपत्तीही टळतील, त्या दृष्टीनें औद्योगिक कायदेकानू झाले पाहिजेत. दुसरी गोष्ट म्हणजे देशांत वाढणाऱ्या उद्योगधंद्यांवर खाजगी व्यक्तींची अनयंत्रित मालकी वाढत गेली तर तें पुढें कलहाचें बीज होऊन बसतें. ही आपत्ति टाळण्याकरितां आजपासूनच नवीन उद्योगधंद्यांवर समाजाचें नियंत्रण पडत गेलें, तर फाजील स्वार्थ, नफेबाजी व कामगार वर्गाविषयीं बेफिकिरी या गोष्टींना आळा बसेल. या तत्त्वांना व्यवहारांत कसें स्वरूप द्यावयाचें हा समाजनेत्यांचा व राजकारणी पुढाऱ्यांचा प्रश्न आहे. एवढी गोष्ट खरी कीं यापुढें देशांत होणाऱ्या आर्थिक व औद्योगिक प्रगतीला इष्ट वळण देण्याचे दृष्टीनें व पाश्चात्यांचे दोष टाळण्याचे दृष्टीनें आम्हीं आपला आर्थिक वेदांत व आर्थिक समाजरचनेचें तत्त्व यांचा विचार आजपासूनच केला पाहिजे.

---

## प्रकरण एकोणतिसावें

# यांत्रिक सुधारणेचा पाश्चात्य अनुभव व इशारा

दळण्याचें जातें व यंत्रयुग

हिंदुस्थानांत प्रथम दळण्याचें जातें निघालें. तेव्हांपासूनच यंत्रयुगाला प्रारंभ झाला. 'जातें' हा शब्द 'यंत्र' या संस्कृत शब्दापासून आला आहे हें व्युत्पत्तिशास्त्रज्ञांना माहीत आहेच. मानवी श्रम हलके करणारें व थोडया वेळांत काम करणारें जें साधन तें यंत्र. जातें हें यंत्रयुगाचें प्रतीक आहे म्हणूनच कीं काय, न्यूयॉर्कमधील शास्त्रीय व औद्योगिक म्यूझियममध्यें प्रथमदर्शनींच जो देखावा आहे तो दळणाऱ्या दोन मारवाडी बायांचा आहे! जातें, पाटावरवंटा, आणि उखळ यांचा आम्हीं शोध लावला; परंतु यापुढें आमच्या यंत्रशास्त्राची प्रगति कां गेली नाहीं त्याचा विचार केला पाहिजे. एवढी गोष्ट

निश्चित आहे कीं प्राचीन हिंदी लोक यांत्रिक सुधारणेला विरोधी नव्हते.

यांत्रिक प्रगतीचा वेग

एकोणिसाव्या शतकांत यूरोप–अमेरिकेमध्यें भौतिक शाखांची प्रगति झाली, व या शास्त्रांचे साह्यानें यांत्रिक सुधारणेची गति वाढली. शास्त्रीय शोध प्रसिद्ध करण्याचें साधन मुद्रणविद्येमुळें मिळालें. उच्च शिक्षण संस्थांमधून शुद्ध विज्ञान व औद्योगिक विज्ञानाचें शिक्षण सुरू झालें, त्यामुळें या संशोधनकार्याला पुष्कळच प्रोत्साहन मिळालें. परस्परांचे शोध परस्परांना ताबडतोब कळूं लागल्यामुळें शास्त्रीय संशोधनाला हजारों, लाखों डोक्यांचा उपयोग एकदम होऊं लागला. पूर्वी एकेका शोधाला एकेक युग व पुढें एकेक तप लागत असे, त्याचे ऐवजीं आज युरोप-अमेरिकेच्या संशोधनशाळांतून प्रत्यहीं शेंकडों शोध लागत आहेत, आणि ते वृत्तपत्र-मासिकद्वारां हजारों लोक वाचीत आहेत. संशोधनकार्याचीं साधनें वाढलेलीं असल्यामुळें या शोधांचा वेग प्रतिवर्षी वाढत आहे. शास्त्रज्ञ असें सांगतात कीं मानवी इतिहासाच्या हजार वर्षांत जितकी शास्त्रीय प्रगति झाली त्यापेक्षां गेल्या तीस वर्षांत अधिक प्रगति झालेली आहे. आजपर्यंत या संशोधनांत अमेरिका, यूरोप व थोड्या प्रमाणांत आशियामधील जपान--हिंदुस्थानसारखीं राष्ट्रेंच पडलेलीं आहेत. जगांतल्या इतर खंडांतील लोक सुविद्य होऊन या प्रगतीला आपला हातभार लावूं लागले म्हणजे जग कोठें जाईल याची कल्पनाच केली पाहिजे !

शास्त्रीय शोध आणि यांत्रिक प्रगति या गोष्टी यापुढेंही चालूं राहतील. ही मानवी प्रवृत्ति आहे, ती कोणी थांबवूं शकत नाहीं. हातांत अधिकार घेऊन जरी एकाद्यानें हें यांत्रिक युगाचें घडयाळ

एक हजार वर्षें मागें खेंचलें तरी तें पूर्वीपेक्षां अधिक वेगानें पुढें धांवत जाईल. या यांत्रिक सुधारणेला विरोध न करितां तिच्यावर नियंत्रण घालून मानवी हिताकडे तिचा कसा उपयोग करून घेतां येईल या दृष्टीनें विचार केला पाहिजे. हिंदुस्थानमध्यें यांत्रिक युगानें पाऊल टाकलें आहे, आणि तत्त्वज्ञानी आपल्या खोलींत बसून कांहींही म्हणाले तरी बाहेर सामान्य लोक विचार न करितां आपल्या सोयी-प्रमाणें मोटारी, रेल्वे, रेडियो, टेलीफोन, विमानें इत्यादि साधनांचा पूर्ण उपभोग घेत आहेत. असें जरी असलें तरी अंधपणें या नवीन संस्कृतीचा स्वीकार न करितां तिच्याबरोबर येणाऱ्या सामाजिक संक्रमणाचा विचार करून आपलें धोरण ठरविलें पाहिजे. या बाबतींत हिंदुस्थान एका परीनें सुदैवी आहे. कारण खर्च न करितां त्याला अनुभवाचा फायदा मिळणें शक्य आहे. ज्या पाश्चात्य देशांत आज आधुनिक सुधारणा कळसास पोंचली आहे, तेथें तिचे सामाजिक सुपरिणाम व दुष्परिणाम काय झाले आहेत तें पाहण्याची आपणांला संधि आहे. त्यामुळें पाश्चात्यांच्या चुका टाळून यांत्रिक सुधारणेचा अनुकूल फायदा घेण्याचे दृष्टीनें आपणांला आपलें धोरण आंखतां येईल.

**पाश्चात्यांच्या अनुभवानें शहाणपणा**

खुद्द पाश्चात्य तत्त्वज्ञान्यांना आज असें वाटत आहे कीं, आजची भौतिक सुधारणा म्हणजे मानवी बुद्धीची व कर्तबगारीची परमावधि आहे. त्यांना आतां भीति एवढीच वाटत आहे, कीं जगांत जर एखादें महायुद्ध झालें, तर या भौतिक सुधारणेच्या पोटांतून इतर रत्नांबरोबर निघालेलीं अद्भुत युद्धाचीं अस्त्रें हींच या सुधारणेला खाऊन टाकतील कीं काय ! एवढी एक भीति सोडून दिली

**आधुनिक सुधारणे-बद्दल अभिमान**

तर इतर दृष्टींनीं यांत्रिक सुधारणेबद्दल पाश्चात्यांना अभिमान वाटत आहे. या नवीन युगानें मानव जातीवर मोठे उपकार केले आहेत, आणि सुधारणेचें व संस्कृतीचें लोण बरेंच पुढें गेलें आहे असा पाश्चात्य देशांत सार्वत्रिक समज आहे. यंत्रापासून माघार घेण्याची जी प्रवृत्ति हिंदुस्थानांत दिसते ती पाश्चात्य देशांत दिसत नाहीं.

गरीबांचीही राहणी सुधारली

यांत्रिक सुधारणेमुळें जीवनाच्या सोयी वाढल्या. ज्या गोष्टी एके काळीं फक्त श्रीमंत सरदारांच्याच आटोक्यांत होत्या, त्या आतां गोरगरीबांच्या घरांत आल्या. राहणीचा उच्च दर्जा जो सधन लोकांना उपभोगितां येत असे, त्याचा फायदा आतां सामान्य जनांनाही मिळूं लागला. अमेरिकेंत आज एखाद्या सामान्य व्यक्तीलाही मोटार, टेलीफोन, रेडियो, गॅसच्या चुली, विजेवर चालणारी घरकामाची यंत्रसामग्री, इत्यादि गोष्टी रोजच्या वापरास सहज मिळूं शकतात. हिंदुस्थानांत या गोष्टींचा उपभोग घेण्याचें भाग्य सामान्य माणसाला लाभत नाहीं. श्रीमंत वकील, डॉक्टर, गर्भश्रीमंत घराणीं इत्यादि मर्यादित लोकांनाच त्यांचा लाभ मिळतो. त्यांचें पाहून इतरे जनांनाही या गोष्टी हव्याशा वाटतात. यांत्रिक सुधारणेमुळें पाश्चात्य देशांत या सामान्य जनांच्या राहणीचा दर्जा वाढला आहे. मूठभर लोकांना ज्या सुखसोयी उपलब्ध होत्या त्या सर्वसामान्य जनतेच्या आटोक्यांत आल्या, व आणण्याची शक्यता उत्पन्न झाली.

मानसिक उन्नतीची प्रत्येकाला संधि

भौतिक व ऐहिक दृष्टीनें राहणीचा दर्जा वाढला त्याचप्रमाणें आध्यात्मिक दृष्टीनें विचार करितां संस्कृतीचीं साधनेंही सामान्य जनांना उपलब्ध झालीं. देशांतील विद्वानांचीं भाषणें, धर्मोपदेशकांचीं प्रवचनें, उत्कृष्ट संगीत, आधुनिक काव्य, इत्यादि गोष्टी

अमेरिकेंतील प्रत्येक नागरिकाला शहरांत व खेडेगांवांत वाटेल तेथें ऐकण्याची संधि मिळते. जगांत काय चाललें आहे तें थोडक्या खर्चांत वाचनानें व श्रवणानें प्रत्येकजण जाणूं शकतो. आपल्या गांवाबाहेरील व देशाबाहेरील समाज आणि जग काय आहे तें तो पाहूं शकतो. रोजच्या जीवनाला लागणाऱ्या साध्यासुध्या गरजा भागविण्याकरितां पूर्वी रात्रंदिवस राबावें लागत असे. आज सात आठ तास काम केलें कीं पूर्वीपेक्षां अधिक सुखसोयीनें राहतां येतें, व बाकीचा वेळ बौद्धिक आणि मानसिक विकासात्मक व्यवसायांत घालवितां येतो. अमेरिकेंत यांत्रिक प्रगति इतकी झाली आहे कीं कामाची व संपत्तीची व्यवस्थित योजना केली, तर प्रत्येकास फक्त दोन तास काम करून आजच्यापेक्षां अधिक सुखानें राहतां येईल, आणि दिवसाचा वेळ ज्ञानात्मक आणि संस्कृतिवर्धक व्यवसायांत घालवितां येईल. हिंदी लोकांच्या राहणीच्या दर्जाप्रमाणें त्या लोकांनीं राहावयाचें ठरविलें तर रोज प्रत्येकाला एक मिनिटापेक्षांही कमी म्हणजे फक्त कांहीं सेकंद काम करावें लागेल! या विधानांत तिळमात्र अतिशयोक्ति नाहीं.

सामान्य जनांच्या राहाणीच्या व संस्कृतीच्या दृष्टीनें यांत्रिक सुधारणेचे अनुकूल परिणाम झाले आहेत तसेच कांहीं प्रतिकूल परिणामही झाले आहेत, ते आपण टाळणें आवश्यक आहे.

दुसरी बाजू-
यांत्रिक माणसें

यांत्रिक उद्योगधंद्यांत काम करणारीं माणसें हींही यंत्रेंच बनून गेलीं आहेत. काम करितांना स्वतःची बुद्धि व कल्पक शक्ति वापरण्याचें त्यांना प्रयोजन उरलेलें नाहीं. कामकऱ्याला सातआठ तास एकच क्रिया यांत्रिक वेगानें करावी लागते. वस्तु तयार करण्याला हजार क्रिया लागत असल्या तर त्यांतील एकादी क्रिया प्रत्येक

कामकऱ्याच्या हातून होते. अथपासून इतिपर्यंत सर्व वस्तु निर्माण करण्याचा जो आनंद खाजगी कारागिराला वाटत असतो तो गिरणी कामगाराला वाटत नाहीं. फोर्ड फॅक्टरी, जनरल इलेक्ट्रिक इत्यादि अजस्र कारखान्यांत ही गोष्ट उत्तम रीतीनें दिसते. या दोषावर उपाय म्हणून Creative Arts प्रतिभासंवर्धक व्यवसायांचा प्रसार पाश्चात्य देशांत होत आहे. कारखान्यांतून काम करून आल्यानंतर कामकऱ्यांनीं आपापले संघ स्थापून वाङ्मय, चित्रकला, संगीत, हस्तव्यवसाय, इत्यादि गोष्टींत एकदोन तास घालवून आपलें व्यक्तिवैशिष्टय वाढवावें, व दिवसभर जी कल्पनाशक्ति प्रसुप्त असते तिला जागृत करावें. रशियांतील संस्कृतिमंदिरांची Palace of Culture योजना याकरितांच आहे.

**शहरांतील महारवाडे—स्लम्स्**

ज्या ज्या शहरांतून उद्योगधंदे आहेत तेथें तेथें कामकरी लोकांकरितां राहाण्याचे निराळे भाग आहेत. मुंबई-अहमदाबादच्या स्लम्स्वरून यांची कल्पना येईल. या भागांत गरीबी अधिक, वस्ती अतिशय दाट, गुन्ह्यांचें प्रमाण जास्त, स्वच्छतेची जाणीव कमी, मुलाबाळांच्या शिक्षणाची हेळसांड—अशा प्रकारची स्थिति असते. या आपत्ती दूर करण्याकरितां धार्मिक प्रवृत्तीचे लोक व समाजसेवक या वस्तींत येऊन राहातात व लोकांना मदत करण्याचा प्रयत्न करितात. मजुरांच्या स्लम्स् हा यांत्रिक सुधारणेचा परिणाम आहे, पण तो अपरिहार्य आणि सर्वत्र आवश्यकच आहे असें नाहीं. तो टाळूनही यांत्रिक प्रगति होऊं शकेल असें दाखविण्याचें काम रशियानें आपल्या अंगावर घेतलें आहे.

यांत्रिक सुधारणेचा तिसरा दोष म्हणजे समाजात संपत्तिवान् कारखानदार वर्ग व संपत्तिहीन बेकार कामगार वर्ग असे दोन वर्ग

मजूर वर्ग व बेकारी

निर्माण होतात, व त्यांत दुर्बळांच्या श्रमाचा फायदा कारखानदार व भांडवलवाला वर्ग घेतो. त्यामुळें एक बहुजन समाज वर्ग हळुहळू निर्धन होत जातो व थोड्या लोकांच्या हातांत संपत्ति सांचत जाते. ही आपत्ति टाळून संपत्तीची श्रमाचे प्रमाणांत विभागणी कशी होईल हा पाश्चात्य समाजापुढील प्रश्न आहे.

बेकारी आणि यांत्रिक सुधारणा यांची सांगड नेहमीं घातली जाते. नवीन यंत्रशोधामुळें पुष्कळ काम थोड्या श्रमांत व वेळांत होतें. त्यामुळें मालक आपला कामगारवर्ग हळुहळू कमी करितो, पण थोड्या लोकांचे जीवावर काम मात्र अधिक काढतो व फायदा तितकाच अथवा जास्त मिळवितो. अशा रीतीनें माणसें कामावरून काढल्यानें बेकारी वाढत जाते व यंत्रामुळें बेकारी वाढते असा समाजांत ग्रह होतो.

हे जे वर दोष दाखविले आहेत ते सर्व अपरिहार्य नाहींत, टाळतां येण्यासारखे आहेत. यांत्रिक सुधारणेबरोबर जन्मतः येणारे व जन्मभर राहाणारे असे ते नाहींत. वस्तुस्थिति अशी आहे कीं यांत्रिक प्रगतीमुळें समाजाच्या आर्थिक जीवनांत जी क्रांति झाली तिला अनुकूल असें नवीन तत्त्वज्ञान आचरणांत आलें नाहीं. यंत्रांचा उपयोग स्वार्थी व्यक्तींनीं आपल्या फायद्याकडे करून घेतला. समाजहिताकरितां मानवी जीवन आहे या सामाजिक तत्त्वज्ञानाचें आकलन स्वार्थानें अंध झालेल्या व्यक्तींना झालें नाहीं. त्यामुळें यांत्रिक प्रगतीचा फायदा बहुजन समाजाला कसा करून देतां येईल, याचा विचार न करितां केवळ स्वार्थाचेच दृष्टीनें त्यांनीं धोरण ठेविलें.

स्वार्थी वृत्तीचा दोष

स्वार्थाचे तत्त्वावर वागणारी भांडवलशाही हिंदुस्थानांत निर्माण झाली

तर पाश्चात्य देशांची आवृत्ति येथेंही लौकरच होईल. समाजहिताचे दृष्टीनें यांत्रिक सुधारणा राबवून घेतली तर कामगारांचे स्लम्स्, त्यांचें दारिद्र, त्यांचें यंत्रासारखें जीवन, हे दोष नाहींसे होऊन बहुजनवर्ग सुखी राहील. व्यक्तीचे दृष्टीनें पाहाण्याची आज दृष्टि आहे तेथें समाजाचे दृष्टीनें पाहाण्याची दृष्टी आली पाहिजे.

बेकारी कां येते?

यंत्रामुळें बेकारी येत नाहीं तर यंत्राचा दुरुपयोग केल्यामुळें बेकारी येते. यंत्रसंशोधनाचा मुख्य हेतु असा कीं व्यक्तीला काम थोडया वेळांत करितां यावें व शारीरिक श्रम कमी पडावेत. परंतु या दृष्टीनें यंत्राचा उपयोग केला जात नाहीं. कामगारांचा कामाचा वेळ कमी करावा आणि त्यांचे श्रम वाचवावेत, या दृष्टीनें यंत्राचा उपयोग कारखानदार करीत नाहींत. ते मजुरांची संख्या कमी करितात आणि उरलेल्या कामगारांकडून तितकेंच काम भरपूर वेळ चोपून घेतात. म्हणजे आज यंत्रांचा उपयोग मजुरांना होत नाहीं तर मालकांना होतो. यंत्रामुळें बेकारी व्हावयास नको असेल तर कामगारांची संख्या कायम ठेवून, यंत्राचे शोध लागत जातील त्याप्रमाणें त्यांचे कामाचे तास कमी केले पाहिजेत. म्हणजे मालकाचा फायदा कायम राहील, मजुरांना काम मिळेल, आणि हेच मजूर कारखान्यांतील मालाचें गिऱ्हाईक होईल. यंत्रांचा हा उपयोग समाजाला कळेल व अंमलांत येईल तरच बेकारी आणि व्यापारमंदी यांना आळा बसेल.

घरदार व शेतवाडी सोडून कामगारवर्ग कारखान्याचे शहरीं येऊन राहिला म्हणजे अनेक प्रश्न उपस्थित होतात. दाट वस्तींतील राहणी, नैतिक शैथिल्य, आरोग्यानुकूल परिस्थितीचा अभाव, व बेकारीच्या काळांत उमासमार, इत्यादि दोष औद्योगिक शहरांत

शहरांत कारखाने नकोत

उत्पन्न होतात. ते टाळण्याकरितां शहरांतील उद्योगधंदे खेड्यांत नेण्याचा उपक्रम हल्लीं यूरोप अमेरिकेंत चालला आहे. या प्रयोगावर हिंदुस्थाननें लक्ष ठेवून आपल्या भावी औद्योगिक प्रगतीची दिशा ठरविली पाहिजे. फोर्डनें अशा प्रकारचा प्रयोग चालविला आहे, त्याला Garden Cities 'शेतावरील नगरें' असें नांव त्यानें दिलें आहे.

हिंदुस्थानचें धोरण

हिंदुस्थानांत या पुढें यांत्रिक प्रगति होणें हें अपरिहार्य आहे. परंतु या प्रगतींत पाश्चात्यांचे दोष येऊं नयेत या दृष्टीनें आजपासूनच समाजनेत्यांनीं काळजी घेतली पाहिजे. यंत्राचा उपयोग फायदा जास्त काढणें हा नसून कामाचे तास व श्रम कमी करणें हा आहे हें तत्त्व लक्षांत ठेवून औद्योगिक कायदे झाले पाहिजेत. सगळे उद्योगधंदे शहरांत वाढूं न देतां आधींपासूनच ते लहान लहान गांवांतून पसरून देण्याची योजना केली, तर पाश्चात्य स्लम्सूचे प्रश्न उत्पन्न होणार नाहींत. हे दोष टाळून जर यांत्रिक सुधारणेचा स्वीकार आपण करूं शकलों तरच तिचा उपयोग बहुजन समाजाचें जीवन सुखी करण्याचे दृष्टीनें व त्याला संस्कृतिसंवर्धक जीवनाची संधि देण्याचे दृष्टीनें होईल.

---

## प्रकरण तिसावें

# सामाजिक असंतोष व पुनर्घटनेचे मार्ग

सामाजिक प्रगतीला अंत नाहीं. जगाच्या प्रारंभापासून अंतापर्यंत असा एकहि कालखंड गेला नसेल कीं, ज्या वेळीं कांहीं ना कांहीं सामाजिक चळवळ झालेली नाहीं. प्रत्येक पिढीला वाटत असतें कीं,

आपला काळ हाच मोठा घडामोडीचा व असंतोषाचा आहे. अशी एक विनोदी आख्यायिका आहे कीं, जगाच्या प्रारंभीं ईडनच्या उद्यानांतून सहल करीत असतां अडॅम ईव्हला म्हणाला, ' प्रिये, सध्यां आपण मोठ्या घडामोडीच्या काळांत राहात आहोंत. ' आजच्या पिढीलाही तसेंच वाटत आहे.

प्रत्येक समाजांत असंतोष

पाश्चात्यांचा समाज अवलोकन करीत असतां असें दिसून येतें कीं, तेथेंही एक प्रकारचा असंतोष व खळबळ माजली असून स्वतःला समाधानकारक अशा प्रकारची समाजरचना घडवून आणण्याचा त्यांचा प्रयत्न चालू आहे. अस्पृश्यता, जातिभेद, धर्मभेद इत्यादि प्रश्न आपल्या समाजांत आहेत, तसे इतर समाजांतहि निरनिराळ्या प्रकारचे प्रश्न आहेत. असंतोष हा दोहींकडे कायम आहे. आदर्श समाजपद्धति निर्माण करण्याचा जो सर्व जगाचा प्रयत्न चालू आहे त्याच वाटेंत आपण आहोंत व सर्व समाज आहेत. कोणी मागें अथवा कोणी पुढें एवढाच फरक.

समाज विभागणीचीं विविध तत्त्वें

प्रत्येक देशांतील समाज हा कोणत्या ना कोणत्या तरी तत्त्वावर विभागला गेला आहे. हिंदुस्थानांतील समाज एके वेळीं जन्म कर्म तत्त्वांवर व आज जन्म तत्त्वावर चाललेला आहे. इंग्लंडमध्येंही अद्याप जन्मतत्त्वाला मान आहे, परंतु प्राधान्य नाहीं; म्हणजे समाजांतील व्यक्तींची प्रगति ही त्यांच्या जन्मकुलावर सर्वस्वीं नव्हे तरी कांहीं अंशीं अवलंबून असते. अमेरिकेंतही स्वतःला उच्च कुळींतलीं समजणारीं अशीं कांहीं घराणीं आहेत, परंतु जन्मतत्त्वाला या देशांत फारशी किंमत दिली जात नाहीं. कर्माप्रमाणें अथवा व्यवसायावरून व्यक्ति श्रेष्ठ अथवा कनिष्ठ ठरविण्याची पद्धति

पाश्चात्य देशांमध्यें फारशी नसली तरी शारीरिक श्रम करणाऱ्या वर्गाला गौणत्व व बौद्धिक व्यवसाय करणाऱ्या वर्गाला श्रेष्ठत्व देण्याची त्यांच्यांत परंपरा आहे. परंतु आजकाल रशियामध्यें मात्र शारीरिक श्रम करणाऱ्या कामकरी वर्गाला इतर वर्गांपेक्षां श्रेष्ठत्व दिलें जातें. याखेरीज इतर सर्व देशांतील समाज आर्थिक तत्त्वावर विभागले गेले आहेत. गेल्या शतकांतील यांत्रिक व औद्योगिक क्रांतीमुळें या विभागणीला तीव्र स्वरूप आलें असून गरीब व कामकरी वर्गांत आपल्या कनिष्ठ स्थितीविषयीं असंतोष उत्पन्न झालेला आहे.

पाश्चात्य देशांतील समाजांत जो असंतोष दिसून येतो त्याच्या मुळाशीं त्यांची आजची समाजरचना आहे. ती बदलून घेण्याचा प्रयत्न चाललेला आहे व शक्य तेथें निरनिराळीं तंत्रें योजून विद्यमान पद्धतींतील दोषांची तीव्रता कमी करण्याच्या दृष्टीनें समाजनेत्यांचे विचार चालू आहेत.

असंतोषाचें मूळ.

जन्म, कर्म, अथवा संपत्ति, इत्यादि अनेक कारणांनीं ज्या ज्या वर्गांना कनिष्ठ म्हणून मानण्यांत येतें, त्या वर्गांत ही असंतोषाची भावना अधिक प्रमाणांत आहे. शिक्षणाचा प्रसार होऊन तें जसजसें खालच्या थरापर्यंत गेलें, तसतशी त्या वर्गांत जागृति झाली. समाजानें आपणांस दिलेलें स्थान राजीखुषीनें पत्करण्यास ते नाकबूल झाले. वैयक्तिक महत्त्वाची जाणीव त्यांच्या ठिकाणीं आली. व्यक्तीच्या प्रगतीस समाजानें घातलेलीं बंधनें हीं ईश्वरनिर्मित नसून मनुष्यनिर्मित आहेत ही गोष्ट त्यांच्या लक्षांत आली. समाजांतील सर्व व्यक्ती या सारख्याच दर्जाच्या, त्यांत श्रेष्ठ व कनिष्ठ हा भेद नसावा, श्रेष्ट–कनिष्ठत्व वैयक्तिक कर्तबगारीवर ठरविलें जावें,

इतर आगंतुक कारणांवरून ठरविलें जाऊं नये, अशा विचारसरणीनें प्रेरित होऊन आपल्या मानीव कनिष्ठ स्थानापासून वर येण्याचा प्रयत्न अनेक वर्ग समाजांतील करीत आहेत.

समाजाचे उच्चनीच आणि श्रेष्ठ कनिष्ठ असे वर्ग होणें हें नैसर्गिक गुणांना धरून व अपरिहार्य आहे. निसर्गात समत्व नाही. परंतु या समाजवर्गाभोंवतीं जेव्हां तटबंदी केली जाते, व सुस्थित असलेले वर्ग इतरांना आपल्या समूहांत येण्यास विरोध करतात व स्वतः इतरांपेक्षां सामाजिक फायदे अधिक भोगतात त्या वेळीं समाजांत असंतोष अधिक माजतो. वैयक्तिक गुणांप्रमाणें एका वर्गांतून दुसऱ्या वर्गांत जाण्याची शक्यता जितकी अधिक असते तितकी समाजांत शांतता नांदते. आपणही श्रेष्ठ व उच्च म्हणवून घ्यावें अशा प्रकारचा स्वाभिमान व्यक्तिमात्रांत असतो. तो कारणपरत्वें जागृत होतो अथवा प्रसुप्त राहतो. नीचांना उच्च, कनिष्ठांना श्रेष्ठ, गरीबांना श्रीमंत होण्यास वाव, अथवा सामाजिक संक्रमणाची सोय ज्या समाजांत अधिक केली जाईल, त्या समाजांत असंतोषाचें प्रमाण कमी राहील. पाश्चात्य राष्ट्रांनीं या वर्गसंक्रमणाच्या सोयी कशा केल्या आहेत हें पाहण्यासारखें आहे.

वर्गसंक्रमणाच्या सोयी

जन्मानें कमी आणि कर्मानेंही कमी अशा वर्गाला आर्थिक हीनत्वाची जोड मिळाली म्हणजे त्याच्या ठिकाणची अन्यायाची भावना अधिकच तीव्र होते. यूरोपमध्यें तशीच स्थिति झाली आहे. जन्म आणि कर्म यांच्या हीनत्वाला तिकडे विशेष महत्व नसलें तरी त्याला आर्थिक कनिष्ठतेची जोड मिळाल्या-कारणानें त्या देशांत आज असें दिसत आहे कीं, श्रीमंत आणि

पाश्चात्य वर्गभेदाची तीव्रता

गरीब, भांडवलवाले अथवा कामकरी, उच्च वर्ग आणि नीच वर्ग यांचा कलह चाललेला आहे.

हीन म्हणून मानल्या गेलेल्या वर्गाच्या समाधानाला कांहीं तरी जागा पाहिजे, तीही पाश्चात्य समाजानें ठेविलेली नाहीं. हिंदुस्थानांतील जातिभेदाची रचना करणाऱ्यांनीं, त्याच्यांतील दोषांचा परिहार करण्याकरितां, जन्म–कर्म दृष्टीनें श्रेष्ठ आणि सत्ता–संपत्ति दृष्टीनें श्रेष्ठ असे वर्ग हे परस्परांपासून अलिप्त ठेवून समाजांत तोल ठेवण्याचा प्रयत्न केला. आज प्रत्यक्ष तशी स्थिति दिसत नसली तरी तात्त्विक दृष्टीनें योजलेल्या जातिभेद पद्धतींत ही व्यवस्था होती. पाश्चात्य देशांत जन्म–कर्म दृष्टीनें हीन असलेल्या वर्गाला संपत्ति–सत्तेपासूनही अलिप्त ठेवण्यांत आलें. लोकशाही तत्त्वाप्रमाणें खालच्या वर्गाला संधि दिलेली असली तरी ती केवळ कल्पनेंतच राहिली. म्हणून खालचा वर्ग ही सत्ता वरच्या वर्गापासून मिळविण्याचा प्रयत्न करीत आहे.

व्यक्तीचा गौरव करून प्रत्येकाला आपल्या कर्तबगारीनें समाजांत पुढें येण्याची संधि देण्याचें तत्त्व प्रथम अमेरिकेनें स्वीकारलें.

**अमेरिकेंतील समान संधि**

समाज जितका नवीन तितका तो अधिक परिवर्तनशील असतो, हा फायदा अमेरिकेला मिळाला. आपला हा देश ‘ संधीची सुवर्णभूमि ’ असें अमेरिकन लोकांनीं जाहीर केलें. युरोपियन लोकांपेक्षां अमेरिकन लोकांमध्यें जर कांहीं स्वभाव–वैशिष्ट्य दिसून येत असेल तर तें हें कीं, अमेरिकन मनुष्य कर्तबगार व्यक्तीला संधि देण्यास सदैव तयार असतो. ‘ त्याला संधि तर द्या ’ Give him a chance. ही म्हण अमेरिकन स्वभावाची निदर्शक आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. संधिस्वातंत्र्याचें तत्त्व केवळ कल्पनेंत व कागदावरच न राहतां तें

प्रत्यक्ष अमलांत यावें म्हणून अमेरिकन लोकांनीं विशेष तंत्र शोधून काढलें. त्यांनीं आपल्या समाजांत सर्व शिक्षण मोफत करून सर्वांना विद्येचें मुक्तद्वार ठेविलें. मनुष्याला आपली कर्तबगारी वाढविण्याचें साधन म्हणजे विद्या. ती प्रत्येकाच्या आटोक्यांत ठेविल्यामुळें प्रत्येक कर्तबगार व्यक्तीला पुढें येण्याची संधि मिळाली. अमेरिकेंतील किती तरी थोर पुरुष अगदीं गरीब कुळांतून वर आलेले आहेत. या देशांत मध्यंतरीं इतकी बेकारी होती तरी लोक शांत होते; याचें कारण प्रत्येक कामकऱ्यानें व मजुरानें एक वेळीं चांगले दिवस पाहिले होते व पुनः सुबत्ता आल्याबरोबर आपण कदाचित् एकाद्या गिरणीचे अथवा बँकेचे मालक होऊं अशी प्रत्येकाला आशा होती. प्रत्येक जण कांहीं वरपर्यंत पोंचूं शकत नाहीं, परंतु तेथें पोंचण्याची आपणाला संधि आहे, या कल्पनेनेंच समाजांत एक प्रकारचें समाधान राहातें.

इंग्लंडमध्यें कर्तबगारीचा गौरव

अमेरिकेनें सरसकट सर्व व्यक्तींना जशी वर्गसंक्रमणाची मोकळीक ठेविली तसें इंग्लंडनें केलें नाहीं. असंतुष्ट कनिष्ठ वर्गापैकीं वैयक्तिक कर्तबगारीनें ज्या व्यक्ती आपोआप पुढें येतील त्यांना वरच्या वर्गांत सामील करून घ्यावयाचें व अशा रीतीनें कनिष्ठ वर्गांतील असंतोषाला फारसें तोंड फुटूं द्यावयाचें नाहीं, असें समाजरचनेचें धोरण इंग्लंडनें स्वीकारिलें आहे. सामान्य जनांना असलेल्या संधीचें क्षेत्र विस्तृत करण्याचें अमेरिकन धोरण इंग्लंडनें स्वीकारलें नाहीं, तरी कनिष्ठ वर्गांतून वर आलेल्या कांहीं मर्यादित व्यक्तींच्या जन्म–कर्माकडे न पाहतां त्यांना वरिष्ठ वर्गांत सामील करून घेण्याचा प्रघात पडल्यामुळें कर्तबगार व्यक्तींच्या ठिकाणीं समाधानाला जागा झाली, व असंतोषाची तीव्रता कमी झाली.

जर्मनींतील वर्गपद्धति परवां परवांपर्यंत कायम होती व अद्यापही आहे. वर्गावर्गांतील विरोध व असंतोष नाहींसा करण्याकरितां नवीन नाझी सरकारनें समतातत्त्वाचा स्वीकार तात्त्विक दृष्टीनें केला आहे. म्हणजे वर्ग-विषमतेबद्दलची समाजाची भावना काढून टाकावयाची व बाकी वस्तुस्थिति आहे तशीच ठेवावयाची असें धोरण आहे. कामगार—मालक, अशिक्षित—सुशिक्षित, गरीब—श्रीमंत, इत्यादि वर्ग समाजांत राहाणारच; परंतु अमुक श्रेष्ठ अमुक कनिष्ठ हा जो लोकसमज, तो काढून टाकण्याकरितां प्रयत्न चाललेला आहे. प्रत्येकानें आपापले व्यवसाय सांभाळावेत, परंतु सामाजिक दृष्टया सर्व एका दर्जाचे आहेत अशी मनोवृत्ति तरुण पिढींत उत्पन्न करण्याकरितां सर्व प्रकारच्या तरुणांना वसतिगृहांत व वर्कँकॅपमध्यें एकत्र आणलें जातें. क्रमिक पुस्तकांतून, सर्व प्रकारचीं कर्में करणारे लोक हे राष्ट्राचे वीर आहेत, अशी भावना तरुण पिढींत उत्पन्न केली जाते. सारांश, वर्गकलहाच्या तत्त्वाला अनुसरून वर्गनिष्ठ समाजाचें निर्मूलन करून एकवर्ग समाज निर्माण करण्याचे रशियन धोरणाविरुद्ध जर्मनीनें आपलें धोरण ठेविलें आहे. वर्गविविधता राहावी, परंतु सर्व वर्गांना समाजांत समान दर्जा व किंमत दिली जावी म्हणजे त्यांच्यांत श्रेष्ठ—कनिष्ठ भावना व तीमुळें उद्भवणारे कलह होणार नाहींत असें नाझी लोकांचें तत्त्वज्ञान आहे.

जर्मनींत भावनेवर भर

रशियन राज्यक्रांति ही वर्गकलहाच्याच तत्त्वावर उभारली आहे. जन्म, कर्म, संपत्ति इत्यादि कोणत्याच तत्त्वावर आरूढ झालेली वर्गपद्धति रशियाला मान्य नाहीं. आजपर्यंत मानले गेलेले उच्च, श्रीमंत, पोषाखी, असे वर्ग नाहींसे होऊन त्यांतून एक श्रमजीवी

रशियांतील एक-वर्ग समाज

असा समान वर्ग निर्माण व्हावा ही त्यांची महत्त्वाकांक्षा आहे. नैसर्गिक विषमता रशियाला मान्य आहे. कर्तबगारीच्या दृष्टीनें व्यक्तिव्यक्तींच्या गुणांत भेद आहे, म्हणून त्या गुणांप्रमाणें व्यक्तींच्या आर्थिक मोबदल्यांत आजच्या रशियांत विषमता आहे. अमेरिकेनें स्वीकारलेली संधिस्वातंत्र्याची कल्पना रशियानें आपल्या समाजांत पूर्ण स्वरूपाला नेली आहे. तेथें आर्थिक दृष्टीनें विषमता आहे पण व्यक्तिमात्राच्या कर्तबगारीला मात्र पूर्ण वाव आहे.

पाश्चात्य देशांतील परिस्थितीवरून असें दिसून येईल कीं समाजाच्या अनेक अवस्था असणें शक्य आहे. विशिष्ट रचनेचाच समाज जिवंत राहूं शकतो असें नाहीं, तरी पण समाजांतील बहुजनवर्गांत संधिस्वातंत्र्यामुळें उत्पन्न झालेली समाधानवृत्ति जितकी अधिक असेल तितका तो समाज सुखी राहील. हिंदी समाजाची पुनर्घटना करण्याच्या दृष्टीनें पाश्चात्य देशांच्या अनुभवापासून आपणांला कांहीं गोष्टी घेण्यासारख्या आहेत. त्या घेतल्या असतां समाजांतील अस्वस्थता कमी होऊन त्याची कर्तबगारी, कार्यप्रवृत्ति व प्रतिकार-क्षमता वाढेल. शिक्षण सार्वत्रिक व मोफत करून अमेरिकेनें यच्च-यावत् व्यक्तीला जें संधिस्वातंत्र्य ( Equality of Opportunity ) दिलें तें येथें अवश्य दिलें पाहिजे. उच्च शिक्षणाच्या द्वारांतून खालची व्यक्ति वरच्या समाजांत जाऊं शकते. शिक्षण सार्वत्रिक करणें हिंदुस्थानांत कठिण दिसतें, परंतु राष्ट्रीय संपत्तीचा योग्य विनियोग केल्यास ही गोष्ट शक्य होईल. भावी सामाजिक अनर्थ टाळण्याकरितां ही द्रव्याची किंमत दिली पाहिजे. विविध प्रकारचीं कर्में करणाऱ्या सर्व व्यक्ती समाजाच्या दृष्टीनें सारख्या आहेत, ही जर्मनीनें स्वीकारलेली वृत्तीही भावनेच्या दृष्टीनें उपयुक्त आहे.

हिंदी समाजापुढील प्रश्न

कोणताही वर्ग स्वतःला कनिष्ठ मानून घेण्यास तयार नाहीं, व वास्तविक रीतीनें सामाजिक दृष्टया उपयुक्त कर्मे करणारा कोणताही वर्ग कनिष्ठ नाहीं. अशा मानीव कनिष्ठ वर्गांना सामाजिक दृष्टीनें समानतेचा दर्जा मिळाला आणि त्याला संविस्वातंत्र्याची जोड लाभली तर समाजांत स्वस्थता राहण्याच्या दृष्टीनें मदत होईल. हिंदु समाजाचा आज पाश्चात्य समाजांशीं संबंध आल्यानें त्याला असें वाटतें, कीं आहे यापेक्षां निराळी व चांगली समाजरचना असणें शक्य आहे. पाश्चात्य समाजांच्या व आपल्या समाजाच्या इतिहासावरून पाहतां असें स्पष्ट दिसतें कीं, एका आदर्श समाजरचनेच्या दृष्टीनें जगाची प्रगति चालली आहे. आज आमच्याजवळ जें स्वतःचें सामाजिक तत्त्वज्ञान आहे त्यांतील चांगलीं तत्त्वें व पाश्चात्यांच्या समाजरचनेंतील चांगलीं तत्त्वें यांची सांगड घालून त्यांतून एक सुसंगत सामाजिक तत्त्वज्ञान निर्माण करणें जरूर आहे. तें आपण केलें तरच आपला समाज या जागतिक जीवनकलहांत जगणें शक्य आहे.

---

प्रकरण एकतिसावें

## जागतिक वर्णभेद व आधुनिक शास्त्रांचा निर्णय

चातुर्वर्ण्याचें भवितव्य काय आहे हा प्रश्न हिंदुस्थानापुढेंच आहे असें नाहीं, तशा स्वरूपाचा प्रश्न सर्व जगापुढें आहे. जगांतील सर्व समाजांचें मोकळेपणानें दळणवळण सुरू झाल्यामुळें आज वर्णभेदाचे प्रश्नाला महत्त्व आलेलें आहे. हा प्रश्न तांतडीनें सुटणार नसून त्याचा अखेर निकाल लागण्यास एकदोन शतकें तरी सहज लागतील.

ज्या वर्णांचे संबंध आज इतके निकट येत आहेत ते एके

वेळीं परस्परांपासून अगदीं विभक्त, हजारों मैल अंतरावर राहणारे, स्वतंत्र खंडांत वस्ती करणारे, भिन्न संस्कृतीचे, भिन्न स्वरूपाचे व शरीरबांध्याचे असे होते. पश्चिम युरोपमध्यें श्वेतवर्णीय लोक, अमेरिकेंत रेड-इंडियन, आफ्रिकेंत काळे नीग्रो, आशियांत उत्तरेस पीतवर्णी चिनी–जपानी आणि हिंदुस्थानांत आर्यलोक याप्रमाणें राहात. यांत्रिक आगबोटींचा शोध, व्यापारी दळणवळण आणि नवीन साम्राज्यें स्थापण्याची हांव इत्यादि कारणांमुळें भिन्न स्थानीं राहणारे हे सर्व वर्ण एकत्र आले आहेत. त्यामुळें त्यांचे संबंध काय आणि जगांत प्रत्येकाचा दर्जा काय असा प्रश्न आज उपस्थित झालेला आहे.

जगांतील वर्णांचे संबंध

श्वेतवर्णीय युरोपियन लोकांची आक्रामक प्रवृत्ति, श्रेष्ठत्वाचा अहंकार, भौतिक सामर्थ्याची जाणीव, आणि बऱ्यावाईट मार्गानें मिळविलेले भूप्रदेश आपले ताब्यांत ठेवण्याची स्वार्थी महत्त्वाकांक्षा इत्यादि कारणांनीं हा प्रश्न विशेष धसाला लागला आहे. अमेरिकेंत जाऊन या लोकांनीं रेड इंडियन लोकांचा निःपात करून त्यांचा देश घेतला; आफ्रिकेंत त्यांनीं नीग्रो लोकांचे प्रांत व सोन्याच्या खाणी असलेली भूमि हस्तगत केली; ऑस्ट्रेलियावर त्यांनीं आपली सर्वस्वी मालकी स्थापित केली; चीनमध्यें पीतवर्णीयांवर व्यापारी वर्चस्व चालविलें, आणि हिंदुस्थानांत त्यांनीं आपलें साम्राज्य स्थापन केलें. या प्रत्येक ठिकाणीं भिन्नवर्णीय स्थानिक लोकांपेक्षां आपण श्रेष्ठ आहोंत अशा प्रकारचें धोरण श्वेतवर्णीयांनीं ठेविलें आहे. अर्थात् स्वतःचे घरींच ज्यांना परक्यासारखें वागविलें जातें त्या श्वेतेतर वर्णांना खुद्द श्वेतवर्णीयांचे मुलखांत विशेष मान नसावा हें स्वाभाविक आहे.

श्वेतवर्णाचें वर्चस्व

वर्णभेदाची व स्वकीय श्रेष्ठत्वाची ही भावना श्वेतवर्णीयां-

मध्यें पाश्चात्य देशांत प्रत्येक ठिकाणीं दिसून येत आहे. थोडे अपवाद मात्र आहेत. नीग्रो लोकांचे व अमेरिकन लोकांचे संबंध हे जगप्रसिद्धच आहेत. समाधानाची गोष्ट येवढीच आहे कीं याच अमेरिकेंत नीग्रोचा कवार घेणारे उदार मनाचे अमेरिकन लोक निम्मे तरी खात्रीनें आहेत. म्हणून या लोकांना गुलामगिरींतून मुक्त करण्याकरितां अमेरिकन लोकांनीं परस्परांत युद्ध केलें व नीग्रो गुलामगिरी नष्ट केली. परवर्णीय लोकांचा कैवार घेऊन आपल्या लोकांशीं युद्ध करणाऱ्या देशाचें उदाहरण अमेरिकेशिवाय दुसरें नाहीं. तरी पण पूर्वापार चालत आलेला नीग्रोविषयींचा दूषित ग्रह अद्याप अमेरिकेंत आहे. आणि कांहीं प्रांतांत तरी नीग्रोंना श्वेतवर्णीयांच्या बरोबरीनें श्रेष्ठपणा मिळण्याचे दिवस येण्यास अनेक शतकें लागतील असें वाटतें. अमेरिकेच्या उत्तर भागांतील संस्थानांत नीग्रोविषयीं सहानुभूति आहे. परंतु या ठिकाणींहि समाजांत फक्त कनिष्ठ प्रतीचीं कामेंच त्यांच्या वांटयास आलेलीं आहेत. मोलमजुरी, स्वयंपाक, विजेचे पाळणें चालविणें असलींच कामें नीग्रोंचेकरितां राखीव आहेत. एखादा नीग्रो चांगला गायक व नर्तक असेल तर मात्र सभ्य नाटकगृहांतूनहि श्वेतवर्णीय लोक त्याच्या कलेचा मनापासून गौरव करितात. स्वतःची श्रेष्ठता दाखविण्याला नीग्रोला हें एकच क्षेत्र आहे.

नीग्रो वर्णाची दुःस्थिति

नीग्रो व श्वेतवर्णीय यांच्या मिश्रणानें कांहीं निमगोरे लोकांचा वर्ण अस्तित्वांत आलेला आहे. त्यामुळें श्वेतवर्णापासून कृष्णवर्णापर्यंत सर्व प्रकारच्या रंगछटा अमेरिकन नीग्रोंत सांपडतात. अमेरिकेंत प्रवास करणाऱ्या हिंदी माणसाची तेथील लोकांना माहिती नसेल तर

हिंदी कीं निग्रो ?

नो नीग्रो म्हणून समजला जाऊन त्याचा अपमान होण्याचा संभव असतो. याकरितां आपले लोक पगडी अथवा रुमाल बांधतात, म्हणजे मग कांहीं त्रास होत नाहीं. एकदां एका कृष्णवर्णीय हिंदी माणसाला एका सभेंतहि लोक जाऊं देईनात. त्यानें बाजारांत जाऊन एक पांढरें कापड विकत घेतलें आणि ऐटींत डोक्याला कोशा बांधला. त्याबरोबर काय चमत्कार झाला ! त्याच माणसाला व्यास-पीठावर अध्यक्षाशेजारीं नेऊन बसविण्यांत आलें.

हिंदी अगर आशियाटिक लोकांचा प्रवासी म्हणून अमेरिकेंत आदर केला गेला, तरी हे लोक तेथें कायमचे येऊन राहावेत असें मात्र अमेरिकन लोकांना वाटत नाहीं. अमेरिकेंत वस्ती करण्याकरितां दरवर्षी कांहीं ठराविक प्रमाणांत युरोपच्या देशांतील लोक घेतले जातात. परंतु हीच सवलत आशियाटिक लोकांना दिलेली नाहीं. श्वेतवर्णीयांत भिन्न वर्णीय लोक जाऊन राहिले, तर आज जसा नीग्रोंचा प्रश्न उपस्थित झाला आहे तसा उद्यां इतर वर्णीयांचा होईल, या दृष्टीनें अमेरिकन मुत्सद्दयांचें धोरण बरोबर आहे. परंतु त्याच तत्त्वाला धरून या श्वेतवर्णीयांनीं इतर खंडांत भिन्न वर्णीयांच्या मुलुखांत आपणहि जाऊन राहूं नये असा निर्बंध स्वतःवर घालून घेतला पाहिजे. त्यांनीं तसें केलें नाहीं तोंपर्यंत आशियाटिक लोकांना असेंच वाटत राहील कीं आपल्यावर अन्याय होत आहे.

आशियांतील वर्ण व अमेरिका

इंग्लंडची व इंग्लिश लोकांची इतर वर्णीयांशीं वागणूक कशी असते तें हिंदी लोकांना माहीत आहेच. राहाण्याच्या घरांतील भाड्याच्या जागा व उच्च प्रतीचीं सार्वजनिक हॉटेलें, स्नानगृहें इ. ठिकाणीं कृष्णवर्णीयांना व हिंदी लोकांना पक्षपातानें वागविलें जातें ही गोष्ट

इंग्लिशांचा वर्ण-भेद

इंग्लंडमध्यें जाऊन येणाऱ्या लोकांच्या ध्यानांत आलेली आहेच. ही झाली खुद्द इंग्लंडमधील हकीकत वसाहतींमध्यें तर श्वेतवर्णीय इंग्लिश लोक काय काय साधनांनीं आपलें श्रेष्ठत्व कायम ठेवितात तें पाहिलें म्हणजे या लोकांच्या स्वातंत्र्याच्या व समतेच्या आकुंचित कल्पनांबद्दल अनादर वाटूं लागतो. सत्तेच्या, सामर्थ्याच्या, व बाह्य देखाव्याच्या जोरावर आपलें वर्चस्व इतर वर्णाचे प्रजेवर ठेवण्याचा त्यांचा अखंड प्रयत्न चालू असतो.

जर्मनीमध्यें आजपर्यंत ही वर्णभेदाची भावना फारशी नव्हती; परंतु हिटलरचा नाझी पक्ष अस्तित्वांत आल्यापासून भिन्नवंशीय

जर्मनींतील ज्यू लोकांचा छळ

ज्यू लोकांविरुद्ध त्यानें मोहीमच सुरू केली आहे. जर्मनींतील विद्वानांची यादी केली तर त्यांत ज्यू लोकच अधिक भरतील, इतके ते बुद्धीनें हुषार आहेत. अशा या लोकांवर शस्त्र धरण्यांत जर्मन लोकांनीं अगदीं रानटीपणा दाखविला आहे, असें सारें जग म्हणत आहे. ज्यू लोकांना यापुढें सरकारी नोकऱ्या मिळणार नाहींत, वकिली–डॉक्टरीचा धंदा करण्याची परवानगी नाहीं, व वाटेल तें शिक्षण घेण्याचीहि पूर्णपणें मोकळीक नाहीं, अशी स्थिति झाली आहे.

अमेरिका, इंग्लंड आणि जर्मनी या राष्ट्रांनीं भिन्नवर्णीय लोकांना कनिष्ठ व अस्पृष्ट असें ठरविलें आहे. परंतु फ्रान्स व

फरान्स–रशियाची सहिष्णु वृत्ति

रशियांत मात्र अगदीं उलट परिस्थिति दिसून येते. फ्रान्समध्यें नीग्रो मनुष्य श्वेतवर्णीयांत मोकळेपणानें मिसळूं शकतो. फ्रेंच राज्यक्रांतीचे वेळीं स्वातंत्र्य, समता व बंधुत्व या तत्त्वांचा फ्रान्समध्यें जन्म झाला, त्याचा हा परिणाम असावा. रशियानें आपली समाज-

रचनाच सामाजिक समतेच्या पायावर उभारलेली आहे. तेथें जसा स्त्रीपुरुषांत भेद केला जात नाहीं, तसा वर्णावर्णांतहि भेद केला जात नाहीं. इतकेंच नव्हे तर वर्णभेद आणि वर्णद्वेष दाखविणें हे गुन्हे समजले गेले असून, त्यांना अतिशय कडक शिक्षा आहेत. एकदां एका अमेरिकन श्वेतवर्णीय कामगारानें एका नीग्रोचा अपमान केला. त्याबरोबर त्या गोऱ्या माणसाला अगदीं शेवटची शिक्षा देण्यांत आली, व त्याला हद्दपार करण्यांत आलें. वर्णसमतेचें ध्येय इतक्या कडकपणें आजपर्यंत कोणींहि पाळलेलें नाहीं.

रशियांत वर्णसमतेची जी वृत्ति दिसते ती प्रत्येक देशांतील तरुण पिढींत थोडया फार प्रमाणांत दिसूं लागली आहे. अमेरिकन

**तरुणांची वर्णसमता दृष्टि**

तरुणांच्या चळवळीच्या अनेक ध्येयांपैकीं वर्णसमता हें एक ध्येय आहे. बहुतेक देशांतील तरुणांत सोशॅलिस्ट व कम्यूनिस्ट लोकांचा एक पक्ष आहे. हा पक्ष कसल्याहि प्रकारचा वर्णभेद, वर्गभेद अथवा जातिभेद मानीत नाहीं. असा हा तरुणांचा वर्ग वर्षानुवर्षें वाढत गेला तर दोनतीन पिढयांनंतर कदाचित् असा समाज येईल कीं, ज्याच्या ठिकाणीं ही वर्णभेदाची भावना तीव्र स्वरूपांत राहिलेली नाहीं.

जगांतील वर्णभेद नाहींसा होण्याला दुसरी एक गोष्ट अवश्य आहे. श्वेतवर्णीय लोक आपलें श्रेष्ठत्व व वर्चस्व गाजवितात

**वर्णश्रेष्ठत्वाची कल्पना**

याचें कारण श्वेतेतर वर्ण हे भौतिक सुधारणेनें, सामर्थ्यानें व शिक्षणानें श्वेतवर्णीयांपेक्षां कनिष्ठ आहेत हें होय. त्या क्षेत्रांत पुढें येऊन त्यांनीं आपली समसमानता सिद्ध केली, आणि जपानप्रमाणें पाश्चात्यांवरहि सर केली तर ही श्रेष्ठकनिष्ठपणाची भावना आपोआप नाहींशी होईल; आणि तशी ती नाहींशी झाली नाहीं तर समान शक्तीचे दोन प्रतिस्पर्धी

आपलें श्रेष्ठत्व क्षात्रबलानें सिद्ध करतात, त्या मार्गानें श्वेतेतरवर्णीय लोक हे आपलें श्रेष्ठत्व पुढें सिद्ध करतील.

जागतिक वर्णभेदाचीं अनेक कारणें आहेत. त्यांपैकीं राजकीय, आर्थिक व सामाजिक कारणें हीं मुख्य आहेत. श्वेतवर्णीयांना इतर वर्णीय लोकांवर आपलें साम्राज्य चालवावयाचें आहे. गुलाम लोकांना आपल्या बरोबरीनें वागविलें तर उद्यां ते आपल्या डोक्यावर बसतील ही मालकांना भीति आहे. इंग्लंडचें हिंदुस्थानांत, फ्रान्सचें इंडोचायनांत व हॉलंडचें डच बेटांत जें वर्चस्व आहे तें त्यांना कायम ठेवावयाचें आहे. राजकीय आणि आर्थिक कारणें एकमेकांत मिसळलीं गेलीं आहेत. जेथें जेथें श्वेतवर्णीयांचें राज्य आहे, तेथें तेथें व्यापारी वर्चस्व, मोठ्या पगारांच्या जागांचा मक्ता, सुपीक मळे, सोन्याच्या खाणी इ. नैसर्गिक संपत्तीची मालकी स्वतःकडे राखण्याकरितां, म्हणजे मुख्यत्वें करून आर्थिक कारणांकरितां, काळ्या लोकांवर आपलें वर्चस्व ठेवणें गोऱ्या लोकांना आवश्यक वाटतें. जर्मनींतील ज्यूविरोधी चळवळ आर्थिक कारणामुळेंच उत्पन्न झाली. ज्यू लोकांनीं आपल्या बुद्धिमत्तेमुळें व्यापार, वकीली, डॉक्टरी, सरकारी नोकरी इत्यादि क्षेत्रें काबीज केलीं. तीं त्यांचे हातून काढून ख्रिश्चन जर्मनांना देण्याकरितां हिटलरनें ही वर्णद्वेषमूलक चळवळ काढली, आणि आर्थिक चढाओढीला वर्णश्रेष्ठतेचें गोंडस नांव दिलें आहे.

वर्णभेद व राजकारण

वर्णभेदाचें तिसरें आणि महत्त्वाचें कारण म्हणजे आपल्या समाजाची वर्णशुद्धि व रक्तशुद्धि राखण्याची तळमळ हें होय. प्रत्येक समाजाला असें वाटत असतें कीं आपला वर्ण हा शुद्ध, उच्च, सुसंस्कृत, बुद्धिमान, देखणा व पराक्रमादि गुणांनीं युक्त असा आहे. इतर सर्व वर्ण

वर्णशुद्धीची तळमळ

हे कनिष्ठ आहेत. आपल्या वर्णाचा संकर इतर वर्णांशीं होऊं नये. समाजांचे निकट संबंध आले म्हणजे वर्णसंकर होतात, म्हणून इतर वर्ण कनिष्ठ असे लेखून त्यांपासून आपला एकवर्ण समाज अलिप्त ठेवावा म्हणजे त्याचें शुद्ध स्वरूप राहील. ही वृत्ति प्रत्येक समाजांत असते.

मानसशास्त्रज्ञांनीं याबाबत पुष्कळ प्रयोग केले आणि शेवटीं असा निर्णय दिला आहे कीं, बौद्धिक दृष्टीनें अमुक वर्ण श्रेष्ठ किंवा अमुक वर्ण कनिष्ठ असें सिद्ध होत नाहीं. प्रत्येक वर्णांत कनिष्ठ बुद्धीपासून तों श्रेष्ठ बुद्धीपर्यंतच्या पायऱ्यांवरचीं माणसें असतात. मठ्ठ आणि बुद्धिवान् माणसें प्रत्येक वर्णांत सारख्याच प्रमाणांत आहेत. परिस्थितीमुळें आपणाला फरक वाटतो. सर्व वर्णांना सारख्याच संस्कारांची संधि मिळाली, तर आज दिसणारा फरक कमी कमी होत जाईल. सर्व वर्ण सारख्याच गुणाचे आहेत असें शास्त्रानें सिद्ध केलें असलें तरी वर्णसंकर करावा कीं न करावा या बाबतींत मात्र आधुनिक शास्त्रानें अद्याप निश्चित व अखेरचें मत दिलेलें नाहीं. आपापली बाजू तितक्याच जोरानें मांडणारे व प्रामाणिकपणाचे भूमिकेवर उभे राहून बोलणारे असे शास्त्रज्ञ दोन्हीहि बाजूला आहेत.

**आधुनिक शास्त्रांचा निर्णय**

यावरून असा निष्कर्ष निघतो कीं बुद्धीचे व कर्तबगारीचे दृष्टीनें मानली गेलेली श्रेष्ठता कनिष्ठता ही भ्रामक व काल्पनिक आहे. वास्तविक रीतीनें कोणताच वर्ण श्रेष्ठ नाहीं किंवा कोणताच वर्ण कनिष्ठ नाहीं. गुणानें सर्व सारखेच आहेत. संधि मिळाली तर सर्वांचे सद्गुण व दुर्गुण सारखेच प्रकट होतील. परंतु ही वर्णसमानतेची शास्त्रीय भूमिका मान्य केल्यानंतर पुढें असें कबूल

**वर्णसंकराच्या मर्यादा**

करणें भाग आहे कीं ज्यांची इच्छा असेल त्या वर्णांना आपली रक्तशुद्धि कायम ठेवण्याचा हक्क व अधिकार असावा. वर्णसंकराची सक्ति असूं नये. श्वेतवर्णीय अमेरिकन लोकांना स्वाभाविकपणेंच असें वाटतें कीं, आपल्या वर्णांत काळ्या रंगाचे, जाड ओठाचे व कुरळ्या केसांचे वंशज होऊं नयेत. हिंदी व नीग्रो लोकांचा संबंध अधिक प्रमाणांत आला तर हिंदी लोकांनाहि तसेंच वाटेल. पीतवर्णी चिनी–जपानी लोकांपासून श्वेतवर्णीय लोक आपला वर्ण जितका अलिप्त ठेवतात तितकाच तो ठेवण्याचा हिंदी लोकहि प्रयत्न करतील. म्हणजे आपली वर्णशुद्धि राखल्यानें दुसऱ्या वर्णाला कनिष्ठ लेखल्यासारखें होत नाहीं, तर आपल्या रूप–गुणाच्या कल्पना निराळ्या आहेत असें मानल्यासारखें होतें. सारांश, आपापल्या वर्णाचें मूळरूप राखण्याचा प्रत्येक वर्णाला हक्क असावा. शास्त्रानें अखेर निर्णय देईपर्यंत वर्णसंकराचा आग्रह अथवा सक्ति असूं नये. प्रत्येक वर्णाला संस्कृतीच्या दृष्टीनें उच्च दर्जा प्राप्त करून घेण्याची संधि मागण्याचा हक्क आहे. अशा रीतीनें समान संस्कृतीचे अनेक वर्ण झाल्यावर त्यांच्यांत कांहीं प्रमाणांत वर्णसंकर होणें हें अपरिहार्य आहे, परंतु तसा आग्रह कोणी धरूं शकणार नाहीं. समाजांत व जगांत उच्च दर्जा प्राप्त करून घेण्याची संधि प्रत्येक वर्णाला मिळाल्यानंतर आज दिसणारें वर्णद्वेषाचें स्वरूप तसेंच राहील असें वाटत नाहीं.



## प्रकरण बत्तिसावें

# स्त्री–जीवन व कुटुंबसंस्था यांची दिशा

स्त्रीजीवनाचा चित्रपट

हिंदुस्थानांतून यूरोपमध्यें, तेथून अमेरिकेंत व नंतर रशियांत अशा क्रमानें प्रवास करतांना त्या त्या देशांतील व समाजांतील स्त्रियांचा दर्जा पाहिला, म्हणजे गेल्या तीन-चार शतकांतील स्त्रीजीवनाच्या इतिहासाचा चित्रपट प्रत्यक्ष पाहिल्यासारखें होतें. सर्वस्वीं पुरुषतंत्र व त्यांच्या कलाप्रमाणें राहणाऱ्या स्त्रियांची पहिली अवस्था हिंदुस्थानांत दिसते. त्यानंतर सांसारिक व वैयक्तिक बाबतींत पुरुषांपासून स्वातंत्र्य मिळविलें आहे परंतु आर्थिक दृष्टीनें पुरुषावलंबनच कायम ठेविलें आहे, ही दुसरी अवस्था यूरोपमध्यें दिसते. त्यापेक्षांहि एक पाऊल पुढें जाऊन वैयक्तिक व आर्थिक बाबतींत स्वावलंबन मिळविलेलें आहे, परंतु जबाबदारीच्या व महत्त्वाच्या जीवन क्षेत्रांपासून स्त्रिया अलिप्त राहिलेल्या आहेत अशी त्यांची अवस्था अमेरिकेंत दिसते. आणि अखेरची व चवथी पायरी म्हणजे सर्वस्वीं पुरुषांप्रमाणें कामें करणाऱ्या व हक्क भोगणाऱ्या स्त्रिया या रशियांत दिसून येतात. जगांतील स्त्रीजीवनाची उत्क्रांति याच क्रमानें व याच स्वरूपांत होणार आहे कीं काय सांगवत नाहीं. आज तरी या विविध अवस्थांतील स्त्रिया जगांत दृष्टीस पडत आहेत.

कामाचीं क्षेत्रें

महायुद्धानंतरच्या काळांत अमेरिकन स्त्रियांना आर्थिक स्वतंत्रता प्राप्त झाली व दिवसेंदिवस स्वतःच्या श्रमावर पोट भरणाऱ्या स्त्रियांची संख्या वाढत गेली. विवाहोत्तर पैसे मिळविण्याची व नोकरी करण्याची अपेक्षा नसली तरी वेळप्रसंग आलाच तर स्वतःजवळ स्वावलंब-

नाचें साधन तयार असावें या दृष्टीनें अमेरिकन मुली शिक्षण घेतात. विवाहानंतर पतीच्या आर्थिक स्थितीप्रमाणें कांहीं स्त्रिया आपली नोकरी सोडून देतात, कांहीं स्वतःच्या कपडेलत्त्यापुरते पैसे मिळवितात, व कांहीं आपली नोकरी चालू ठेवून संसाराला मदत करतात. समाजांत स्त्रियांचीं कार्यक्षेत्रें कांहीं ठराविक अशीं आहेत. कारखान्यांत बिनश्रमाचीं नाजूक कौशल्याचीं कामें असतात तेथें स्त्रिया काम करतात. प्राथमिक शाळांत शिक्षकांचीं कामें सर्वस्वीं स्त्रियाच करतात. टाइपरायटिंग, स्टेनोग्राफी व सेक्रेटरीचीं कामेंही स्त्रियांचींच समजलीं जातात. येथें अमेरिकन स्त्रियांच्या कामाची मर्यादा संपली, असें म्हणण्यास हरकत नाहीं. कॉलेजमध्यें मधून मधून स्त्रीप्रोफेसर पुरुषांबरोबर शिकवितात व प्रधानमंडळांत प्रेसिडेंट रूझवेल्ट यानें मिस् परकिन्स् या बाईची नेमणूक केली. परंतु हीं उदाहरणें अपवादात्मक व नवीन धोरण दर्शविणारीं आहेत येवढेंच. राजकारण, व्यापार, इत्यादि क्षेत्रांत जबाबदारीचीं कामें स्त्रियांवर सोंपविण्याची परंपरा अद्याप पडलेली नाहीं. परंतु स्वाभाविक उत्क्रांतीनें स्त्रियांना हा दर्जा आल्यास त्याला अमेरिकन लोकमताचा फारसा विरोध होणार नाहीं. तरी पण ही प्रवृत्ति फार झपाट्यानें वाढेल असेंहि सांगवत नाहीं. उदाहरणच द्यावयाचें तर असें सांगतां येईल कीं, प्राथमिक शाळांत जितक्या सढळ मनानें स्त्रिया नेमल्या जातात, तितक्या दुय्यम शिक्षणाच्या शाळांतून म्हणजे (मुलांच्या) हायस्कुलांमधून नेमल्या जात नाहींत. त्याचप्रमाणें शिक्षणखात्यांतील जबाबदारीच्या कारभाराचीं बहुतेक कामें पुरुषच करतात.

इंग्लंड व फ्रान्समध्यें अमेरिकेसारखीच स्थिति असली तरी एकंदर व्यवसायांत स्त्रियांचें प्रमाण कमी आहे. अमेरिकेंत जीं क्षेत्रें सर्वस्वीं स्त्रियांनीं काबीज केलीं आहेत त्या क्षेत्रांत इंग्लंडमध्यें

पुष्कळ पुरुषहि कामें करतांना दिसतात. उत्तर हिंदुस्थानची बुरखा-पद्धति पाहून आलेल्या प्रवाशाला महाराष्ट्र गुजराथेंतील स्त्रिया पाहून एकदम फरक झाल्यासारखा वाटतो. त्याचप्रमाणें यूरोपमधून अमेरिकेंत येणाऱ्या मुशाफरास त्या देशांत स्त्रिया अधिक मोकळेपणानें व स्वातंत्र्यानें राहतात असें दिसून येतें. या बाबतींत यूरोपियन लोक स्वतःस अमेरिकेपेक्षां अधिक सनातनी म्हणवितात व अमेरिकन लोक स्वतःस रशियापेक्षां अधिक सनातनी लेखतात. परंतु या सनातनत्वाचें एक मोजमाप असें नाहीं.

सारांश, बुद्धीनें, कर्तबगारीनें व शारीरिक बलानें स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीनें सर्वच कामें करूं शकतील असा विश्वास अद्याप यूरोपियन व अमेरिकन लोकांना वाटूं लागलेला नाहीं. परंतु असें कोणी उघड बोलून दाखविणार नाहीं. एकाद्या जबाबदार जागेवर उमेदवार नेमावयाचा झाला तर न कळत पुरुषाला प्राधान्य दिलें जातें.

रशियानें तात्त्विक दृष्टीनें स्त्रीपुरुष असा भेदच ठेविला नाहीं. कोणतीहि व्यक्ति एखाद्या कामाला योग्य असली म्हणजे ती स्त्री किंवा पुरुष आहे याचा विचार न करतां तिची इष्ट स्थानीं योजना केली जाते. 'गुणाः पूजास्थानं गुणिषु न च लिंगं न च वयः' या संस्कृत म्हणीवर रशियन लोकांचा आपल्यापेक्षां अधिक विश्वास आहे. त्या कारणानें पोलिसापासून जबाबदारीच्या राजकीय खात्यांपर्यंत सर्व क्षेत्रांत स्त्रिया प्रामुख्यानें दिसतात.

रशिया व जर्मनी

स्त्रिया दुर्बल म्हणून, अथवा बुद्धीनें कमी म्हणून, त्यांना अमुकच काम द्यावयाचें व अमुक द्यावयाचें नाहीं असा विचार रशियांत नाहीं. रशियन बोटींत पाऊल टाकल्याबरोबर तेथें स्त्रिया खलाशांबरोबर शारीरिक कामें करतांना दिसतील; लेनिनग्राडमध्यें

प्रवेश करतांच तुमचा पासपोर्ट तपासण्यास कदाचित् स्त्री अधिकारी येईल; आगगाडींत गार्डाचें काम करणारी एखादी स्त्री असूं शकेल; पाऊस व बर्फ पडत असतांना त्या थंडींत ओव्हरकोट घालून ट्रामच्या रुळांचे सांधे बदलण्याचीं कामें करतांना स्त्रिया दिसतील; मोठमोठ्या ऑफिसांत तुम्हीं गेलां तर जबाबदारीनें तुमच्याशीं बोलणें करण्यास स्त्रिया येतील; आणि न्यायासनावर बसून पुरुष साक्षीदारांना व अपराध्यांना निर्विकार मनानें पण सहानुभूतीनें प्रश्न विचारणाऱ्या स्त्रियाहि दिसतील. वर्कशॉपमध्यें घिसाडखान्यांत रसरसलेल्या भट्टीशेजारीं उभें राहून तापलेल्या लोखंडावर घणाचे घाव घालण्याचें काम रशियन विद्यार्थिनी करतात; असें चित्र जगांतील दुसऱ्या कोणत्याहि देशांत दिसत नाहीं.

अमेरिका-इंग्लंडमध्यें जो स्त्रियांना दर्जा आहे तोच महायुद्धानंतरच्या चौदा वर्षांत जर्मन स्त्रियांना प्राप्त झाला होता. परंतु नाझी राज्यक्रांतीमुळें स्त्री जीवनांतहि क्रांति झाली. पुरुषाचीं व स्त्रियांचीं कामाचीं क्षेत्रें अगदीं स्वतंत्र आहेत. पुरुषांनीं द्रव्यार्जन करावें व स्त्रियांनीं घर संभाळून अपत्यसंगोपन करावें अशी व्यवस्था करण्यांत आली. अगदीं आवश्यक असतील तेवढ्याच स्त्रियांना डॉक्टर, शिक्षक इत्यादि व्यवसाय करण्यास परवानगी मिळते. वीरपत्नी व वीरमाता होणें हेंच स्त्रियांचें एकमेव उद्दिष्ट आहे, अशा प्रकारची विचारसरणी युद्धोन्मुख जर्मनींत प्रचलित झालेली आहे.

प्रत्येक समाजांत स्त्रीजीवनाचीं ध्येयें कांहीं विशिष्ट स्वरूपाचीं आहेत. अमेरिकन स्त्रिया कर्तबगारीला वाव मिळेल असा व्यवसाय पाहण्याच्या दृष्टीनें विचार करीत असतात. आपल्या ठिकाणीं कांहीं विशेष गुण आहे, तो समाजाला दाखवावा व लौकिक रीतीनें

स्त्रियांचीं ध्येयें

जितकें पुढें येतां येईल तितकें यावें हें त्यांचें ध्येय असतें. रशियामध्यें आतां स्त्री आणि पुरुष यांच्या ध्येयांमध्यें भेद राहिलेला नाहीं. आपल्या गुणांचा समाजाला अधिकाधिक उपयोग होण्याच्या दृष्टीनें सरकार जो व्यवसाय सुचवील तो करावयाचा व तो चालू असतां प्राप्तकर्तव्य म्हणून जीं नैसर्गिक मातृत्वाचीं कर्तव्यें असतील तीं करावयाचीं, असें रशियन स्त्रियांचें ध्येय आहे. जर्मनींत हिटलरनें स्त्रियांच्या ध्येयाची मर्यादा घालून दिलेली आहे. त्याची भूमिकाच अशी आहे कीं स्त्रिया कधीं पुढारी होऊं शकत नाहींत, त्यानीं पुरुषांच्या नेतृत्वाखालींच काम करावें. उत्कृष्ट माता आणि उत्कृष्ट पत्नी होणें हें स्त्रियांचें ध्येय असावें, यापलीकडे त्यांनीं पाहूं नये, असें नाझींचें तत्त्वज्ञान आहे. जर्मनींतील स्त्रियांना हें कितपत मान्य आहे हें सांगणें कठीण आहे. कारण आज हिटलरविरुद्ध कोणी ब्रहि काढूं शकत नाहीं. त्याचा उदोउदो करून अधिकाराच्या जागा मिळविणारेच लोक फक्त बोलूं शकतात. परंतु एकंदर युरोपखंडांत सामान्य मत असें आहे कीं, जर्मनीचें स्त्रीजीवनविषयक धोरण प्रतिगामी स्वरूपाचें असून त्यामुळें गेल्या शतकार्धांत जी स्त्रियांची प्रगति झाली होती तिची एकदम पीछेहाट झाली.

सहशिक्षणाच्या बाबतींत अमेरिकेनें आपलें अस्तिपक्षी धोरण कायम ठरविल्यासारखें दिसतें. कांहीं जुन्या संस्थांखेरीज सर्व शाळा-कॉलेजांतून सहशिक्षण दिलें जातें. परंतु कांहीं मर्यादेपर्यंत गेल्यानंतर ज्यांची इच्छा असेल त्या मुलींकरितां कांहीं निराळे विषय असतात.

सहशिक्षणांत विविध पंथ

गृहशास्त्र, टायपिंग, नर्सींग, शिवणकला इत्यादि विषयांकरितां स्वतंत्र वर्ग व स्त्रियांच्या शाळाहि असतात. रशियन लोकांच्या भाषेंत बोलावयाचें झाल्यास ‘ अमेरिकेंत सहशिक्षण नाहीं, ’ फक्त

कांहीं विषयांचे वर्ग एकत्र घेतले जातात. रशियन शाळांनीं खऱ्याखुऱ्या अर्थानें सहशिक्षण व समान शिक्षण सुरू केलें आहे. तेथें मुलींकरितां निराळे विषय व मुलांकरितां निराळे विषय असे नाहींत. उदाहरणार्थ, वर्कशॉपमध्यें लोहारकाम करतांना मुलें व मुली एकत्र दिसतात. म्हणजे या देशांत एकत्र व एकाच ध्येयानें स्त्रीपुरुषांचें शिक्षण चालू आहे. इंग्लंड व फ्रान्समध्यें सहशिक्षण नाहीं. कांहीं विश्वविद्यालयांत मात्र उच्च शिक्षणाचे एकत्र वर्ग असतात. सध्यां कांहीं दुय्यम शाळांतून मुलेंमुली एकत्र शिकतात, त्याचें कारण मुलींकरितां स्वतंत्र संस्था काढणें खर्चाचें पडतें. म्हणजे या देशांत सहशिक्षणाचें तत्त्व असें मान्य झालें नाहीं. जर्मनीमध्येंहि मुलींचीं व मुलांचीं हायस्कुलें स्वतंत्र आहेत. या स्वतंत्र शाळांतून आजपर्यंत सारखेच विषय शिकविले जात; परंतु यापुढें मुलींना स्वतंत्र विषय शिकविले जातील. सारांश, सहशिक्षण व समान शिक्षण या दृष्टींनीं अमेरिका यूरोपांत सर्व प्रकारची विविधता आहे. एकच तत्त्व मान्य व प्रचलित आहे असें नाहीं.

विवाह, नीति, आणि आर्थिक समाजरचना यांचा परस्पर संबंध किती आहे, तें पाश्चात्य देशांवरून दिसून येतें. पाश्चात्यांना

**वैवाहिक मर्यादा**

प्रौढविवाह संमत असला तरी या प्रौढत्वाला वयाची वरची मर्यादा घालणें कठीण झालें आहे. आर्थिक परिस्थिति अशी झाली आहे कीं, उच्च शिक्षण मिळाल्याशिवाय चांगली नोकरी मिळत नाहीं, व नोकरी मिळाली तरी पुरेसें द्रव्य सांचल्याशिवाय पुरुष लग्न करीत नाहीं. त्या कारणानें पुरुष व स्त्रिया या बऱ्याच प्रौढ वयापर्यंत अविवाहित राहतात. अर्थात् याचा परिणाम रूढ सामाजिक नीतिनियमांवर अपरिहार्यपणें होतोच.

ही आपत्ति दूर करण्यास दोन मार्ग आहेत. एक तर आर्थिक समाजं-रचना अशा रीतीनें बदलली पाहिजे कीं, तिच्यामध्यें प्रत्येक तरुण वयांत आल्याबरोबर त्यास कामधंदा मिळेल व विवाह करण्यापुरता तो स्वावलंबी होऊं शकेल; किंवा समाजाच्या नीतिविषयक कल्पना तरी बदलल्या पाहिजेत. हिंदुस्थानांत समाजनेत्यांनीं ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, नीति आर्थिक परिस्थितीवर आवलंबून आहे. आपल्या नीतिविषयक कल्पना टिकवा-वयाच्या असतील, तर केवळ नीतीचा उपदेश करून भागणार नाहीं. आर्थिक परिस्थितीला आपल्या जरुरीप्रमाणें नियंत्रण घातलें पाहिजे व प्रत्येक कर्तबगार तरुणाला त्याच्या उमेदीच्या वयांत संसाराला पुरेसें उत्पन्न मिळेल अशी व्यवस्था झाली पाहिजे. रशियांत प्रौढ विद्यार्थ्यांना सरकार शिष्यवृत्त्या देतें आणि विवाहित विद्यार्थ्यांची वसतिगृहांत राहण्याची सोय केली जाते. अमेरिकेंतहि प्रौढ विद्यार्थी व विद्यार्थिनींची प्रवृत्ति लग्न करून राहण्याकडे होत आहे. सारांश, आर्थिक परिस्थिति अनुकूल असेल तर वैवाहिक नीतिनिर्बंध पाळून राहावें अशा प्रकारची मानवी प्रवृत्ति आहे, व तात्कालिक आंदोलनामुळें ती नाहींशी झाल्यासारखी वाटली तरी ती अखेरपर्यंत टिकून राहील.

स्त्रीजीवनाचा विचार करतांना गृहसंस्था व कुटुंब यांचा प्रश्न उत्पन्न होतो. पाश्चात्य देशांतील कुटुंबसंस्था नामशेष होत आहे व रशिया तर ती नामशेष करण्याला उठलेलाच आहे, असा इकडे गैरसमज आहे. पाश्चात्य देशांत फिरणाऱ्यानें बारीक निरीक्षण केलें तर त्याला गृहसंस्था नष्ट झाल्याचें किंवा होईल असें चिन्ह दिसत नाहीं. मोठमाठया शहरांतून कांहीं लोकांची प्रवृत्ति हॉटेलामधून

**भावी कुटुंबसंस्था**

राहाण्याची आहे ही गोष्ट खरी असली तरी बहुजनसमाजाची तशी आवड दिसत नाहीं. उपलब्ध परिस्थितींत बायकामुलांसह आपण स्वतंत्र जागेंत राहावें, अशी सर्वसामान्य इच्छा असते. शहरें सोडून लहान गांवें पाहिलीं तर तेथील गृहसंस्था चांगल्या स्थितींत असल्याचें दिसतें. घरामध्यें स्त्रियांना जीं कष्टाचीं व जिकिरीचीं कामें करावीं लागतात तीं मात्र दिवसेंदिवस कमी होत चाललीं आहेत. घरीं स्वयंपाक केला तरच तें कुटुंब अशी आपली समजूत आहे ती तिकडे नाहीं. रशियाचें ब्रीदवाक्य असें आहे कीं, 'स्वयंपाकघर पाडून टाका' (Down with the kitchen). म्हणजे स्त्रियांचीं कष्टाचीं, त्रासाचीं व वेळ जाणारीं कामें कमी होऊन त्यांना त्यांच्या लायकीचीं उच्च कामें मिळावीत व बाकीचा वेळ त्यांना सांस्कृतिक व्यवसायांत घालवितां यावा अशा प्रकारची कुटुंबव्यवस्था निर्माण करण्याचा पाश्चात्यांचा प्रयत्न चाललेला दिसतो. आपापलीं घरेंदारें मोडून सर्वांनीं हॉटेलांत राहावें अशा प्रकारची समाजयोजना रशियांत अथवा इतरत्र कोणत्याहि देशामध्यें नाहीं.

सामुदायिक राहणीनें सांस्कृतिक स्वरूपाचे फायदे फक्त श्रीमंत कुटुंबांच्याच आटोक्यांत न राहातां यच्चयावत् कुटुंबाला मिळावेत ते मिळण्याकरितां आपली रूढ स्वरूपाची कुटुंबकल्पना थोडी बदलावी आणि कौटुंबिक व सामुदायिक अशा दोन्ही पद्धतींच्या राहणीचे फायदे एका नवीन गृहसंस्थेंत आणावेत असा पाश्चात्यांचा प्रयत्न चाललेला आहे. समाजाच्या प्रगतींत ही अगदीं स्वाभाविक अशी अवस्था आहे.

स्त्रीजीवनाचा विचार करतांना आर्थिक व सामाजिक अशा अनेक गोष्टींचा विचार जमेस धरावा लागतो. स्त्रियांनीं नोकऱ्या

**व्यापक प्रश्नाचा एक भाग**

कराव्यात किंवा नाहीं, विवाह कोणत्या वयांत करावा, घरकाम करावें कीं नाहीं, शिक्षण मुलांबरोबर घ्यावें कीं स्वतंत्र घ्यावें, इत्यादि

प्रश्न स्वतंत्रपणें सुटण्यासारखे नाहींत. आपल्या समाजाची आर्थिक रचना कशा प्रकारची असावयास पाहिजे, कशी आहे व कशी होईल या गोष्टींच्या अनुरोधानें वरील प्रश्न सोडवावयास पाहिजेत. स्त्रिया, वैवाहिक जीवन, नीति, आणि आर्थिक समाजरचना या गोष्टी अशा परस्परावलंबी असल्यामुळें त्या सर्वांचा साकल्यानें विचार करून प्रत्येक समाजानें आपले प्रश्न सोडविले पाहिजेत. पाश्चात्य देशांत आज जे स्त्रियांचे प्रश्न पुढें आले ते तेथील विशिष्ट आर्थिक आणि सामाजिक परिस्थितीमुळें आलेले आहेत.

स्त्री–पुरुषांकरितां स्वतंत्र शाळा काढणें खर्चाचें झालें म्हणून सहशिक्षण सुरू झालें. युद्धाच्या काळीं पुरुष लढाईवर गेल्यामुळें स्त्रिया कारखान्यांत व ऑफिसांत कामें करूं लागल्या; पुरुषांना लौकर नोकऱ्या मिळेनात म्हणून त्यांचें लग्नाचें वय वाढलें. अशा रीतीनें एकीकडे आर्थिक परिस्थितीचा परिणाम स्त्री–जीवनावर होत आहे व दुसरीकडून सामाजिक वेदांतानें त्याला वळण लाविलें जात आहे. जी परिस्थिति पाश्चात्य देशांत उत्पन्न झाली तिला येथें नुकतीच सुरुवात झालेली आहे. पाश्चात्यांची आर्थिक जीवनपद्धति आपण स्वीकारल्याबरोबर न कळत समाजाच्या इतर संस्थांवरहि तिचा परिणाम झालेला आहे. म्हणूनच आज सहशिक्षण, नीति, विवाह, कुटुंबसंस्था इत्यादिविषयक कल्पनांना आंदोलनें बसत आहेत.

भावी काळांत आपल्या समाजापुढें दोन मार्ग आहेत. एक मार्ग, आपाततः जी आर्थिक समाजरचना येईल तिच्या अनुरोधानें कुटुंब, नीति, विवाह, इत्यादि कल्पना बदलणें हा आहे. असें केल्यास पाश्चात्यांच्याच इतिहासाची पुनरावृत्ति येथेंहि होईल. दुसरा मार्ग म्हणजे समाजनेत्यांनीं व्यापक दृष्टि ठेवून आपल्या जीवनाचें

आणि समाजाचें तत्त्वज्ञान निश्चित करून त्याला अनुकूल अशा समाजसंस्थांची योजना करावी, असा आहे. नीति, विवाह, कुटुंब, शिक्षण, व्यवसाय, आश्रम इत्यादि संस्थांबाबत आपल्या कल्पना प्रथम निश्चित करून त्यांना अनुकूल व पोषक अशा प्रकारचीच आर्थिक समाजरचना निर्माण करावी. म्हणजे आर्थिक परिस्थितीनें सामाजिक वेदान्त बदलण्यापेक्षां सामाजिक वेदान्ताप्रमाणें आपली आर्थिक परिस्थिति योजनापुरस्सर निर्माण केली जावी. परिस्थिती-प्रमाणें आपण बदलण्यापेक्षां आपल्या योजनेप्रमाणें परिस्थिति बदलण्याचा प्रयत्न केला पाहिजे. या दोहोंपैकीं कोणता मार्ग आपण स्वीकारावयाचा हें ठरविण्याची आवश्यकता आपल्या समाजाला आज आलेली आहे.

---

## प्रकरण तेहेतिसावें

# रंगेल तरुण बंडखोर झाले

महायुद्धाच्या पोटांतून नवीन नीतीचा जन्म झाला. १९१४ ते १९१९ या अवधींत रणक्षेत्रावर जे तरुण गेले ते परत आल्या-वर पूर्वींप्रमाणें राहिले नाहींत. घर सोडून रण-क्षेत्रावर गेल्यानंतर, स्वाभाविकपणेंच घरांतील वडील माणसांचें दडपण नाहींसें झालें. शैक्षणिक व नैतिक दृष्टया दुसऱ्या कोणाचा दाब राहिला नाहीं. युद्ध जिंकणें हें मुख्य ध्येय मुत्सद्यांपुढें व लष्करी अधिकाऱ्यांपुढें असल्यामुळें, बाकीच्या किरकोळ वर्तनाकडे कानाडोळा केला जातो. लष्करी शिपाई आणि देशोदेशीं फिरणारे खलाशी या वर्गाच्या नीतिमत्तेकडे पाश्चात्य लोक विशेष चिकित्सापूर्वक पाहात नाहींत म्हटलें तरी चालेल. अशा या पेशांत शिरलेल्या विद्यार्थी तरुणांची

रणक्षेत्रावरील रंगेल तरुण

नीतिविषयक दृष्टि बदलली असल्यास नवल नाहीं. युरोपमधील रणक्षेत्रावर येऊन जे विद्यार्थी परत अमेरिकेंत आपापल्या कॉलेजांतून गेले, त्यांनीं आपल्या नवनीतीची परंपरा त्या त्या ठिकाणीं स्थापन केली. या नीतीच्या मुळाशीं एकच तत्त्व होतें, तें म्हणजे कोणत्याहि प्रकारचें बंधन नको. युद्धक्षेत्रावर असतांना ज्याप्रमाणें नीतिविषयक बाबतींत विशेष विधिनिषेध नव्हता, लष्करी शिस्त सांभाळून स्वैराचाराला मूक परवानगी होती, तीच वृत्ति पुढें चालू राहावी ही इच्छा! अमेरिकन कॉलेजांतून सहशिक्षण असल्याकारणानें, या नवीन वृत्तीमुळें झालेल्या अनर्थाचा फार गाजावाजा झाला. जज्ज् लिंडसे यानें 'रिव्होल्ट ऑफ् मॉडर्न यूथ' या पुस्तकांत अतिशयोक्तीनें वर्णन केलेलें चित्र याच काळांतील आहे. सहशिक्षण नसलेल्या जर्मनी इत्यादि इतर देशांतही या नवीन स्वैराचारी वृत्तीचें प्रतिबिंब पडलेलें दिसून आलें.

रूढ नीतिनियमांविरूद्ध जी बंडखोर वृत्ति उत्पन्न झाली तिचा प्रचार इतर क्षेत्रांतही झाला. कांहीं कांहीं कॉलेजांतून धर्म–प्रवचनाचे वेळीं विद्यार्थ्यांनीं चॅपेलमध्यें हजर राहिलें पाहिजे, अशी सक्ती असे. या सक्तीविरुद्ध विद्यार्थ्यांनीं मोहीम सुरू केली. धर्मशिक्षणाची सक्ती नको, ज्याला पाहिजे त्यानें तें घ्यावें, इतरांना स्वातंत्र्य असावें, अशी मागणी विद्यार्थ्यांच केली. कांहीं सरकारी कॉलेजमधून आर. ओ. टी. सी. नांवानी लष्करी शिक्षणाची योजना आहे. कॉलेजमधील प्रत्येक विद्यार्थ्याला लष्करी शिक्षण घेण्याची सक्ती असे, याचेविरुद्ध विद्यार्थ्यांनीं मोहीम सुरू केली, त्या वेळीं कित्येक प्रोफेसरांना व विद्यार्थ्यांना संस्था सोडाव्या लागल्या. मद्यपानाविरुद्ध अमेरिकेंत कायदा होता, परंतु विद्यार्थी खुशाल चोरून मारून दारू पीत असत. वैयक्तिक सुखाच्या

बंधनाच्या पलीकडे

आड कायदा येत असेल तर, तोही धाब्यावर बसवावा व मनाला येईल तसें वागावें, अशी विद्यार्थ्यांची वृत्ति बनली. त्यांचें कॉलेज-जीवन म्हणजे स्वातंत्र्य, स्वैराचार, सुखविलास, आणि सामाजिक बंधनाविरुद्ध बंडखोरी या तत्त्वांचें मूर्तिमंत चित्रच होतें.

महायुद्धानंतर १९२० पासून १९३० पर्यंत अमेरिकेचा अगदीं उत्कर्षाचा काळ होता. व्यापार—धंदा चांगला चालला असून प्रत्येकाला पैसे मिळवावयाला चांगली संधि होती.

सद्दीचा काळ व चैन

विद्यार्थ्यांनीं रोज ३—४ तास काम केलें कीं, त्यांना चैन करण्याला चार पैसे मिळत असत. शिक्षण संपल्यावर कोठें ना कोठें तरी नोकरीधंदा खास मिळेल, कॉलेज सोडण्याचा अवकाश, अशी स्थिति होती. या सुबत्तेमुळें व आर्थिक सुरक्षिततेमुळें, विद्यार्थ्यांच्या बंडखोर, सुखविलासी, व स्वैर-वर्तनी वृत्तीला अनुकूल वातावरण मिळाल्यासारखें झालें. परंतु १९३० पासून अमेरिकेची आर्थिक स्थिति पालटली आणि विद्यार्थ्यांच्या मनोवृत्तींत पालट होण्यास सुरुवात झाली.

१९३० सालापासून अमेरिकेंत व्यापारमंदीला प्रारंभ झाला. बेकारांचे तांडे खिशांत हात घालून व तोंडांत सिगारेट धरून ठिकठिकाणीं स्वस्थ बसूं लागले. विद्यार्थ्यांना स्वाव-

बेकारीचे प्रॉस्पेक्ट्स्

लंबनाचे दृष्टीनें अडचण पडूं लागली व चैनीला पैसा कमी पडूं लागला. आपलें शिक्षण संपल्यावर आधींच बाहेर असलेल्या बेकारांच्या तांड्यांत आपण जाऊन पडणार असें भेसूर चित्र त्यांचे डोळ्यांसमोर दिसूं लागलें. पालकांचे स्टॉक्स्-मधील पैसे बुडाले, त्याकारणानें घरची हलाखीची स्थिति झाली. घरची आशा नाहीं व भावी काळाचीही आशा नाहीं, अशा आप-त्तींत तरुण पिढी पडली. देशांत संपत्ति विपुल, परंतु दोन वेळेला

खायला मिळण्याची पंचाईत, अशी कैकांची स्थिति झाली. या परिस्थितीनें तरुण पिढीला धक्का दिला आणि तिला विचार करावयास लाविलें.

देशांत विपुल संपत्ति असतां लोक उपाशी मरतात, याचें कारण काय तें लोक शोधूं लागले. त्यांना असें आढळून आलें कीं,

व्यक्तिस्वातंत्र्य कीं समाजबंधन ?

व्यक्तिस्वातंत्र्य या तत्त्वाचा अतिरेक समाजाच्या आर्थिक क्षेत्रांत झाल्यामुळें दुर्बळ लोक समर्थ व्यक्तींच्या भक्ष्यस्थानीं पडत आहेत. प्रत्येकानें वाटेल तितका पैसा मिळवावा व वाटेल तसा त्याचा उपयोग करावा या स्वातंत्र्यामुळें समाजांत आर्थिक विषमतेची कमाल झाली. ही स्थिति नाहींशी व्हावयास पाहिजे असेल तर वैयक्तिक स्वातंत्र्याला, नफेबाजीला व धनसंचयाला समाजानें आळा घातला पाहिजे. व्यक्तीनें समाजाचें हित लक्षांत घेऊन वागलें पाहिजे, आपल्या पुरतेंच पाहून उपयोगी नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्याऐवजीं समाजबंधनाचे तत्त्वावर जीवन चाललें पाहिजे.

अशा विचारसरणीनें विचार करतां करतां विद्यार्थ्यांचे जीवनांतील पूर्वीचा थिल्लरपणा जाऊन त्यांत गांभीर्य व खोलपणा

तरुणांची उपरति

येऊं लागला. व्यक्तिस्वातंत्र्य व वैयक्तिक सुख यांवर उभारलेला आपला जीवनक्रम सदोष आहे, असें त्यांना वाटूं लागलें. समाजांतील व्यक्तींवर बंधन असावयास पाहिजे, हें तत्त्व त्यांना पटलें. जगांत स्वतःच्या चैनीपलीकडे समाज म्हणून कांहीं आहे आणि त्याकरितां आपण कांहीं केलें पाहिजे, अशी जागृति विद्यार्थीवर्गांत होऊं लागली. पूर्वीचीं नैतिक व धार्मिक बंधनें शिथिल झालीं असलीं तरी स्वतःच्या मनाचीं बंधनें आपल्या आचाराला घातलीं पाहिजेत अशी

जाणीव उत्पन्न झाली. जे विद्यार्थी प्रणय नाच-रंग-दारूंत एके वेळीं गुंग होते ते राजकारण, समाज, आर्थिक प्रश्न, कामकरी वर्गाची स्थिति, अस्पृश्य वर्ग ( नीग्रो ) आंतरराष्ट्रीय संबंध इत्यादि गंभीर प्रश्नांबद्दल विचार करूं लागले. त्यांच्या संघटना झाल्या, संस्था निघाल्या, सभा भरूं लागल्या व विद्यार्थीवर्गांत जिवंतपणा दिसूं लागला.

मजुरांचा कैवार

जगांतील आर्थिक मंदीनें विद्यार्थ्यांच्या चळवळीला जन्म दिलेला आहे म्हणून तिचा भर मुख्यतः आर्थिक पुनर्घटनेवरच असावा हें स्वाभाविक आहे. भांडवलवाल्या वर्गावर समाजाचें अधिक नियंत्रण असावें आणि कामकरी वर्गाची स्थिति सुधारावी, अशा प्रकारची तीव्र इच्छा तरुण वर्गांत उत्पन्न झाली. १९३१ सालीं मी अमेरिकेंत असतां, केंटक्की प्रांतांत खाणींतील कामगारांचा संप झाला होता व संपवाल्यांचे बरेच हाल चालले होते. ही स्थिति समक्ष अवलोकन करण्याकरितां कोलंबिया युनिव्हर्सिटींतून कांहीं विद्यार्थी तेथें मुद्दाम गेले होते. तेथील अधिकाऱ्यांनीं त्यांना आंत येण्यास मज्जाव केला व या प्रसंगानें विद्यार्थ्यांच्या चळवळीला अधिकच उत्तेजन मिळालें.

'न योत्स्ये'

अमेरिकेनें यापुढें युद्धांत पडूं नये, अशी दुसरी भूमिका तरुणांच्या चळवळीनें स्वीकारली आहे. १९१८।१९ सालीं महायुद्धावर गेलेल्या विद्यार्थ्यांच्या दृष्टीपुढें त्या प्रसंगाचें भेसूर चित्र अजून उभें आहे. भांडवलवाला वर्ग आपल्या वैयक्तिक फायद्याकरितां देशांतील लोकांना लढवावयास लावितो, आणि त्यांतून स्वतःचें हित साधतो. गोरगरीब मात्र विनाकारण खर्ची पडतात. यापुढें

युद्ध होऊं नये व झालें तरी त्यांत अमेरिकन लोकांनीं भाग घेऊं नये, अशी विचारजागृति सध्यां सर्व देशांतील तरुणांत चालली आहे. १९३२ सालीं वॉशिंग्टन येथें सर्व-विद्यार्थी-परिषद भरून, तींत युद्धविरोधी ठराव पास झाला. १९३४ सालीं पंचवीस हजार विद्यार्थ्यांनीं युद्धविरोधी मिरवणूक काढली होती. कॉलेज-मधील सक्तीच्या लष्करी शिक्षणाविरुद्ध चळवळ चालू आहेच. विद्यार्थी मोटारबसमधून खेडोपाडीं जाऊन, या विषयावर व्याख्यानें देऊन हस्तपत्रकें वाटतात, व कॉलेजमध्यें याविषयीं वादविवाद सभा भरवितात.

विद्यार्थ्यांच्या चळवळीची तिसरी दिशा म्हणजे वर्णभेद नाहींसा करावा ही होय. नीग्रो लोकांविरुद्ध जो पक्षपात केला जातो तो दूर होऊन समाजांतील सर्व वर्णांचे लोकांना समान लेखलें जावें अशा प्रकारची ही विचार-सरणी आहे.

वर्णभेद व सोशालिझम्

रशियांतील सोशालिझम् व अमेरिकन तरुणांचा सोशालिझम् यांत फरक आहे. अमेरिकन तरुणांत कांहीं क्रांतिपक्षीय असले तरी एकंदर बहुमत शांततामार्गानेंच जाण्याला अनुकूळ आहे. दुसरी गोष्ट म्हणजे रशियन चळवळींतील धर्मविरोधि वृत्तीचा अंगिकार अमेरिकन तरुणांनीं केलेला नाहीं; किंबहुना, अमेरिकन सोशा-लिझमचे पुढारी धार्मिक वृत्तीचे व अध्यात्मवादी आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. ही गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्या-सारखी आहे.

युद्धोत्तर शांततेच्या व सुबत्तेच्या काळांत प्रचारांत आलेल्या स्वैराचारी नवमतवादी नीतीला आर्थिक मंदाईमुळें धक्का दिला व विद्यार्थीवर्गांत जबाबदारी, शिस्त, आणि समाजबंधन या कल्पनांचा

उदय झाला. समाजांतील तांतडीचे प्रश्न विद्यार्थ्यांनीं आपल्या हातीं घेऊन त्यांचेकरितां कष्ट सोसण्याची तयारी दाखविली आहे. सर्वांत विशेष गोष्ट ही कीं, विद्यार्थ्यांच्या या चळवळीला प्रेरणा बाहेरून आलेली नसून त्यांच्यामधूनच ती निर्माण झालेली आहे. विद्यार्थी चळवळीचें पुढारीपण विद्यार्थ्यांकडेच आहे. या चळवळीची दिशा सोशालिझमच्या दिशेनें असली तरी, रशियन सोशालिझमच्या धर्मविरोधी व क्रांतिवादी तत्त्वांचा स्वीकार तिनें केलेला नाहीं.

स्वतःची प्रेरणा

इंग्लिश लोकांची वृत्ति पुराणप्रिय व रूढीला शक्य तितकी चिकटून राहणारी अशी आहे. याच वृत्तीचें प्रतिबिंब तेथील विद्यार्थीवर्गांतही दिसून येतें. घरांतील आईबापांचीं मतें व आपल्या विश्वविद्यालयांत प्रचलित असलेलीं मतें यांचेबाहेर इंग्लिश तरुण फारसा गेलेला नाहीं. महायुद्धानंतर यूरोपमध्यें झालेल्या कामकरी वर्गाच्या जागृतीची लाट विद्यार्थ्यांच्या जीवनप्रदेशाला फार उशीरा पोंचली. १९२६ सालीं इंग्लंडमध्यें सर्व कामकरी वर्गानें सामुदायिक संप ( जनरल स्ट्राईक् ) केला, त्या वेळीं विद्यार्थीवर्गानें हा संप हाणून पाडण्याकरितां कामकऱ्यांविरुद्ध सरकारला मदत केली. या धोरणाची मीमांसा करणें सोपें आहे. अमेरिकेंत कामकरी वर्गापासून श्रीमंत वर्गापर्यंत सर्वांचीं मुलें कॉलेजमधून जाऊं शकतात तशी इंग्लंडमध्यें स्थिति नाहीं. श्रीमंत कुळांत जन्माला आलेले व उच्च शिक्षण घेण्याची ज्यांना ऐपत आहे असेच सुखवस्तू व श्रीमंत विद्यार्थी कॉलेजमध्यें जाऊं शकतात. त्या कारणानें या मध्यम व श्रीमंत तरुणांची कामकरी वर्गाविषयीं सहानुभूति असणें शक्य नव्हतें. परंतु गेल्या सात आठ वर्षांत ही परिस्थिति पालटलेली आहे.

इंग्लिश तरुणांतील जागृति

विद्यार्थी आतांपर्यंत अभ्यासाच्या व कॉलेजच्या आवाराच्या बाहेर फारसे पाहात नव्हते. परंतु, गेल्या पंधरा वर्षांत झालेल्या जगांतील घडामोडीनें त्यांचें लक्ष क्रमिक पुस्तकांच्या व कॉलेजच्या बाहेर खेंचलेलें आहे. देशांतील बहुजन कामकरी वर्गाबद्दल विद्यार्थ्यांना सहानुभूति वाटूं लागली आहे. मध्यंतरीं गोदींतील कामगारांचा संप झाला त्या वेळीं या जागृतीची प्रचीति आली. या संपाचे वेळीं कांहीं विद्यार्थ्यांनीं संपवाल्यांची बाजू घेतली व कांहीं विद्यार्थ्यांनीं पूर्वीप्रमाणें सरकारला मदत केली.

आज इंग्लिश विद्यार्थ्यांत तीन पक्ष आहेत. एक क्रांतिपक्षीय कम्यूनिस्ट वर्ग. हे तरुण थोडे असले तरी, त्यांत बुद्धिमान् व अभ्यासू विद्यार्थ्यांचा भरणा आहे. दुसरा पक्ष सनदशीरमार्गी सोशालिस्टांचा. तिसरा वर्ग हा गेल्या एक दोन वर्षांतच पुढें येऊं लागलेला आहे, तो म्हणजे सर ऑसवल्ड मोस्ले यांच्या अनुयायांपैकीं फासिस्ट तरुणांचा.

नवीन राजकीय, सामाजिक आणि आर्थिक विचारांचा प्रसार तरुणांत होत आहे, आणि आज ना उद्यां या विचारांना आचाराचें स्वरूप येणार आहे. दोन विरोधी व क्रांतिवादी पक्ष समोरासमोर आले म्हणजे त्यांच्यांत चकमक उडणार, अशी सरकारला भीति वाटत असून तरुणांच्या चळवळींना पायबंद घालण्याकरितां एकादा कायदा करावा कीं काय असा विचार चालू होता. सारांश, इंग्लिश विद्यार्थीही आपल्या कॉलेजच्या खिडकींमधून समाजाचे व जगाचे चळवळीकडे उघडया डोळ्यांनीं पाहूं लागले आहेत.

ब्रिटिश विद्यार्थीवर्गांत विचारजागृति झाली असली तरी तिच्यांत वैशिष्टय असें कांहीं दिसत नाहीं. तें फ्रेंच तरुणांच्या चळवळींत दिसून येतें. फ्रान्सच्या राजकारणांत इतर देशांप्रमाणेंच भांडवलवाले व समाजसत्तावादी असे दोन पक्ष आहेत व ते अधिकारप्राप्ती-

फ्रेंच तरुणांचें तत्त्ववैशिष्टय

करतां एकमेकांशीं झगडत आहेत. परंतु, आपल्या वडील पिढीच्या या एकांतिक तत्त्वांचें अनुकरण न करितां, फ्रेंच तरुण पक्षानें एक तिसराच मार्ग काढला आहे. त्यांनीं अंधपणानें भांडवलशाहीचा पक्ष उचलून धरलेला नाहीं किंवा विकारवशतेनें निर्भेळ सोशालिझमचाहि पुरस्कार केलेला नाहीं. त्यांना दोन्ही विचारपद्धतींमध्यें दोष व वैगुण्यें दिसतात.

समतोल विचारसरणी

भांडवलशाहीच्या समाजपद्धतींत बहुसंख्य कामकरी वर्गाला न्याय्य असा मोबदला व समाजांत दर्जा मिळत नाहीं. नॅशनॅलिझमचे गोंडस नांवाखालीं स्वतःचा फायदा साधण्याकरतां, सत्ताधारी वर्ग गरीब लोकांना युद्धाचे खंदकांत ढकलून देतो. संपत्तीची विषम वांटणी होऊन समाजांत अखंड बेकारी चालू राहाते. स्वार्थ व नफेबाजी या तत्त्वांवर समाजाचा कारभार चालल्यामुळें, सद्गुणांची माती होऊन अनीति वाढत जाते. म्हणून भांडवलशाही सत्ता समाजांत नकोच नको. परंतु तिचा अखेर केल्यानंतर सोशालिझमच आला पाहिजे असा सिद्धांत या पक्षाला मान्य नाहीं. समाजसत्तावादांत जडवादावर भर फार आहे. ज्या ऐहिक सौख्याकरितां भांडवलवाला वर्ग आज प्राण टाकतो आहे तेंच ऐहिक सौख्य हें समाजाचें एकमेव ध्येय असावें हें मानवी प्रगतीचे दृष्टीनें इष्ट नाहीं. आर्थिक आणि भौतिक जीवन महत्त्वाचें असलें तरी, त्याचेपेक्षां श्रेष्ठ असेंही जीवनक्षेत्र प्रत्येक व्यक्तीला व समाजाला आहे; त्याला प्राधान्य दिलें पाहिजे. समाजसत्तावादांत व्यक्तीला स्वतंत्र अस्तित्व नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्याचा आर्थिक क्षेत्रांत दुरुपयोग केला गेल्यामुळें सर्वच प्रकारच्या व्यक्तिस्वातंत्र्यावर गदा आणून व्यक्तीला समाजाचे गुलाम करणें हें इष्ट नाहीं. आर्थिक

समाजरचनेचे दृष्टीनें व्यक्ति परतंत्र असली तरी, आध्यात्मिक दृष्टीनें पूर्ण व्यक्तिस्वातंत्र्य असावें. अशा तऱ्हेनें आर्थिक समाजवाद व आध्यात्मिक व्यक्तिवाद अशा दोन तत्त्वांचा समावेश फ्रान्समधील तरुण पक्षानें आपल्या विचारांत केलेला आहे. भांडवलशाहींतील स्वार्थी व्यक्तिवाद व समाजसत्ता पद्धतींतील अमर्याद समाजबंधन या दोहोंमधून मार्ग काढण्याचा हा प्रयत्न आहे. औद्योगिक व भौतिक सुधारणेच्या युगांत व्यक्तीच्या आध्यात्मिक जीवनाचें संरक्षण कसें करावें हा या नवीन पक्षापुढील महत्त्वाचा प्रश्न आहे.

वैशिष्ट्य संगोपन

फ्रान्समधील तरुणांची चळवळ आज लहान प्रमाणावर असली तरी, तिचें वैशिष्टय लक्षांत घेतलें पाहिजे. प्रत्येक समाजाची व राष्ट्राची विचार करण्याची अशी कांहीं विशेष दिशा अथवा भूमिका असते. त्या समाजाचा इतिहास, पूर्वजीवन, व परंपरा यांतून एक तत्त्वज्ञान निर्माण झालेलें असतें. त्या समाजाची अशी विशेष मनोवृत्ति असते. या तत्त्वज्ञानाला व मनोवृत्तीला अनुकूल अशा प्रकारची सामाजिक पुनर्घटनेची योजना असली तर ती त्या समाजाला विशेष मानवते. या पद्धतीनें समाजरचना करण्याचें फ्रान्समधील तरुण पिढीनें योजिलेलें आहे.

हिंदी तरुणांपुढील प्रश्न

जगांत जी राजकीय, सामाजिक व आर्थिक खळबळ चालू आहे तिच्याच लाटा आज हिंदुस्थानांत येऊन पोहोंचल्या आहेत. जुन्या पद्धतीची समाजरचना व आर्थिक पद्धति यांबद्दल तरुणांचें मन साशंक झालेलें आहे आणि तें यापुढें अधिक श्रद्धाहीन होईल. समाजाची आमूलाग्र पुनर्घटना करण्याच्या अनेक योजना पुढें येतील. पाश्चात्य देशांत गेल्या पंधरा वर्षांत निर्माण झालेल्या तत्त्वांना कदा-

चित् येथेंही प्राधान्य दिलें जाईल. आज युरोपमध्यें ज्याप्रमाणें नॅशनॅलिस्ट, सोशालिस्ट, फॅसिस्ट, कम्यूनिस्ट, इत्यादि पंथांत कलह चालले आहेत तसे येथेंही हेच पंथ स्थापन होऊन त्यांत यूरोपियन इतिहासाची पुनरावृत्ति होईल. त्यांत दूरदर्शी आणि विचारी माणसांनीं असा विचार केला पाहिजे कीं आपल्या समाजाच्या तत्त्वज्ञानाला आणि मनोवृत्तीला सुसंगत असें सामाजिक पुनर्घटनेचें कोणतें तत्त्व आहे? या दृष्टीनें विचार केला तर युरोपियन सामाजिक तत्त्वज्ञानांतील चांगले गुण असलेलें, परंतु त्यांत हिंदी समाजाचेंही वैशिष्टय असलेलें व या समाजाला मान्य होणारें असें तत्त्वज्ञान आपण निर्माण करूं शकूं.

**जर्मन व हिंदी तरुण**

राजकारणाचे दृष्टीनें जर्मन विद्यार्थ्यांत जो जिवंतपणा दिसतो तो इतरत्र दिसून येत नाहीं. पंधरा वर्षांपूर्वी पराभूत झालेल्या आणि जेत्या राष्ट्रांकडून निःशस्त्र झालेल्या जर्मनीबद्दल आज यूरोपमध्यें जो दरारा वाटत आहे त्याचें सर्व श्रेय जर्मन तरुणांना आहे. दीडशें वर्षांपूर्वी पराभूत झालेल्या आणि १८५७ सालीं निःशस्त्र झालेल्या हिंदुस्थानच्या तरुणांनीं जर्मन विद्यार्थ्यांच्या कामगिरीचें काळजीपूर्वक निरीक्षण करून त्यांतील उपयुक्त व विधायक भाग उचलला पाहिजे.

**धुमसणारा सूडाग्नि**

महायुद्ध सुरू झाल्यावर दहा लाख जर्मन विद्यार्थी रणांगणावर देशकार्याकरितां गेले. युद्धाचे अखेर जर्मनींत राज्यक्रांति झाली व कैसरची एकतंत्री राज्यसत्ता नष्ट होऊन त्या ठिकाणीं सोशल डिमॉक्रसी स्थापन झाली. या प्रसंगीं रणांगणावर असलेल्या तरुणांना असें वाटलें कीं, आपण युद्धांत गुंतलों असतां, सोशल डेमॉक्रॅटिक

पार्टीनें आपल्या मागें बंड करून जर्मनीचा पराभव घडवून आणला. त्यामुळें नवीन स्थापन झालेल्या राज्यपद्धतीबद्दल जर्मन तरुणांना कधींच आत्मीयत्व वाटलें नाहीं. त्यांना असें वाटलें कीं, राष्ट्रीयत्वाचें बलिदान करून ही नवीन शासनपद्धति अस्तित्वांत आलेली आहे. पुनः एकदां राष्ट्रीय वृत्तीचें सरकार अस्तित्वांत आणावें, आणि जर्मनीचा जो पराभव झाला त्याचें परिमार्जन करावें अशी रुखरुख तरुणांना लागून राहिली. जर्मनींत महायुद्धानंतर वरवर शांतता दिसत असली तरी, युद्धांत झालेल्या पराभवाचा सूडाग्नि जर्मन तरुणांच्या अंतःकरणांत धुमसत होता. अनुकूल वेळ आल्याबरोबर त्यांनीं सर्व देशांत वणवा पेटवून दिला.

**नॅशनॅलिझम् कीं सोशालिझम् ?**

जर्मनींतील उदाहरणावरून असा एक प्रश्न सुचतो कीं, नॅशनॅलिझम् आणि सोशालिझम् यांपैकीं तरुणांना आकर्षक वाटणारें असें तत्त्व कोणतें ? सोशालिझमच्या कल्पना उदार आणि आकर्षक आहेत ही गोष्ट खरी; पण परतंत्र राष्ट्राच्या नॅशनॅलिझमच्या कल्पनेशीं या तत्त्वाचा विरोध येऊं लागला तर, जर्मन तरुणांप्रमाणें कोणत्याही देशांतील तरुण प्रथम स्वाभिमानानें नॅशनॅलिझमचाच पुरस्कार करतील. परंतु पारतंत्र्याचा प्रश्न नसेल आणि एकाच देशांतील समाजांत जेव्हां नॅशनॅलिझम् आणि सोशालिझम् या तत्त्वांमध्यें विरोध उत्पन्न होईल त्या वेळीं तरुणांना सोशालिझमचें तत्त्व हें अधिक उदार आणि आकर्षक असें वाटेल, हें अमेरिकेच्या उदाहणावरून दिसून येईल. तरुणांची ही द्विधा होणारी मनोवृत्ति लक्षांत घेऊन, हिटलरनें दोन्ही टोकें टाळून नॅशनल–सोशालिझम् असा तिसराच एक पंथ निर्माण केला. जर्मनींत जो प्रश्न तरुणांचे पुढें आला तोच पुढील पांच दहा वर्षांत

हिंदी तरुणांपुढें येणार आहे. अशा वेळीं देशाचें पुढारीपण स्वीकारणाऱ्या पुढाऱ्यांच्या अंगीं तरुणांचें मन ओळखून नवीन वेदान्त निर्माण करण्याचें सामर्थ्य असेल तरच त्याला तरुणांचा पाठिंबा मिळेल.

१९३३ मधील नाझी राज्यक्रांति झाली त्यापूर्वी बारा तेरा वर्षे विद्यार्थीवर्गांत राजकीय चळवळी चालू होत्या. त्यांच्यांत कम्यूनिस्ट, सोशालिस्ट, डेमोक्रॅटिक आणि नॅशनॅलिस्ट असे चार पंथ होते. पैकीं नॅशनॅलिस्ट पक्षाचा जोर विशेष होता. प्रत्येक कॉलेजमध्यें हे पक्षोपपक्ष असावयाचेच. त्यांच्या सभा व परिषदा भरत आणि वेळ प्रसंगीं हे तरुण प्रत्यक्ष राजकारणांतही भाग घेत असत.

सोशल डेमोक्रॅटिक पक्ष अधिकारांत आल्यावर तरुणांना आपल्या बाजूला वळविण्याचा त्यानें फारसा प्रयत्न केला नाहीं.

हिटलरचा चाणाक्षपणा

उलट, हिटलरनें तरुणांनाच आपले हाताशीं धरलें. त्यानें त्यांचा एक यूनिफॉर्म ठरवून दिला, त्यांच्या सलामाची पद्धत ठरविली, त्यांना स्वस्तिक चिन्हांकित निशाण दिलें, आणि त्यांच्यांत लष्करी शिस्त उत्पन्न केली. ज्या वेळीं अमेरिकन विद्यार्थी व्यक्तिस्वातंत्र्याच्या नांवाखालीं स्वैर वर्तन करीत होते त्याच वेळीं हे जर्मन विद्यार्थी आपल्या पुढाऱ्याला सर्वस्व अर्पण करून, त्याच्या शिस्तीखालीं व बंधनाखालीं वागत होते. याचें सार असें कीं, जोंपर्यंत तरुणांचे पुढें एकादें प्रभावी ध्येय नसतें व पुढारी नसतो तोंपर्यंत त्यांच्या बेलगाम व्यक्तिस्वातंत्र्याला व स्वैराचाराला भर येतो. परंतु आकर्षक ध्येय पुढें ठेवणारा पुढारी भेटल्याबरोबर हेच तरुण आपलें सर्व स्वातंत्र्य त्याचे चरणीं वाहावयास तयार असतात. तरुणांची ही मनोवृत्ति समजून वागेल तो पुढारी चाणाक्ष.

आजच्या नाझी राजवटींत तरुणांना पुष्कळ मान आहे. प्रौढ

विद्यार्थी नाझी पक्षांतील सभासद होऊं शकतात. विद्यार्थ्यांची संघटना अशा प्रकारची आहे कीं, तींत दाखल झालेला तरुण कालांतरानें आपोआप नाझी पक्षाचा सभासद होतो. राष्ट्राकरितां कष्ट करण्याची संवय तरुणांना लाविली जाते. पुढारीपणानें हुकमत कशी चालवावी व अनुयायाप्रमाणें आज्ञा कशी पाळावी या दोन्हीं गोष्टी त्यांना शिकविल्या जातात.

नाझी विद्यार्थ्यांची संघटना

रशियांत तरुण पिढी आणि वयस्क पिढी असे समाजाचे भेद नाहींत. किंबहुना मूल जन्माला आल्याबरोबर तें रशियन नागरिक होतें. विद्यार्थी अथवा तरुण म्हणून नागरिकाचीं कर्तव्यें कोणास सुटत नाहींत. इतर देशांत तरुण आणि वयस्क पिढींत जो विरोध दिसून येतो तो रशियांत दिसत नाहीं. या ठिकाणीं दोन्ही पिढ्यांचें पूर्ण मतैक्य आहे.

रशियन नागरिक विद्यार्थी

विद्यार्थीवर्गाकडे पाहण्याची रशियाची व आपली दृष्टि निराळी आहे. आपली अशी दृष्टि आहे कीं, विद्यार्थीदशा अथवा विद्या संपेपर्यंतचें वीस पंचवीस वयाचें आयुष्य हें सावलींत, समाजापासून अलिप्त अशा वातावरणांत जावें. या अवधींत विद्यार्थ्यांना व्यवहारांतील व समाजांतील कठोर वातावरणाची झळ लागूं नये. त्यांना पालकांनीं अथवा समाजानें पैसे पुरवावेत व तरुणांनीं ते फक्त खर्च करावेत. द्रव्यार्जन करण्याचे समाजांतील कष्ट काय असतात याची कल्पना त्यांना येऊं नये. त्यांचें आयुष्य सावलींत जावें. आपला विद्याभ्यास सांभाळून साधला तर थोडाबहुत रोमान्स विद्यार्थ्यांनीं करावा ! या अवधींत आपण त्यांना उपदेश करीत असतों कीं, 'बाबांनो, उद्यां तुम्ही नागरिक होणार; तयारी

करा'. जणूं कांहीं नागरिकांचीं कर्तव्यें प्रथम पाठ करावयाचीं आणि नंतर तीं भराभर आचरावयाचीं असतात !

रशियांतील विद्यार्थी–अवस्थेची कल्पना याच्या अगदीं उलट आहे. नागरिकत्वाचें प्रथम नुसतें ज्ञान करून द्यावयाचें आणि, कांहीं वर्षांनीं त्याप्रमाणें कर्म आचरून घ्यावयाचें ही गोष्ट मानवी स्वभावाचे दृष्टीनें शक्य नाहीं. ज्ञान आणि कर्म यांची सांगड एकाच वेळीं घातली गेली पाहिजे.

**कर्ममूलक विद्या**

कर्म करीत असतां त्याचें ज्ञानांत रूपांतर होतें व उलट ज्ञानाची उपकारक प्रतिक्रिया कर्मावर होत असते. विद्यार्थी–अवस्थेंतच जर विद्यार्थी नागरिक या नात्यानें व जबाबदारीनें आपलें कर्तव्य करतील तरच पुढें ते आपलीं जबाबदारीचीं कामें निश्चितपणें पार पाडतील. याकरितां रशियन विद्यार्थ्यांना प्रत्येक अवस्थेंत त्यांच्या मगदुराप्रमाणें सार्वजनिक काम लावून दिलेलें असतें.

गेल्या पंधरा वर्षांत रशियन तरुणांनीं आपल्या समाजाला उपयुक्त अशी मोठी कामगिरी केलेली आहे. अखिल निरक्षर समाजाला एक तपाचे अवधींत साक्षर करण्याचें जें अलौकिक कार्य रशियांत झालेलें आहे त्याचें पुष्कळसें श्रेय रशियन विद्यार्थीवर्गाला आहे.

**रशियन तरुणांची कतबगारी**

पंधरा वर्षांच्या हायस्कूलमधील मुलामुलींनीं चाळीसपन्नास वर्षांच्या वयस्क नागरिकांना लिहिण्यावाचण्यास शिकविलेलें आहे. रशियांतील सर्व शेती सरकारी मालकीची करण्याच्या कामीं पंचवीस हजार तरुण विद्यार्थ्यांची मदत झालेली आहे. ठिकठिकाणीं समाजोपयोगी अशीं कामें विद्यार्थ्यांनीं केलेलीं आहेत. मी मॉस्कोमध्यें असतांना तेथें सब्वेचें ( जमिनीखालून जाणाऱ्या आगगाडीचें ) काम चाललें होतें. या कामीं सरकारजवळ पैसा नव्हता म्हणून तरुण विद्यार्थ्यांनीं

आपल्या अंगावर हें काम घेतलें व स्वतः मजुरांप्रमाणें श्रम करून, सब्वेचा एक भाग पुरा केला. तरुणांच्या या उत्साहाचें प्रतीक म्हणून मॉस्कोमध्यें एक रशियन तरुणाचा प्रचंड पुतळा उभा केलेला आहे. आपापला अभ्यास चालू असतां, निरनिराळ्या फॅक्टरींमध्यें विद्यार्थी काम करीत आहेत. या ठिकाणीं औद्योगिक संशोधन व सुधारणा करण्याचें काम त्यांचेकडून होत आहे. सारांश, आपण समाजाचे एक जिवंत घटक आहोंत व त्या दृष्टीनें आपले हातून कर्तव्य झालें पाहिजे ही भावना रशियन तरुणांचे ठिकाणीं आहे.

प्रत्यक्ष सार्वजनिक कार्याशिवाय विद्यार्थ्यांच्या बौद्धिक चळवळी त्रिविध प्रकारच्या आहेत. प्रत्येक शाळा कॉलेजांतून त्यांचीं

**व्यापक अभ्यासाची वृत्ति**

चर्चामंडळें आहेत. या ठिकाणीं राजकारण, अर्थशास्त्र, समाजशास्त्र इ. विषयांवर चर्चा होत असते. प्रत्येक वर्गाचें एक वॉल न्यूजपेपर अथवा हस्तलिखित वर्तमानपत्र असतें. हें विद्यार्थी स्वहस्तानें लिहितात व दर आठवड्याला अथवा ठराविक वेळीं सार्वजनिक ठिकाणीं बोर्डावर लावितात. विद्यार्थ्यांचीं अभ्यास मंडळें (स्टडी सर्कल्स्) असतात. प्रत्येकजण ठराविक विषयावर वाचन करून येऊन आपला अहवाल सभेस सादर करितो. रशियन तरुणांच्या सामाजिक व राजकीय चळवळींना बौद्धिक अधिष्ठान आहे.

रशियांतील राज्यक्रांति ही वयस्क माणसांनीं घडवून आणली; परंतु ही समाजक्रांति चिरस्थायी होण्याचे दृष्टीनें तरुणांची मदत झाली व होत आहे.

---

## प्रकरण चौतिसावें

# तरुणांचे मनोवृत्तींत झालेली क्रांति

महायुद्धानंतरचीं पंधरासोळा वर्षें हीं यूरोप अमेरिकेंत अगदीं खळबळीचीं गेलीं आहेत. या अवधींत राजकीय आणि सामाजिक क्रांत्या झाल्या, आर्थिक आपत्ती आल्या, जुने वेदांत बदलले व नवीन संस्था अस्तित्वांत आल्या. या सर्वांचा परिणाम तरुण पिढीच्या व विद्यार्थ्यांच्या मनावर झालेला असून, त्याचें प्रतिबिंब विद्यार्थ्यांच्या चळवळींत व विचारसरणींत पाहावयास सांपडतें.

एका तपांतील क्रांत्या

१९१९ सालीं महायुद्ध संपून जर्मनीच्या कैसरचा मुकूट वितळला गेला. त्यांतून सोशल–डिमॉक्रसी निर्माण झाली. ती स्थापन होऊन बारा वर्षें होतात न होतात तोंच तिचेहि बारा वाजले आणि पुन: दुसरी राज्यक्रांति होऊन, नॅशनल–सोशालिझमचा उदय झाला. रशियामध्यें क्रांति होऊन झारच्या सिंहासनावर कामगारवर्ग बसला. या देशांत निव्वळ राजकीय क्रांति झाली नाहीं तर आमूलाग्र समाजक्रांति झाली. सरदार उमराव, श्रीमंत गरीब, मालक मजूर, असे समाजवर्ग नाहींसे होऊन, एकजात कामगार वर्गाचा समाज निर्माण झाला. इटलीमध्यें फॅसिस्ट राज्यपद्धति स्थापन होऊन, प्रस्थापित तत्त्वांपेक्षां एका निराळ्याच प्रयोगाला सुरवात झाली. पूर्वयूरोपांतील लहान लहान देशांतही राज्यक्रांत्या होऊन नवीन नवीन प्रयोगांना प्रारंभ झाला.

तरुणांची साशंक वृत्ति

अशा या विविध राज्यपद्धतीं व समाजपद्धती यूरोपमध्यें स्थापन झाल्यामुळें, स्वत:च्या देशांतील प्रस्थापित सत्तेविषयीं तरुणांच्या मनांत एक प्रकारची साशंक वृत्ति उत्पन्न झाली " आहे तें सर्व ठीक आहे, आपल्याला त्यांत काय करावयाचें " ही वृत्ति

जाऊन, " या सर्वांतून आपण कसा मार्ग काढवा " अशा प्रकारची शोधक व जिज्ञासू वृत्ति त्यांचे ठिकाणीं निर्माण झाली.

हें राज्यक्रांतीचें तत्त्व समाज, धर्म, आणि नीति यांतहि शिरलें. साशंक आणि बंडखोर वृत्ति निर्माण झाली म्हणजे ती एकाच क्षेत्रापुरती मर्यादित न राहतां तिचा व्याप इतर क्षेत्रांतही वाढतो. नवीन दिशेनें विचार करण्याची संवय होते. प्रस्थापित पद्धती याच श्रेष्ठ आहेत असें नसून यांपेक्षां अन्य पद्धतीही चांगल्या असणें शक्य आहे, त्यांचा प्रयोग करून पाहिला पाहिजे अथवा त्या शोधून काढल्या पाहिजेत, अशी वृत्ति निर्माण होते. जुन्या प्रामाण्यमर्यादा नाहींशा होतात, नवीन निर्माण होण्यापूर्वी बेबंदशाहीचा मध्यकाळ जात असतो. पूर्वीच्या अधिकारवाणीची किंमत नाहींशी होते; नवीन अधिकारवाणी निर्माण झालेली नसते. अशी स्थिति धार्मिक, सामाजिक व नैतिक क्षेत्रांत झाली. जुनी समाजपद्धति, जुन्या धर्मकल्पना, व जुनीं नीतिबंधनें यांचेबद्दल साशंक वृत्ति निर्माण झाली. श्रद्धा नाहींशी झाल्याबरोबर बंधनें शिथिल झालीं. नवीन सामाजिक व नैतिक कल्पनांचे प्रयोग होऊं लागले. या सर्वांचा परिणाम तरुण पिढीचे मनावर होऊन तिची पूर्वीची निश्चित दिशा नाहींशी झाली. जुन्या पिढीलाच ज्या प्रश्नांचीं उत्तरें माहीत नाहींत त्या प्रश्नांविषयीं तरुणांनींही अनिश्चित असावें ही गोष्ट स्वाभाविक आहे.

या सर्व परिस्थितींत आर्थिक दुष्काळाची भर पडली. सुबत्तेच्या काळांत माणसाला फारसा विचार सुचत नाहीं.

**सुखस्वप्नांचा बेरंग**

पोटाला चिमटा बसूं लागला म्हणजे डोकें विचार करूं लागतें. आईबापांच्या पैशावर सुखानें शिक्षण चाललें होतें, किंवा थोडें काम करून शिक्षणा-

पुरेशी द्रव्यप्राप्ति होत होती तोंपर्यंत सर्व कांहीं ठीक होतें. शिक्षण झाल्याबरोबर बाहेर नोकरी व कामधंदा तयार होता तोंपर्यंत विद्यार्थी-दशा गुलाबी सुखस्वप्नांत सहज पार पडत होती. परंतु ही परिस्थिति आर्थिक मंदीमुळें ( डिप्रेशन ) पालटली. मोठमोठे व्यापारी कंत्राटदार धुळीस मिळाले. विद्यार्थ्यांना बाहेर कामधंदा मिळेनासा झाला, आणि समाजांत बेकारांचे तांडे वावरत आहेत त्यांत आपण जाऊन काय करणार असें भेसूर चित्र कॉलेज विद्यार्थ्यांपुढें उभें राहिलें. भावी कालाबद्दल निराशा वाटूं लागली, त्यामुळें विचारशक्ति जागृत झाली.

न्यूयॉर्क टाईम्समध्यें १९३२ सालीं एका विद्यार्थ्यानें वर्तमानपत्रांत एक पत्र लिहिलें होतें, " मी एक दिवस भुकेनें व्याकूळ असतां, रेस्टॉरंटमध्यें जेवलों व मालकाचा डोळा चुकवून पैसे न देतां पळून गेलों. मी हुशार आहे, चांगला विद्वान् आहे, कर्तबगार आहे. अशा मला जो समाज कामहि देत नाहीं त्या समाजांत मी अशी चोरी केली हें योग्य केलें कीं अयोग्य केलें ? "

तरुणांना धक्के मिळाले !

या आपत्तीमुळें विद्यार्थी वर्गांत अशी वृत्ति निर्माण झाली कीं, ज्या समाजांत आपण राहतों त्याची आर्थिक आणि नैतिक घडी कोठें तरी बिघडलेली आहे. समाजाच्या तत्त्वज्ञानांतच कोठें तरी चूक आहे. अशा या समाजांत आमूलाग्र बदल केला पाहिजे आणि नवीन समाजपुनर्घटनेंत आपण प्रत्यक्ष भाग घेतला पाहिजे, तरच पुढची धडगत आहे, असें त्यांना वाटूं लागलें. आर्थिक आपत्तीनें विचाराला धक्का दिला आणि विद्यार्थ्यांच्या जागृतीला मदत केली.

राज्यक्रांति, सामाजिक क्रांति व आर्थिक मंदी यांची झळ

विद्यार्थ्यांना कमीजास्त लागली, त्याप्रमाणें निरनिराळ्या देशांतं त्यांच्यांतील जागृति ही पुढें मागें झाली. त्यांच्या विचारांवर व चळवळींवर स्थानिक परिस्थितीची छाया बरीचशी पडलेली आहे त्यामुळें निरनिराळ्या देशांतील तरुणांच्या चळवळींच्या दिशा भिन्न भिन्न आहेत.

प्रत्येक राष्ट्राचें व समाजाचें जें वैशिष्टय असेल त्याप्रमाणें त्या त्या देशांतील तरुणांच्या चळवळीस निरनिराळें स्वरूप प्राप्त झालेलें आहे. परंतु, या सर्वांच्या मुळाशीं कांहीं सामान्य प्रवृत्ति दिसून येतात. त्यांवरून पुढील पिढींत जगामध्यें काय घडामोडी होतील त्यांचा अंदाज बांधतां येईल.

बेकारीचा परिणाम

गेल्या चारपांच वर्षांतील आर्थिक घडामोडींमुळें तरुणांची एका बाबतींत खात्री झाली आहे, कीं प्रचलित समाजाची आर्थिक रचना ही सदोष आहे आणि ती बदलली पाहिजे. तरुण, सशक्त, बुद्धिमान्, विद्वान्, आणि चारित्र्यवान् अशा तरुणांना ज्या समाजांत दोन वेळ अन्नाची भ्रांत पडते आणि शिक्षण झाल्यावर बेकार म्हणून रस्तोरस्तीं फिरावें लागतें, त्या समाजाच्या पद्धतींत कांहीं तरी मोठा दोष आहे, तो दूर केला पाहिजे. तरुणांच्या बेकारीचा जगांतील राजकारणावर बराच परिणाम झाला आहे आणि यापुढें होईल. समाजांतील हा दोष दूर करण्याकरितां विद्यमान भांडवलशाहीच्या व नफेबाजीच्या पद्धतीवर समाजाचें नियंत्रण बसलें पाहिजे यावर सर्वांचें एकमत आहे. हें नियंत्रण किती असावें याबद्दल प्रत्येक देशांत भिन्न मतें आहेत.

भांडवलशाहीवर कोणत्याहि प्रकारचें नियंत्रण ज्या पद्धतींत येतें तिला 'सोशालिझम्' असें मोघम नांव देण्यांत येत आहे. परंतु, या सोशालिझम्मध्यें अनेक अर्थांच्या छटा असल्यामुळें त्यांचा

अर्थ आज सर्व ठिकाणीं निश्चित असा नाहीं. प्रत्येक देशांतील तरुण सोशालिस्टांची चळवळ त्या त्या देशाच्या सामाजिक परंपरा, मनोवृत्ति व तत्त्वज्ञान या गोष्टींवर अवलंबून आहे. अमेरिकेंत सोशालिझम् आणि धर्म व शांततावाद यांची सांगड घातली गेली आहे. फ्रान्समधील सोशालिझमला आध्यात्मिक आणि व्यक्तिविकास-प्रधान अशा तत्त्वज्ञानाची जोड दिली जात आहे. जर्मनींतील सोशालिझम् हा राष्ट्रीयत्व, जर्मन संस्कृति व जर्मन वंशाचा उत्कर्ष या चौकटींत बसविला गेला आहे. रशियांतील सोशालिझमचें स्वरूप क्रांतिवादी, विश्वराष्ट्रीय, आर्थिक जीवनावर विशेष भर देणारें असें आहे. अशा प्रकारानें एकाच समाजवादाचीं भिन्नभिन्न स्वरूपें प्रत्येक देशांत दिसून येत आहेत. त्या सर्वांतून सर्वसामान्य असें जें तत्त्व दिसून येतें त्याचा विचार सर्वच देशांना व समाजांना करावा लागेल. राष्ट्रांतील संपत्तीचा उपयोग समाजांतील प्रत्येक व्यक्तीला झाला पाहिजे. विशेषतः श्रमजीवी कामकरी वर्ग व बुद्धि-जीवी बुद्धिमान् वर्ग यांना त्यांच्या श्रमाचा पूर्ण मोबदला मिळाला पाहिजे. हीं तत्त्वें उदार आणि आकर्षक असून तीं ज्या ज्या चळ-वळींत गोंवलीं गेलीं आहेत त्या त्या चळवळींना तरुणांचा पाठिंबा मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. मग त्या चळवळीचें नांव सोशा-लिझम् असो कीं अन्य कांहीं असो.

समाजवादाच्या छटा

समाजांत आजपर्यंत 'शूद्र' म्हणून समजला गेलेला जो कामकरी वर्ग त्याचेबद्दलची सहानुभूति तरुणांचे ठिकाणीं वाढत्या प्रमाणांत आहे. हा वर्ग आजपर्यंत अज्ञानांत, दारिद्र्यांत, आणि कनिष्ठ दर्जावर असा ठेविला गेलेला आहे. त्या वर्गाला न्याय मिळाला

कामकरी वर्गाबद्दल सहानुभूति

पाहिजे, त्याला त्याच्या श्रमाचा योग्य मोबदला मिळावा, शिक्षणाची संधि मिळावी, समाजांत इतर वर्गाचे बरोबरीनें दर्जा प्राप्त व्हावा, अशा प्रकारची सहानुभूति तरुणांचे मनांत उत्पन्न झालेली आहे. आजपर्यंत विद्यार्थी वर्ग हा फक्त श्रीमंत वर्गांतीलच होता. परंतु, गोरगरीब लोकांचीं मुलें उच्च शिक्षण घेऊं लागल्याबरोबर, विद्यार्थी-वर्गांत सामान्य जनांच्या स्थितीबद्दल जागृति उत्पन्न झालेली आहे. अमेरिका, इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी इत्यादि सर्व ठिकाणच्या विद्यार्थ्यां-च्या चळवळींतून ही गोष्ट प्रामुख्यानें दिसून येते.

स्वातंत्र्यामधून समाजबंधनाकडे

समाजांतील धार्मिक आणि नैतिक बंधनांच्या विरुद्ध प्रवृत्ति कांहीं काळ विद्यार्थी वर्गांत दिसून येत होती, याचें कारण शिक्षणा-मुळें जो बुद्धिवाद वाढला त्याला रूढ धर्म व नीति हीं पुरी पडूं शकलीं नाहींत. त्यामुळें विद्यार्थीवर्गांत एके वेळीं व्यक्तिस्वातंत्र्याचें वारें संचारलें. परंतु, व्यक्तिस्वातंत्र्याचा परिणाम समाजांत काय होतो तें त्यांना जगांतील आर्थिक मंदीमुळें कळून आलें. समाजांत कांहीं बंधनांची आवश्यकता आहे, ही गोष्ट त्यांना पटली; म्हणून अशीं बंधनें स्वतःवर लादून घेण्याला तरुण आपण होऊन तयार झाले, जर्मनी, रशिया, इटली व इंग्लंड या देशांतील तरुणांनीं आपापल्या संघटना केल्या आहेत व स्वतःवर शिस्तीचीं बंधनें लादून घेतलीं आहेत. सारांश, तरुणांच्या चळवळीचा कांटा व्यक्ति-स्वातंत्र्यावरून समाजबंधनाकडे झुकत आहे.

संन्यासमार्गावरून कर्ममार्गावर

विद्यार्थी वर्ग आजपर्यंत आपला अभ्यास व वैयक्तिक चैन या पलीकडे फारसा पाहात नव्हता. आपल्या कॉलेजच्या बाहेर कांहीं जग आहे आणि त्यांत कांहीं महत्त्वाच्या धडामोडी चालल्या आहेत याची त्याला दाद नव्हती. परंतु, विद्यमान परिस्थितीमुळें विद्या-

र्थ्यांना धक्के मिळाले असून आपल्या पुस्तकांच्या बाहेर थोडें पाहिलें पाहिजे ही जाणीव त्यांच्यांत उत्पन्न झाली आहे. विद्यार्थी आतां सामाजिक घडामोडीकडे लक्ष देऊं लागले आहेत व शक्य तेथें त्यांत समक्ष भाग घेत आहेत. ते संन्यासमार्गावरून कर्ममार्गावर आलेले आहेत. कॉलेजच्या भिंती फोडून अखिल समाजक्षेत्रालाच त्यांनीं आपला अभ्यासाचा वर्ग बनविलें आहे. समाजशास्त्र, अर्थशास्त्र, मानसशास्त्र, इतिहास, वाङ्मय इत्यादींचा अभ्यास केवळ शाब्दिक पद्धतीनें न करितां हीं शास्त्रें जेथें जिवंत स्वरूपांत वाढत आहेत तेथें जाऊन त्यांचा अभ्यास करावा, अशी ईर्षा त्यांचे मनांत उत्पन्न होऊं लागली आहे.

**बौद्धिक अधिष्ठान**

आधुनिक विद्यार्थ्यांच्या चळवळींत एक प्रकारची अभ्यासूक वृत्ति दिसून येते. कांहीं तरी हुल्लड करावी आणि नुसतीच चळवळीची प्रसिद्धी मिरवावी, अशी प्रवृत्ति नाहीं. याचें कारणही विशेष आहे. आज तरुण विद्यार्थ्यांपुढें जे प्रश्न व ज्या अडचणी उपस्थित होतात त्यांचीं उत्तरें त्यांना त्यांच्या शिक्षकांकडून किंवा वडील माणसांकडून मिळत नाहींत. तीं उत्तरें स्वतःच शोधून काढणें त्यांना भाग आहे. म्हणून वाचन करावें, विचार करावा, चर्चामंडळें व अभ्यासमंडळें स्थापन करून एकत्र विचार करावा, आपल्या कार्याला कांहीं तरी तात्त्विक आणि बौद्धिक असें अधिष्ठान शोधून काढावें, अशा प्रकारची उत्सुकता तरुणांच्या ठिकाणीं दिसून येत आहे. आणि अशा प्रकारें खोल विचाराची प्रवृत्ति वाढत जाते त्या प्रमाणांत त्यांच्यांतील थिल्लरपणा हाही कमी होत जातो. "जगांतील सर्व ज्ञान मिळविल्याखेरीज तरुण खरा कम्यूनिस्ट होऊं शकत नाहीं" असें लेलिननें एके ठिकाणीं लिहिलें,

त्याचा परिणाम तरुणांच्या सर्व चळवळींवर झाला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

तरुण पिढी आणि वयस्क पिढी यांच्यांत दोन प्रकारचे संबंध दिसून येतात. कांहीं देशांत या दोन पिढयांमध्यें पूर्वापार चालत आलेला विरोध आहे, तर कांहीं देशांत या दोन पिढयांत पूर्ण एकमत आणि एकजीव आहे. अमेरिका, इंग्लंड, फ्रान्स इत्यादि देशांत

वयस्क आणि तरुण यांचे संबंध

जुन्या नव्या पिढींत विरोध आहे. समाजाचीं ध्येयें व वैयक्तिक जीवनाच्या पद्धती या बाबतींत परस्परांचा मतभेद आहे. जुन्या नव्या मतांचा कलह या ठिकाणीं दिसून येतो. या देशांतील तरुणांचे पुढारी तरुणच आहेत. त्यांनीं आपला कार्यक्रम स्वतःच ठरवून घेतलेला आहे. त्यांना जवळ करण्याचा प्रयत्न वयस्क पिढीकडून झालेला नाहीं. उलट रशिया, जर्मनी व इटली या देशांत अगदीं निराळी परिस्थिति आहे. तेथें तरुणांनीं आपलें सर्वस्व वयस्क पिढीला अर्पण केलें आहे, व तिच्या आज्ञेंत व शिस्तींत राहाण्यास ते तयार आहेत. याचें कारण वडील पिढीनें तरुणांना जवळ केलें आहे, त्यांना निश्चित ध्येयें दिलीं आहेत, त्यांच्यापुढें पद्धतशीर असा कार्यक्रम ठेविलेला आहे, आणि सामाजिक पुनर्घटनेंत त्यांना जबाबदारीचें असें स्थान दिलेलें आहे. या तीन देशांत तरुणांची संघटना करून त्यांची कम्यूनिस्ट, नाझी, किंवा फासिस्ट पक्षांशीं सांगड घालून दिलेली आहे. उद्देश हा कीं, वयस्क पिढीचे पश्चात् पुढारीपणाचे गादीवर तरुण आपोआप यावेत.

जगांतील तरुणांबद्दल विचार करून झाल्याबरोबर स्वाभाविकपणेंच हिंदी तरुणांकडे आपली दृष्टि वळते. पाश्चात्य देशांतील तरुण ज्या अवस्थांमधून गेले आहेत व जात आहेत त्या सर्व

अवस्था या ठिकाणीं सूक्ष्म प्रमाणांत दिसतात. तरुणांची मनोवृत्ति सर्व समाजांत सारखीच असल्यामुळें जगांतील आजच्या वातावरणांत दोन्ही ठिकाणीं तरुणांच्या वृत्तींत साम्य दिसावें यांत विशेष आश्चर्य नाहीं.

**आजचा हिंदी तरुण**

महायुद्धानंतरच्या सुबत्तेच्या काळांत जी वृत्ति अमेरिकन तरुणांत प्रादुर्भूत झाली होती तीच थोडया फार प्रमाणांत हिंदी तरुणांत आज शिरली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्याचा अनुभव घ्यावा, सुखप्रवृत्तीनें राहावें, धर्म—नीति इत्यादि रूढींबद्दल साशंक मन असल्यामुळें त्या दृष्टीनें उदासीन असावें, स्वतःपुरतें पाहावें, अशा प्रकारची प्रवृत्ति आपल्या तरुणांत आज सामान्यतः दिसते.

हिंदी तरुणांच्या चळवळीचा इतिहास पाहिला तर असें दिसून येतें कीं, महत्त्वाच्या प्रसंगीं त्यांना समाजानें आवाहन केल्याबरोबर ते स्वार्थावर पाणी सोडून उच्च कर्तव्यें करण्यास तयार झालेले आहेत; परंतु या दोन तीन प्रसंगांनीं त्यांच्यांत या स्वार्थत्यागाबद्दल साशंक भावना उत्पन्न झाल्यासारखी दिसते. आपण कितीही प्रयत्न केला तरी कांहीं होत नाहीं मग उगीच त्या मार्गाला कां जा, अशी विचारसरणी व तिच्या बरोबर सार्वजनिक जीवनाविषयीं निरुत्साह आणि औदासीन्य त्यांचे ठिकाणीं आलें आहे.

सार्वजनिक कार्यांत एकामागून दुसरी पिढी अशी जी परंपरा चालावयास पाहिजे ती आपल्या पिढींत तुटल्यासारखी दिसते. नवीन तरुणांची भर कार्यकर्त्यांत पडावयास पाहिजे ती पडलेली दिसत नाहीं. अमेरिका—इंग्लंड—फ्रान्समध्यें वयस्क आणि तरुण पिढींत जो विरोध दिसून येतो, तोच सौम्य प्रमाणांत येथें आहे. ही परिस्थिति दूर कशी करावी हा आपल्या समाजापुढील प्रश्न आहे.

तरुण पिढीचें वैशिष्टय असें आहे कीं, तिचा स्वभाव भावनाप्रधान असतो. उदार, आकर्षक, भावनांना चेतना देणारीं अशीं ध्येयें दिसल्याशिवाय तिला कार्याची स्फूर्ति होत नाहीं. उच्च ध्येयांपुढें आत्मार्पण करावें अशी तिची महत्त्वाकांक्षा असते. आज जगांत जें चालू आहे त्यांतील विभूतिमत्, श्रीमत् आणि ऊर्जित असें जें तत्त्व असेल त्याच्याशीं समरस व्हावें, असें तिला वाटतें. म्हणून या पिढीची निष्ठा ज्या समाजाला अथवा व्यक्तीला पाहिजे असेल त्यांनीं तरुणांना आकर्षक आणि पूजनीय अशा तत्त्वांचा समावेश आपल्या ध्येयमालिकेंत केला पाहिजे. तरुण पिढीच्या ठिकाणीं सामर्थ्य असतें; पण दिशा दाखविण्याचें काम वयस्क पिढीनें केलें पाहिजे.

तरुणांचें मानसशास्त्र

तरुणांच्या आटोक्यांत असलेला व्यवहार्य असा कार्यक्रम त्यांच्यापुढें ठेवून ‘ हा तुम्ही करा ’ असें समाजानें त्यांस सांगितलें पाहिजे. त्याला राष्ट्रीय मान्यता दिली पाहिजे व ही कामगिरी अंगावर घेतल्याबद्दल राष्ट्रानें त्यांचा गौरव केला पाहिजे. हें धोरण स्वीकारल्यामुळें आज रशिया आणि जर्मनींतील पुढारी आपल्या तरुणांकडून राष्ट्रसंवर्धक अशीं महत्त्वाचीं कार्यें करून घेत आहेत.

आज्ञार्थी कार्यक्रम

कार्यकर्त्यांची अखंड परंपरा चालू राहावी या दृष्टीनें इटली, जर्मनी, रशिया या देशांनीं आपल्या तरुणांची जी संघटना केली तिचा अभ्यास करण्यासारखा आहे. तरुणांना जवळ करून त्यांना निश्चित कार्यक्रम दिला म्हणजे महत्त्वाचें कार्य होतें व कार्यकर्त्यांची अखंड परंपरा निर्माण होऊन, कार्य व ध्येय यांत सुसंगतता राहते, ही गोष्ट वरील संघटनांतून चांगली प्रत्ययास येते.

राष्ट्रांतील तरुण पिढी ही शक्ति आहे. ती स्वतंत्र असें तत्त्व किंवा ध्येय निर्माण करूं शकत नाहीं; परंतु असें तत्त्व आणि ध्येय देणारा दुसरा कोणी भेटल्यास त्याचें निस्सीम अनुयायित्व स्वीकारण्यास तयार असते. आपल्या देशांतील तरुण पिढीचा आज समाजाला उपयोग होत नसेल तर तो तरुणांचा दोष नाहीं. तरुणांची वृत्ति ओळखून त्यांचेपुढें आकर्षक ध्येयें आणि व्यावहारिक कार्यक्रम न ठेवणाऱ्या वयस्क पिढीचा आहे. आपलेपणा दाखविला तर तरुण पिढी वाटेल तीं बंधनें स्वीकारण्यास तयार होते, व उपयुक्त कार्य करून कर्तृत्वाची आणि पुढारीपणाची परंपरा कायम ठेविते, असा येथील व पाश्चात्त्य देशांतील तरुण पिढीचा इतिहास आहे.

---

प्रकरण पस्तिसावें

## राहणीचा दर्जा व विचाराची उंची

जनक राजाची अशी गोष्ट सांगतात कीं, त्याच्या एका पायाला सुंदर स्त्रियांनीं मऊ हातांनीं लोणी चोळीत असावें आणि दुसरा पाय रसरसलेल्या निखाऱ्यावर ठेवावा, तरी बिचाऱ्याला दोहींचें सुखदुःख सारखेंच होत असे! निष्काम व संन्यस्त वृत्तीनें वैभवांत राहून त्यापासून अलिप्त राहणाऱ्या राजर्षींचीं व पुण्यपुरुषांचीं उदाहरणें आपल्या इतिहासांत पुष्कळ आहेत. म्हणजे एक काळ असा होता कीं, त्या वेळीं उच्च राहणी आणि उच्च विचारसरणी यांमध्यें विरोध आहे अशी समजूत नव्हती.

जनकाचें 'स्टँडर्ड ऑफ् लाईफ्'

पाश्चात्य देशांतील श्रीमंत राहणीचा दर्जा पाहिला म्हणजे असा विचार येतो कीं, ही गोष्ट हिंदुस्थानांत आली तर इष्ट कीं

अनिष्ट ? शास्त्रीय शोधाबरोबर यांत्रिक प्रगति येते, यांत्रिक सुधारणे-बरोबर उद्योगधंद्यांचा उत्कर्ष होतो, उद्योगधंदे वाढले म्हणजे असंख्य वस्तू निर्माण होतात. या वस्तू स्वस्त झाल्या कीं त्या गोरगरीबांना वापरावयास मिळतात व सामान्य जनांचा राहणीचा दर्जा Standard of Life वाढतो. पाश्चात्य समाजांत कितीही बेकारी व मंदी असली तरी तेथील सामान्य मनुष्याची राहणी इकडील श्रीमंत म्हणविणाऱ्या माणसापेक्षां उच्च दर्जाची असते. ही तुलना करतांना फक्त ऐहिक दृष्टीच डोळ्यापुढें ठेविली आहे.

वरील कार्यकारणमीमांसा जमेला धरली म्हणजे हें उघड दिसतें कीं, हिंदुस्थानांत यांत्रिक सुधारणा वाढली कीं येथील सामान्य जनांचा राहणीचा दर्जा वाढेल. प्रश्न असा आहे कीं, तसें झाल्यास आपले लोक जडवादी Materialistic व केवळ सुखवादी होतील कीं काय ? तसें होणार असेल, तर आजच या नवीन संस्कृतीला विरोध केला पाहिजे. उलटपक्षीं उच्च राहणी आणि अध्यात्म-वृत्ति यांचा विरोध नसेल तर सामान्य जनांच्या राहणीचा दर्जा सुधारण्याच्या दृष्टीनें खटपट केली पाहिजे.

आपण जडवादी होऊं काय ?

सुखांत राहणारे पाश्चात्य लोक सरसकट जडवादी, स्वार्थी व सुखलोलुप असतील अशी जी लांबून कल्पना होते ती चूक आहे. तिकडील देशांतील प्रत्येक समाजांत असे स्त्री-पुरुष भेटतात कीं जे चारित्र्य, उच्च तात्त्विक वृत्ति, स्वार्थत्याग, समाजसेवा व अध्यात्मवृत्ति, या दृष्टींनीं आपल्या देशांतील याच प्रकारच्या लोकांच्या बरोबरीचे ठरतील. ऐहिक ऐश्वर्य त्यांच्या चारित्र्याच्या आड आलेलें नाहीं.

नैसर्गिक मानवी प्रवृत्ति सुख शोधणारी आहे. तिला

तत्त्वज्ञानांचें बंधन घातलें जातें, तरी मधून मधून चार्वाकासारखे जडवादी बंड करून जाहीर करितात कीं,

तीन मनोवृत्ति

" यावज्जीवेत् सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत् । भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ? ॥ ही सुखवादी वृत्ति जशी एका टोकाला गेली, तशी त्यागवादी वृत्ति दुसऱ्या टोकाला जाऊन तिनें निर्णय दिला कीं, " निवृत्तिस्तु महाफला " सुखाचा त्याग करण्यांत वैशिष्टय आहे, भोग घेणें हा पशु व सामान्यजन यांचा धर्म आहे. या दोहोंमधून मार्ग काढणारा तिसरा पंथ असा निघाला कीं, वैभवांत व सुखांत बाह्यतः राहा, पण वैराग्ययुक्त मनोवृत्ति ठेवा. हीं तीन प्रकारचीं तत्त्वज्ञानें आपल्याकडे प्रचलित असलीं तरी त्यागतत्त्वाचा आपल्या मनावर जितका पगडा बसला आहे, तितका इतर दोन तत्त्वांचा पगडा बसलेला नाहीं. त्यामुळें पाश्चात्यांच्या ध्येयवादांतून आपल्या अभिरुचीस अनुकूल अशींच ध्येयें आपण घेतलीं; Plain living and high thinking ' साधी राहाणी उच्च विचारसरणी ' या म्हणीवर भाष्य म्हणूनच कीं काय भर्तृहरीनेंही लिहून ठेवलें, "शय्या भूमितलं दिशोऽपि वसनं ज्ञानामृतं भोजनं". या सर्व प्रवृत्तीचा परिणाम असा झाला कीं, आपण जीवनाकडे पाठ फिरविली आणि परिणामीं जीवनानेंही आपणाकडे पाठ फिरविली ! ऐहिक वैभवाच्या गोष्टी आपणांला नको होत्या. आपण त्यांविषयीं उदासीन राहिलों म्हणून पाश्चात्यांनीं येऊन आपला भार हलका केला !

पाश्चात्यांपासून या बाबतींत शिकण्यासारखी गोष्ट ही कीं उच्च राहणी आणि उच्च विचारसरणी यांत विरोध नाहीं. या दोन्ही जशा स्वतंत्र नांदू शकतात तशा त्या एकत्रही नांदू शकतात. आज जगांत " भौतिक सुधारणा कीं आध्यात्मिक सुधारणा " असा

वाद राहिलेला नसून दोहोंची सांगड घातली पाहिजे असा सर्वांचा निर्णय आहे.

सामान्यजनांची राहणी

जीवनाच्या दृष्टीनें पाहिलें तर असें दिसतें कीं प्रत्येक देशांत राहणीचा दर्जा वाढविण्याची ( Higher standard of life ) खटपट चालू आहे. या चळवळीचा सुपरिणाम सामान्य जनतेवर होणार आहे ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. कारण समाजांत अशी स्थिति आहे कीं, " साधी राहणी " म्हणून आपली जी कल्पना आहे, ती राहणी समाजांतील शेंकडा नव्वद लोकांच्याही आटोक्यांत आलेली नाहीं. मध्यम वर्गाला जी साधी राहणी, ती सामान्य जनांना उच्च राहणीच आहे. मध्यम व श्रीमंत वर्गांतील लोक साध्या राहणीची तरफदारी करितात. त्यांच्या स्वतःचे आचरणांतील साधी राहणी त्यांनीं बहुजनसमाजाला मिळवून देण्याचा प्रयत्न केला तरी समाजाची राहणी पुष्कळ सुधारेल. या दृष्टीनें विचार करून आपल्या देशांतील बहुजनसमाजाच्या राहणीचा दर्जा वाढविण्याचा बुद्धिपुरःसर प्रयत्न झाला पाहिजे.

प्रयत्नवादाला प्रेरणा नाहीं

धनोत्पादन आणि राहणी यांचा अन्योन्यसंबंध आहे. परदेशांतील कारखान्यांवर व उद्योगधंद्यांवर देश जोंपर्यंत अवलंबून आहे, जोंपर्यंत जीवनोपयोगी वस्तूंचें उत्पादन देशांत होत नाहीं, तोंपर्यंत जनतेची राहणी सुधारणें शक्य नाहीं. उद्योगाची प्रवृत्ति वाढल्याशिवाय औद्योगिक प्रगति होणार नाहीं. आजच्यापेक्षां चांगल्या तऱ्हेनें राहिलें पाहिजे, आयुष्यांत आपल्याला अमुक एक राहणीचा दर्जा मिळाला पाहिजे, अशी ईर्षा मनांत वाटल्याशिवाय जनतेकडून उत्साहपूर्वक उद्योग होणार नाहीं. आज आपल्या जनतेंत जें शैथिल्य

व औदासीन्य दिसतें, त्याचें कारण प्रयत्नवादाला प्रेरणा नाहीं. जगांत अमुक एक मिळवावयाचें आहे असें वाटल्याशिवाय मानवी प्रयत्नाला जोर येत नाहीं. ऐहिक पुरुषार्थाची प्रेरणा समाजांतून लुप्त झालेली आहे, ती पुनः परत आल्याशिवाय आपली भौतिक स्थिति सुधारणार नाहीं.

उच्च राहणीबाबत पाश्चात्यांचें ध्येय डोळ्यापुढें ठेवितांना एक सुधारणा केली पाहिजे. ती म्हणजे ऐहिक दृष्टीबरोबर जनतेला आध्यात्मिक व तात्त्विक दृष्टिही दिली पाहिजे. नाहीं तर ज्या सुखाकरितां ही उच्च राहणी मिळवावयाची, तें सुख व्यक्तीला कधींच मिळणार नाहीं. कारण 'उच्च' याला कधीं अंतच नाहीं. कोणत्याही पायरीवर आपण गेलों तरी तेथून उंच अशी पायरी आहेच. आपल्यापेक्षां श्रीमंत, चांगलें घर असलेला, उत्कृष्ट मोटार बाळगणारा, व अधिक सुखी असा कोणी तरी असणारच. म्हणजे केवळ उच्च राहणीवर भर दिला तर मनाला कधींही सुख व समाधान लाभावयाचें नाहीं, आणि तीच स्थिति आज पाश्चात्य लोकांची झालेली आहे. जगांत जें ऐहिक दृष्टया उच्च, तें त्यांना मिळालेलें आहे, परंतु मानसिक सुख व संतुष्टता असावयास पाहिजे ती नाहीं. पाश्चात्यांच्या या अनुभवावरून व आपल्या इतिहासावरून आपण दोन महत्त्वाचीं तत्त्वें शिकणें जरूर आहे. आपली एकांगी त्यागवृत्ति सोडून पाश्चात्यांच्या भोगवृत्तीचा अंगिकार केला पाहिजे, आणि या भोगवृत्तीला आध्यात्मिक विचाराच्या नियंत्रणांत बसविलें पाहिजे. जगांत येऊन पुरुषार्थ केला पाहिजे, उत्कृष्ट तऱ्हेचें जीवन घालविलें पाहिजे, उच्च प्रकारच्या राहणीचा दर्जा संपादन केला पाहिजे, अशी वृत्ति समाजाचे वातावरणांत पाहिजे. वैदिक काळीं ऐहिक

सुखाला अध्यात्मिक मर्यादा

जीवनाबद्दल जो उत्साह, जो प्रयत्नवाद आर्यांचे ठिकाणीं होता तो समाजांत पुन्हां निर्माण केला पाहिजे, आणि या प्रयत्नवादाच्या व फलप्राप्तीच्या मर्यादा कळण्याकरतां उच्च तत्त्वज्ञानाची जाणीव झाली पाहिजे. अशा अध्यात्मभूमिकेवर राहून पाश्चात्यांची ऐहिक जीवनाचीं व उच्च राहणीचीं कल्पना आपण घेतली तर त्यांच्यापेक्षां कांहीं विशेष केल्यासारखें होईल. ऐहिक दृष्टीनें आपण त्यांचे दर्जाबरोबर येऊन बसूं आणि मानसिक व अध्यात्मिक दृष्टीनें त्यांचेपेक्षां कांकण-भर श्रेष्ठच ठरूं.

---

प्रकरण छत्तिसावें

## धर्म यापुढें जगेल कां मरेल?

अमेरिकन लोकांच्या अनेक मिशनरी संस्था आशिया खंडांत असून त्यांवर वर्षाकाठीं लाखो डॉलर खर्च होत आहेत. प्रत्येक चर्च-मधून रविवारीं प्रार्थना संपल्यानंतर परदेशांतील मिशन्सकरितां द्रव्य जमविण्यांत येतें व लोक अत्यंत भाविकपणें तें देतातही. न्यूयॉर्कमधील एका चर्चमध्यें मला एकदां व्याख्यानास बोलाविलें होतें. कर्मधर्मसंयो-गानें त्याच दिवशीं त्या चर्चची मिशन कमेटी हजर होती. या कमेटींत सर्व वृद्ध पुरुष व स्त्रिया होत्या. सामाजिक व राजकीय परिस्थितीवर भाषण झाल्यानंतर श्रोत्यांना प्रश्न विचारावयास सवड दिली. तेव्हां एका श्रोत्यानें हिंदुस्थानांतील मिशन्सबद्दल प्रश्न विचारला. 'तुम्हीं प्रश्न विचारला म्हणून उत्तर देतों' अशी प्रस्तावना करून मीं सांगितलें कीं, मिशनऱ्यांच्या शैक्षणिक आणि आरोग्यविषयक कामां-बद्दल हिंदी लोकांना आदर आहे, परंतु त्यांच्या धर्मविषयक चळवळी

चर्चमधील अनुभव

मात्र आम्हांला पसंत नाहींत. अर्थात् हें उत्तर श्रोत्यांतील वृद्ध पिढीला पसंत पडलें नाहीं व त्यांनीं आपली बाजू पुढें मांडली. त्यांनीं विचारलें ' तुम्ही आपल्यांतील निकृष्ट, अस्पृष्ट व मागासलेल्या लोकांकरितां शैक्षणिक व आरोग्यविषयक कामें कां करीत नाहीं ?' मीं आर्यसमाजाचें उदाहरण दिलें. सभा आटोपल्यावर तेथील एका तरुण सेक्रेटरीला मी म्हणालों,' माझें विधान ऐकून तुमच्या मंडळींना धक्का बसल्यासारखा दिसला.' तो म्हणाला," त्यांना असेच धक्के दिले पाहिजेत." सभेंतील तरुण पिढीची ही निराळी मनोवृत्ति दिसून आली. यावरून नवीन पिढीचें धर्मविषयक धोरण काय राहील त्याचा अंदाज बांधतां येईल.

मिशन्सचें नवें धोरण

आपलीं मिशन्स परदेशांत काम तरी काय करीत आहेत आणि त्यांपासून पुढें परिणाम तरी काय होणार आहेत, याची चौकशी करण्याकरितां अमेरिकन पुढाऱ्यांनीं एक कमिशन नेमलें, त्याचें नांव " लेमेन्स कमिशन " (Laymen's Commission) असें होतें. या मिशनच्या रिपोर्टाचा मथितार्थ असा होता कीं, यापुढें अमेरिकन मिशनऱ्यांनीं धर्मप्रसाराच्या भानगडींत न पडतां शिक्षण व आरोग्यविषयक म्हणजे फक्त सामाजिक विषयाचीं कामें करावींत व त्यांचें पुढारीपण शक्य तितकें स्थानिक लोकांना द्यावें. अर्थात् या रिपोर्टावर त्या वेळीं बरेंच रण माजलें व चर्चमध्यें जुना व नवा असे दोन पक्ष स्पष्टपणें दिसून आले. यावरून वारा कोणत्या दिशेनें वाहात आहे याची कल्पना येईल.

सर्वच धर्मांवर गंडांतर

धर्मांचा इतिहास असा आहे कीं कोणतेहि दोन धर्म आजपर्यंत विशेष सख्यानें एकत्र राहिलेले नाहींत. प्रत्येकानें दुसऱ्यावर आक्रमण करण्याची प्रवृत्ति ठेवलेली आहे. कोणी शांततेनें आक्रमण केलें तर कोणीं अत्याचारानें आक्रमण केलें. ही परस्परकलहाची प्रवृत्ति

अद्यापिही नष्ट झालेली नाहीं, हें वरवर पाहणाराला सहज दिसून येईल. परन्तु आज अशी स्थिति झाली आहे कीं प्रत्येक धर्मांतील पुराणमतवादी लोक एकमेकांशीं भांडण्यांत गर्क झाले असतांना या सर्वांचा संहार करणारा तिसराच जडमतवादी, अनीश्वरमताचा व नास्तिक पंथी पक्ष जगांत निर्माण होत आहे. परस्परांशीं कलह करण्याची भांडखोर वृत्ति आणि जीर्ण मतांना कवटाळून बौद्धिक विकास मारून टाकण्याची प्रवृत्ति जर जुन्या धर्मांनीं सोडून दिली नाहीं तर हा नवीन पंथ सर्व धर्मांचा संहार करून टाकील, आणि त्याबद्दल कोणाला वाईटही वाटणार नाहीं. या मृत्यूपासून स्वतःचा बचाव करावयाचा असेल तर प्रत्येक धर्मानें स्वतःचें निरीक्षण करून आत्मशुद्धीला सुरुवात केली पाहिजे.

आज प्रत्येक देशांतील तरुण पिढी समाजसत्तावादाकडे आकर्षिली जात आहे. समाजवाद आणि निरीश्वरवाद या दोन्ही तत्त्वांचा एकदम स्वीकार केलाच पाहिजे, तीं दोन्हीं अविभाज्य आणि एकरूप आहेत, असें रशियाच्या उदाहरणावरून वाटण्याचा संभव आहे. सोशालिझमचा प्रथम पुरस्कार करणाऱ्या रशियन लोकांनीं आपले देशांत सामाजिक, राजकीय व धार्मिक क्रांति एकदम करून समाजसत्तेबरोबर निरीश्वर वादाच्या मोहिमेला प्रारंभ केला आहे. रशियानें असें केलें असलें तरी समाजवादाबरोबर जडवाद स्वीकारलाच पाहिजे असें नाहीं. अमेरिकेंत व युरोपांत ख्रिश्चन सोशालिस्टांचा पक्ष दिवसेंदिवस प्रबळ होत आहे. अध्यात्मदृष्टि न सोडतां समाजवाद स्वीकारणें शक्य आहे हें यावरून दिसून येईल.

सोशालिस्टांचा निरीश्वरवाद

समाजवाद स्वीकारणारी तरुण पिढी निरीश्वरपंथी व जडवादी होऊं नये अशी धर्मनेत्यांची इच्छा असेल तर त्यांनीं प्रथम

धर्माची डागडुजी

आपल्या धर्माची डागडुजी केली पाहिजे; आधुनिक मनाची धर्मश्रद्धा ज्या ज्या गोष्टींमुळें कमी होते त्या त्या गोष्टींची सुधारणा केली पाहिजे. नवीन समाजशास्त्र, तत्त्वज्ञान, मानसशास्त्र व भौतिकशास्त्र यांशीं सुसंगतता येईल अशा रीतीनें धर्माची नवीन मांडणी केली पाहिजे. बुद्धिप्रधान, चिकित्सक, आधुनिक शास्त्रीय ज्ञानानें संपन्न अशा मनाचें देखील समाधान होईल अशा प्रकारचें स्वरूप धर्माला आलें पाहिजे.

धर्माचीं दोन स्वरूपें आहेत. एक सामाजिक आचार व परंपरा. हें स्वरूप प्रत्येक कालांत बदलणारें, परिवर्तनीय व प्रगतिप्रवण असें आहे. दुसरें स्वरूप तत्त्वज्ञान व अध्यात्मविचार हें असून तें सामाजिक स्वरूपाचे मानानें स्थिर व शाश्वत स्वरूपाचें असें आहे. धर्माला सनातन हें जें विशेषण दिलें जातें तें या दुसऱ्या स्वरूपाला लागू पडतें, पहिल्या स्वरूपाला लागू पडत नाहीं. या दोन स्वरूपांचा घोंटाळा झालेला असल्यामुळें एकाचा दोष दुसऱ्यावर लादला जात आहे. सामाजिक धर्म अग्राह्य म्हणून तत्त्वज्ञान व अध्यात्मविचार हेही अग्राह्य अशी वृत्ति होत चाललेली आहे. त्याचे उलट अध्यात्मतत्त्वें शाश्वत व सनातन म्हणून समाज, आचार अथवा धर्मही सनातन अशी पुराणमतवाद्यांची कल्पना झालेली आहे. याकरितां धर्म व अध्यात्म या दोहोंमध्यें भेद करून धर्माचें सामाजिक स्वरूप हें परिवर्तनशील व प्रवाही असें ठेवावें व दुसरें अध्यात्माचें तत्त्वज्ञानात्मक स्वरूप त्यापेक्षां स्थिर, शाश्वत परंतु सतत विकासी राहील असें धोरण ठेवावें.

सनातन व परिवर्तनीय स्वरूप

आज प्रत्येक देशांतील तरुण पिढीकडे पाहिलें तर असें

दिसतें कीं, त्यांच्यावर असलेली धर्माची छाप कमी होत चाललेली आहे. तीच स्थिति हिंदुस्थानांतहि दिसून येते.

धर्माची छाप कां नाहीं ?

याचें कारण असें आहे कीं धर्मदृष्टीनें विचार करितांना आपण हजार दोन हजार वर्षांपूर्वी त्यावेळच्या लोकांनीं निर्माण केलेल्या विचारांचे वातावरणांत राहातों, आणि त्यांतून बाहेर पडल्याबरोबर विसाव्या शतकांतील भौतिक शास्त्र, समाजशास्त्र, व मानसशास्त्र यांच्या वातावरणांत येतों. या दोन वातावरणांत एकदम विरोध वाटतो. एकांत श्रद्धा व अंधदृष्टि प्रधान आहे आणि स्वतंत्र बुद्धीला येथें वाव नाहीं, तर दुसऱ्यांत बुद्धिवाद, प्रयोगवृत्ति, प्रत्यक्ष अनुभव या गोष्टी प्रधान आहेत व त्यांत बुद्धीला अधिक जिवंतपणा वाटतो. इतर ज्ञानक्षेत्रें ज्याप्रमाणें बुद्धिप्रधान झालीं त्याप्रमाणें धर्माची वाढ झाली नाहीं. त्यामुळें आजच्या काळांत विचारी माणसाचें जुन्या स्वरूपांतील धर्मानें समाधान होत नाहीं.

धर्मश्रद्धा नाहींशी होण्याचें आणखी विशेष कारण म्हणजे धर्मसंरक्षण करण्याचें काम ज्यांचेकडे दिलें गेलें त्यांचें आचरण आक्षेपातीत राहिलेलें नाहीं. रशियांतील धर्मरक्षकांनीं ज्याप्रमाणें चर्चचे मदतीनें सुवर्ण आणि सत्ता यांचा संग्रह केला, त्याच इतिहासाची पुनरावृत्ति प्रत्येक धर्मांत झालेली आहे. जुना धर्म आणि धर्मरक्षकांचा स्वार्थ यांची सांगड जमल्यामुळें तरुण मनाला असें वाटतें कीं आपल्याला या दोहोंचीही जरूरी नाहीं.

पाश्चात्य देशांतील आणि हिंदुस्थानांतील धर्माची परिस्थिति पाहतां त्यांचेमध्यें नवीन जीवन यावयाला पाहिजे असेल तर धर्माकडे पाहण्याची नवीन दृष्टि स्वीकारली पाहिजे असें वाटतें.

जगामध्यें मानवजातीचें परस्पर दळणवळण मर्यादित होतें

अशा वेळीं निरनिराळया काळीं व स्थळीं जो जो अध्यात्मविचार उत्पन्न झाला त्याला त्याला धर्म असें नांव दिलें गेलें. आज जगांतील भौतिक शास्त्रज्ञ परस्परांशीं सहकारितेची वृत्ति ठेवून सर्व शास्त्र एक असें मानतात. तसें करण्याची संधि व दृष्टि पूर्वीच्या लोकांना नव्हती. परंतु आज तशी दृष्टि स्वीकारतां येणें शक्य आहे. सर्व धर्मांचे मुळाशीं असलेलें अध्यात्मशास्त्र व तत्त्वविचार हा एक आहे, असें मानून शास्त्र या दृष्टीनें तो वाढविण्याचा सर्वांनीं प्रयत्न केला पाहिजे.

धर्माची नवीन दृष्टि

भौतिक शास्त्रांत पूर्व शास्त्रज्ञांनीं कायम सिद्धांत म्हणून शोधलेले असले तरी पुढें येणारे शास्त्रज्ञ आपल्या शोधांनीं ते सिद्धांत बदलू शकतात किंवा नवीन सिद्धांत शोधून काढतात, तीच प्रवृत्ति अध्यात्मशास्त्रांत स्वीकारली पाहिजे. दोन हजार वर्षांपूर्वींच्या हिंदू, ख्रिस्ती, यहुदी आणि महंमदी तत्त्वज्ञांनीं जे सिद्धांत शोधले तेच त्रिकालाबाधित आहेत आणि त्यांच्यानंतर दोन हजार वर्षें वाढविलेली विद्या व शास्त्रें यांचें ज्ञान असूनही आम्ही या धर्मसिद्धांतांत कांहीं वाढ करूं शकणार नाहीं ही वृत्ति सोडून द्यावी. पूर्वीचे सिद्धांत पारखून ते खरे खोटे ठरविले पाहिजेत व त्यांत आपल्या विचारानें अधिक भर घालतां येणें शक्य आहे अशी नवीन दृष्टि ठेविली पाहिजे. धर्माचीं अखेरतत्त्वें सर्वच शोधलीं गेलीं नाहींत. आपल्यालाही तत्त्वसंशोधनास अवसर आहे, असें तरुण पिढीला वाटलें पाहिजे; जी संशोधक वृत्ति व स्फूर्ति धर्म निर्माण करणाऱ्या पूर्वऋषींत होती तीच आजच्या पिढीतही आहे असा आत्मविश्वास निर्माण केला तर धर्माचें स्वरूप विकासी राहील.

प्रचलित युगाचें असें वैशिष्ट्य आहे कीं त्यांत बहुजन-

समाजाला प्राधान्य प्राप्त झालें आहे. व्यक्तिनिष्ठेचा काळ गेला असून समाजनिष्टेचा काळ आला आहे. हें तत्त्व ख्रिस्ती धर्मपुढाऱ्यांनीं ओळखलें व आपल्या चळवळीचा रोख बहुजनांची स्थिति सुधारण्याकडे वळविला. या नवीन सामाजिक दृष्टीचा धर्मानें स्वीकार केल्यामुळें त्याला नवीन पिढयांचा पाठिंबा मिळत गेला. यांत्रिक युगामुळें कामगार वर्गावर आलेल्या आपत्ति निवारण करण्याचे दृष्टीनें पाश्चात्य देशांतील ख्रिस्ती संस्थांनीं प्रशंसनीय काम चालविलें आहे. बहुजन हिताचे दृष्टीनें ख्रिश्चन लोकांनीं चालविलेल्या या कामाची थोडी कल्पना आर्यसमाज संस्थांच्या कामावरून येते. वैयक्तिक मोक्षाची वाट दाखविणाऱ्या हिंदुधर्मानें यापुढें ही समाजदृष्टि ठेविली पाहिजे. वैयक्तिक मोक्ष आणि सामाजिक मोक्ष अशा दोन ध्येयांची सांगड घातली तरच या धर्माच्या निशाणाखालीं नवीन दमाचे तरुण गोळा होतील. नाहीं तर वृद्धांनीं आपला मोक्ष मिळविल्यानंतर हिंदू धर्माची व तत्त्वज्ञानाची परंपरा पुढें चालविण्यास तरुण पिढी मिळणार नाहीं, याचा विचार जुन्या पिढीच्या लोकांनीं केला पाहिजे.

समाजनिष्ठ धर्माची जरूरी

सारांश, आज जगांतील बहुतेक धर्मांनीं अद्याप आपली पुराणदृष्टि ठेविली आहे. परस्परकलहांत ते मग्न असतां त्यांचा संहार करणाऱ्या जडवादी, निरीश्वरवादी पंथाचें आक्रमण होत आहे. धर्मांनीं नवीन दृष्टि स्वीकारून आजच्या युगाला सुसंगत असें धोरण ठेविलें तरच त्यांना नवीन पिढीचा आश्रय मिळण्याचा संभव आहे. धर्माला विकासी आणि प्रवाही असें स्वरूप प्राप्त झालें तरच तो जगेल नाहीं तर मरेल.

विकासी स्वरूप ठेवा

---